जगांतील लोकसत्तेच्या कल्पनेचें ऐतिहासिक विहंगमदर्शन : डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे

# लोकसत्तेचा उदय, विकास आणि आधुनिक स्वरूप

लोकसत्तेची कल्पना, तिचीं मूलतत्त्वें, तिच्या कार्यपद्धती यांचा जगांत प्रथम उदय कोठें झाला, प्रत्यक्षांत या शासनपद्धतीचा अवलंब कोणीं व केव्हां केला, त्यांत यशस्वी कोण झाले, अयशस्वी कोण झाले, यशापयश कोणाच्या गुणावगुणांमुळें आलें, आजच्या काळांत लोकसत्तेचें स्वरूप कोठें परिणत झालें आहे, कोठें विकृत झालें आहे, लोकशासनाच्या तात्त्विक विचारांत आज भर पडली आहे काय, इत्यादि प्रश्नांचा या लहानशा लेखांत विचार करावयाचा आहे. थोडक्यांत म्हणजे लोकसत्तेच्या कल्पनेचा हा इतिहास आहे, आढावा आहे.

## प्राचीन भारतांतील गणराज्यें

कांहीं पंडितांच्या मतें, लोकसत्तेच्या कल्पनेचा उदय भारतांत होऊन प्राचीन काळीं लोकायत्त शासनाची येथें अनेक ठिकाणीं प्रस्थापनाहि झाली होती, याविषयीं आतां संशयातीत पुरावा उपलब्ध झाला आहे. हिंदुस्थानांत ख्रिस्तपूर्व ७०० ते ख्रिस्तोत्तर ४०० या काळांत अनेक गणराज्यें व संघराज्यें प्रस्थापित झालेलीं असून, त्यांचा कारभार ग्रीसमधील नगरराज्यांप्रमाणें लोकायत्त पद्धतीनें शेंकडों वर्षें यशस्वीपणें चाललेला होता. सिंध, पंजाब, उत्तर प्रदेश, बिहार या प्रांतांत प्राचीन काळीं मालव, यौधेय, त्रिगर्त, वृष्णि, कोलिय, लिच्छवि, विदेह अशीं अनेक प्रजासत्ताक राज्यें चालूं होतीं. श्रीकृष्ण हा आपल्या कल्पनेप्रमाणें राजा नसून अंधकवृष्णि या प्रजातंत्राचा तो अध्यक्ष होता, असें आजचे संशोधक सांगतात. बुद्धाचा पिता शुद्धोदन हाहि राजा नसून लिच्छवि-गणाचा अध्यक्ष होता व तो गण ज्या शाक्य लोकांच्या संघांत होता त्याचें प्रजातंत्र जवळ जवळ हजार वर्षें टिकून राहिलें होतें, असें पुरावृत्त आज उपलब्ध झालें आहे. महाभारतांतील सभापर्वांत किरात, दरद, अंग, वंग इत्यादि पंधरा संघराज्यांचा उल्लेख आलेला आहे. मेग्यास्थेनिससारख्या ग्रीक ग्रंथकारांनींहि येथील गणराज्यांचीं वर्णनें लिहून ठेविलीं आहेत. या सर्व पुराव्यावरून भारतांत प्राचीन काळीं लोकसत्ताक शासनपद्धति कांहीं काळ रूढ झाली होती याविषयीं शंका राहत नाहीं.

लोकशाहीच्या बाह्य स्वरूपाचीं लक्षणेंहि येथील प्राचीन लोकायत्त शासनांच्या ठायीं दिसून येतात. पुष्कळ ठिकाणीं राजे वारसाहक्कानें गादीवर न येतां निवडणूक होऊन येत. कांहीं ठिकाणीं सेनापतीची निवड होत असे. निवडणुकींतील गुप्त मतदानपद्धतीहि कांहीं संघराज्यांत रूढ झाली होती. प्रतिनिधी निवडून पाठविण्याची पद्धति मात्र येथें नव्हती. त्यामुळें जेवढे म्हणून नागरिक असतील तेवढे सर्व विधिमंडळाचे सभासद असत. या कारणानें ही संख्या पुष्कळ वेळां पांच ते सात हजारांपर्यंत जाई. विधिमंडळांत सध्यांप्रमाणेंच रीतसर ठराव येत, त्यांचें त्रिवार वाचन होई व मग ते बहुमतानें संमत होत किंवा फेंटाळले जात. या पद्धतीनें अनेक संघराज्यांचा कारभार शेंकडों वर्षें भारतांत चालू होता. यांतील कांहीं संघराज्यें फार बलशाली व समर्थ झालेलीं होतीं. शिकंदराच्या सैन्यालाहि ज्यांचा धाक वाटावा अशीं कांहीं प्रजासत्ताक राज्यें पंजाबांतील बियास नदीच्या कांठीं होतीं, असें ग्रीक ग्रंथकारांनींच नमूद करून ठेविलेलें आहे. पण असें असलें तरी एकंदरींत या गणराज्यांचा जीव लहानच होता. एकतंत्री राजसत्तेला पूर्वींच्या व नंतरच्या काळीं अत्यंत विस्तीर्ण प्रदेशावर साम्राज्यें स्थापून तीं दीर्घकालपर्यंत चालविण्यांत जसें यश आलें, तसें या गण–किंवा–संघराज्यांना आलें नाहीं. त्यांच्या मर्यादा फार लहान होत्या. त्यामुळें शेजारीं प्रस्थापित झालेल्या मोठ्या साम्राज्यसत्तांशीं झगडा करण्यांत त्यांना यश आलें नाहीं व हळू हळू हीं प्रजातंत्रें साम्राज्यांत विलीन होऊन चौथ्या-पांचव्या शतकापर्यंत अगदीं नाहींशीं झालीं.





## प्राचीन भारतांत खरी लोकसत्ता होती काय ?

लोकशाहीचें बाह्य स्वरूप, तिचें जड शरीर, तिच्या कारभाराची यंत्रणा भारतांत प्राचीन काळीं लोकांनीं निर्मिली होती हें आपण पाहिलें. पण ही जड यंत्रणा म्हणजे लोकशाही नव्हे. व्यक्तित्व हा लोकशाहीचा आत्मा आहे. त्याचा विकास भारतांत कितपत झाला होता याचा विचार करूनच येथील लोकसत्तेविषयीं निर्णय दिला पाहिजे. त्या दृष्टीनें पाहतां असें दिसतें कीं, व्यक्तित्वाचें तत्त्वज्ञान भारतांत अवतीर्ण झालें नव्हतें. व्यक्तीचा गुणविकास, तिचें सुख, तिची मानसिक व बौद्धिक उन्नति हें समाजाचें अंतिम ध्येय आहे, व्यक्ति ही समाजासाठीं नसून सर्व समाजरचना, धर्मव्यवस्था, अर्थव्यवस्था 'व्यक्ति हेंच अंतिम' अशा तत्त्वावर झाली पाहिजे हा लोकशाहीचा मूळ सिद्धान्त आहे. समता, स्वातंत्र्य, बंधुता हीं या मूळ सिद्धान्ताला पोषक असलेलींच तत्त्वें आहेत. समाजांतील सर्व सत्ता ही परमेश्वरी वरदानानें किंवा अन्य श्रेष्ठ व्यक्तींच्या लहरीनें प्रस्थापित होत नसून, त्या सत्तेचें 'लोक' हें अंतिम अधिष्ठान आहे, हा विचार त्या मूळ सिद्धान्ताच्या पोषणासाठींच सांगितलेला असतो. लोकशाहीचा हा जो मूळ सिद्धान्त व त्याला पोषक अशीं जीं आदितत्त्वें त्यांचा भारतामध्यें मागमूसहि सांपडत नाहीं. डॉ. के. पी. जयस्वाल ('हिंदू पॉलिटी'), डॉ. आळतेकर ('प्राचीन गणराज्यें'–'सह्याद्रि', सप्टेंबर १९४९), प्रा. द. के. केळकर ('संस्कृतिसंगम') या पंडितांनीं प्राचीन भारतांतील लोकसत्तांचीं वर्णनें दिलीं आहेत त्यांत एतद्विषयक एकहि वाक्य नाहीं. लोकशाहीच्या मूलसिद्धांताविषयींचें तात्त्विक प्रतिपादन अन्यत्रहि कोठें सांपडत नाहीं. श्रीकृष्ण हा अंधकवृष्णि-संघाचा अध्यक्ष होता, असें सांगून नारदाजवळ त्यानें काढलेले उद्गार या पंडितांनीं महाभारतांतून उद्धृत करून दिले आहेत. पण [illegible] श्रीकृष्णाची गीता व त्याचीं महाभारतांतील अनेक [illegible] भाषणें पाहिलीं, तर त्याचा एकहि उद्गार [illegible] एकहि वचन असें सांपडत नाहीं कीं, [illegible] लोकायत्त शासनाच्या मूळ कल्पना त्याच्या [illegible] असतील असें वाटावें. इतर प्राचीन ग्रंथांसंबंधींहि (ख्रिस्तपूर्व ७०० ते ख्रिस्तोत्तर ४०० या काळांतील त्या अपरंपार ग्रंथसंभारासंबंधींहि) हेंच खरें आहे. थुसिडायडीजच्या मृत्यूच्या प्रसंगीं, ख्रिस्तपूर्व ४३१ सालीं, अथेन्सचा नेता पेरिक्लीज यानें जें भाषण केलें त्याच्या एका लहानशा परिच्छेदांत लोकशाहीच्या मूलतत्त्वांचा जो निर्देश येतो, तो भारतांतील अखिल ग्रंथसंभारांतहि सांपडत नाहीं. "आपल्या नगरीचें राज्य बहुसंख्यांसाठीं आहे, अल्पसंख्यांसाठीं नाहीं. म्हणून आपल्या शासनास लोकशाही म्हणतां येतें. वैयक्तिक जीवनांत येथें प्रत्येक व्यक्ति सम असून सार्वजनिक जीवनांत ती आपल्या गुणाप्रमाणें उंच किंवा हीन ठरते. स्वातंत्र्य हें आपल्या व्यवहाराचें मूलतत्त्व आहे आणि आपल्या शेजाऱ्याला आपल्या इच्छेप्रमाणें आचार ठेवण्याचा पूर्ण हक्क असून त्याचें वर्तन आपणांस अप्रिय असलें तरी त्याच्यावर आपण संतापत नाहीं. या कारणास्तव आपला समाज लोकायत्त आहे असें आपण म्हणतों" असे उद्गार पेरिक्लीजच्या भाषणांत आढळतात. अशा तऱ्हेचें मूलतत्त्वांचें प्रतिपादन ग्रीक वाङ्मयांत पदोपदीं आढळतें. भारताच्या प्राचीन वाङ्मयांत त्याचा पुसट उल्लेखहि सांपडत नाहीं. आणि त्यामुळें भारतांत प्राचीन काळीं लोकशाही अवतरली होती, असें म्हणणें कठिण वाटतें.

व्यक्तीचें मन, बुद्धि, भावना, श्रद्धा व एकंदर कर्तृत्व यांच्या विकासाला पूर्ण अवसर ज्या समाजव्यवस्थेंत मिळतो ती व्यवस्था खरीखुरी लोकायत्त होय. त्या दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानांत धर्माच्या तात्त्विक क्षेत्रांत लोकांना विचार, उच्चार व आचार यांचें पूर्ण स्वातंत्र्य होतें हें सर्वविश्रुत आहे आणि असें असल्यामुळेंच तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत सांख्य, वेदान्त, न्याय, मीमांसा इ० पंथांनीं येथें अतुल असें विचारवैभव निर्माण केलें. ख्रिस्ती धर्मानें मानवी [illegible] सर्व अंगोपांगांवर अत्यंत कडक नियंत्रण [illegible] प्रामाण्याची पराकाष्ठा करून धर्म, [illegible] विज्ञान या प्रत्येक क्षेत्रांत मानवी [illegible] टाकली होती. सध्यांच्या काळांत [illegible] द व मार्क्सवाद यांनींहि मानवी [illegible] ख्रिस्तीधर्माप्रमाणेंच सर्वंकष असें नियंत्रण








अनुक्रमणिका

घातलेलें आहे. तसा प्रकार तत्त्वज्ञान, विज्ञान, कला, साहित्य या क्षेत्रांत भरतखंडांत कधींच झाला नाहीं. त्यामुळें प्राचीन काळीं भारतांत जीवनाचीं हीं अंगें अत्यंत विकसित झालेलीं दृष्टीस पडतात. पण हीं क्षेत्रें सोडून आपण सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांकडे वळलों म्हणजे समता, स्वातंत्र्य, व्यक्ति-विकासाची संधि यांचा हळू हळू संकोच होत असलेला दिसतो. म्हणजे या क्षेत्रांत, येथें लोकशाही ओहोटीस लागलेली दिसते. सामाजिक क्षेत्रांत 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्' अशांसारखे विचार महाभारतांत सांपडतात. शूद्र गुणी असेल, तर तो राजपदावर येण्यासहि हरकत नाहीं असेंहि सांगितलेलें आढळतें. पण एकंदरींत पाहातां समाजव्यवस्थेंत समता, स्वातंत्र्य या तत्त्वांचा अवलंब केलेला आढळत नाहीं. राजकारणाविषयीं वर सांगितलेंच आहे. समता, जागरूकता, प्रबुद्धता, राजसत्तेवर नियंत्रण घालण्यासाठीं तिच्याशीं संग्राम करण्याची सिद्धता व या सर्वांचें समर्थन करणारें तत्त्वज्ञान हें आपल्या प्राचीन इतिहासांत मुळींच दिसत नाहीं. आर्थिक क्षेत्रांतील समता व हक्क यांची तर कल्पनासुद्धां येथें नव्हती असें दिसतें. राजकीय व आर्थिक क्षेत्रांतील लोकसत्ता हाच लोकशाहीच्या सर्व मंदिराचा पाया असल्यामुळें, भारतांत लोकशाहीचा उदय झाला होता असें म्हणणें सयुक्तिक वाटत नाहीं.

### अथेन्स : लोकशाहीचें उगमस्थान

लोकशाहीचा उदय ग्रीसमध्यें व निश्चित म्हणजे अथेन्समध्यें झाला हा पाश्चात्त्यांचा अभिमान आजपर्यंत पुराव्यावरून पाहतां सर्वथैव सयुक्तिक आहे व समर्थनीय आहे, असें मान्य करणें भाग आहे. लोकशाही आपल्या सर्व अंगोपांगांसह, सर्व मूलतत्त्वांसह, सर्व वैभवासह अथेन्समध्येंच प्रथम अवतरली हें खरें आहे. खिस्तपूर्व ७ व्या शतकाच्या अखेरीला अथेन्सच्या नगरराज्यांत खानदानी सत्ता होती व विषमता, जुलूम, अन्याय, शोटिंगशाही, लांचलुचपत, अधमपणा यांचा तेथें अगदीं कळस झाला होता. अशा स्थितींत सोलन या नांवाचा नेता तेथें अवतीर्ण झाला व त्यानें धनिकवर्ग व कष्टकरी वर्ग यांच्या एकांतिक मागण्यांना सामोपचारानें, मतपरिवर्तनानें मुरड घालून त्यांच्यांत समेट घडवून आणला आणि अथेन्सची नवी घटना करून, तिला सर्वांकडून मान्यता मिळविली. हें करतांना सोलननें तरवार तर वापरली नाहींच, पण जहरी किंवा कडवट भाषाहि वापरली नाहीं ! अथेन्समधील दोन्हीं वर्गांनीं, त्यांच्या नेत्यांनीं व एकंदर सर्व नागरिकांनीं ही जी विवेकी वृत्ति प्रकट केली ती वृत्ति म्हणजेच समेटाची, तडजोडीची, सहिष्णुतेची वृत्ति हा लोकशाहीचा पाया होय. इतिहासाचा सामान्य नियम असा होता आणि अजूनहि जगांतल्या बहुतेक देशांत तोच जारी आहे कीं, अशा वेळीं लोक एकेरीवर येऊन कांहीं तरी उत्पात घडतो, बंडाळ्या माजतात आणि त्यामुळें शेवटीं कोणी तरी प्रबल शास्ता पुढें येऊन आपली दण्डसत्ता प्रस्थापित करतो. देवाण-घेवाण करावी, तडजोड करावी, भावनांना आवर घालावा हा विवेक जगांत दुर्मिळ आहे. आणि हा दुर्मिळ विवेक सोलनच्या नेतृत्वानें अथीनी लोकांनीं प्रकट केल्यामुळेंच अथेन्समध्यें एक अद्भुत चमत्कार घडून आला. लोकशाहीची प्रस्थापना हाच तो चमत्कार होय. विल् ड्यूरांट या महापंडितानें म्हटलें आहे कीं, 'सोलननें सामोपचारानें अथेन्समध्यें ही जी क्रांति घडवून आणली ती म्हणजे जगांतला अद्भुत, पण आशादायक असा चमत्कार आहे.'

अथीनी लोकांनीं ही जी सामवृत्ति किंवा समेटवृत्ति जोपासली, तिच्यामुळें राजकीय व आर्थिक समतेची त्यांना कांहीं अंशीं तरी प्रस्थापना करतां आली. सोलनमागून आलेल्या पेरिस्ट्राटस् व क्लेईस्थेनीस् या नेत्यांनीं धनिकांच्या संपत्तीचा निचरा करून जमिनीचें फेरवांटप केलें. कष्टकरी लोकांना जमिनी दिल्या. धनिकवर्गाचे खानदानी अधिकार त्यांनीं पुष्कळसे नष्ट केले व सुखसाधनें व सम-संधि हीं गरिबांच्या पुष्कळशीं आटोक्यांत आणून ठेविलीं. यामुळें जवळजवळ दोनशें वर्षें अथेन्समध्यें शेतकऱ्यांच्या बंडाळ्या झाल्या नाहींत व ग्रीकसमाज संघटित व समर्थ झाला. इराणी सम्राटांचीं ग्रीसवर भयंकर आक्रमणें सुरू झालीं त्याआधीं 'कसेल त्याची जमीन' व 'लोकाधीन सरकार' या

कल्पना अथेन्समध्यें प्रत्यक्षांत अवतरल्या होत्या- ('दि लाइफ ऑफ ग्रीस'–विल् ड्यूरांट पृ. १३६).

सोलनपासून रोमन आक्रमणापर्यंत म्हणजे ख्रिस्तपूर्व ७ व्या शतकापासून तिसऱ्या शतकापर्यंत खानदानी सत्ता व सामान्य जन यांच्यांत सत्तासंपादनासाठीं अखंड संग्राम चालू होता आणि याच काळांत अथीनी लोकशाहीचा उदय, विकास व परिणति होऊन, लोकशाही जीवनाला आवश्यक असलेला प्रत्येक घटक तेथें केव्हां ना केव्हां तरी लोकांना दर्शन देऊन गेला. सत्तासंपादनासाठीं व प्रस्थापित शासनावर नियंत्रण ठेवण्यासाठीं अखंड संग्राम करणें हा लोकशाही जीवनांतील पहिला घटक होय. शास्त्यांच्या कारभारावर शासितांचा अखंड, जागरूक पहारा असणें हें लोकशाचें पहिलें लक्षण होय. यामुळेंच लोकशाही या शब्दाला अर्थ निर्माण होतो. भारतांत लोकांनीं, नागरिकांनीं अशी जागरूकता ठेवून सत्ताधिष्ठित वर्ग मदमत्त होतांच त्याच्याशीं संग्राम करून त्याला वेसण घातल्याचें उदाहरण नाहीं. येथील जनता अशी जागरूक नसे, राजसत्तेविषयीं ती सर्वस्वीं उदासीन असे असें इतिहास सांगतो. आणि दुर्दैव असें कीं ही गोष्ट भूषणावह होती, हेंच भारताच्या ग्रामव्यवस्थेचें वैभव होतें, असें अलीकडे मानलें जातें. तें कसेंहि असो. भारतीय जनतेंत राज्यसत्तेविषयीं पूर्ण औदासीन्य होतें हें खरें आहे. ग्रीस-रोममध्यें सर्व जनतेला मताचे अधिकार कधींच मिळाले नाहींत हें खरें असलें, तरी ती जनता जमिनीसाठीं, सुखसाधनांसाठीं, संधिसमानतेसाठीं, अधिकारासाठीं व राजकीय हक्कांसाठीं सारखी संग्राम करीत होती यांत शंकाच नाहीं. रोममध्यें पॅट्रीशियन्स व प्लीबियन्स यांचा ख्रिस्तपूर्व ५०० पासून सीझरच्या वधापर्यंत म्हणजे पहिल्या शतकापर्यंत, राजकीय हक्कांसाठीं व जमिनीच्या वाटण्यासाठीं सारखा संघर्ष चालू होता. हा संघर्ष हें लोकशाहीचें आद्य लक्षण होय, इतकेंच नव्हे, तर लोकशाहीचे इतर घटक यांतूनच निर्माण होत असतात, हें विसरतां कामा नये. भारतांत जनता व खानदानी किंवा व्यापारी वर्ग यांच्यांत असा संग्राम दीर्घकाल तत्त्वनिष्ठेनें चालल्याचें एकहि उदाहरण नाहीं.

या अखंड संग्रामामुळेंच व्यक्तीच्या ठायीं व्यक्तित्व जागृत होतें. तिच्या मनावरील इतरांचें वर्चस्व नष्ट होऊन प्रत्येक क्षेत्रांत स्वतंत्र विचार व कृति करण्याचें धैर्य व सामर्थ्य तिच्या ठायीं यांतूनच निर्माण होतें. म्हणजे या संग्रामांतूनच सॉक्रेटीस निर्माण होतो. दीर्घचिंतनामुळें, अनुभवामुळें आपल्या बुद्धीचा झालेला निश्चय हा प्राणांताचा प्रसंग आला तरी न सोडण्याचें जें नीतिधैर्य सॉक्रेटिसानें दाखविलें तें आगरकरांच्या काळापर्यंत भारताला अपरिचित होतें. त्याग, आत्मार्पण हेंच भारताला माहीत नव्हतें, असा याचा अर्थ नव्हे; तर व्यक्ति–विरुद्ध–समाज या संग्रामांतील नीतिधैर्य येथें नव्हतें. लोकशाहीला त्याची आवश्यकता असते. चौकशीच्या वेळीं सॉक्रेटिसानें शेवटीं सभासदांना स्वच्छ सांगितलें : 'अथीनी जनहो, तुम्ही मला शिक्षा करा किंवा दोषमुक्त करा; माझा क्रम मी बदलणार नाहीं. मग मला अनेक वेळां मृत्यु आला तरी चालेल.' अथेन्समध्यें लोकसत्तेचा उदय झाला असें म्हणण्याचें कारण सॉक्रेटिसाचें हें वचन होय.

जनतेची राजकीय हक्कांविषयींची जागरूकता, राजसत्तेशीं संग्राम करण्याची सिद्धता, व्यक्तीचें समाजाविरुद्ध एकाकी उभें राहण्याचें नीतिधैर्य यांप्रमाणेंच आर्थिक समतेच्या प्रस्थापनेचे प्रयत्न हाहि लोकसत्तेचा अवश्य घटक होय. राजकीय क्षेत्रांतील जागृति व प्रबुद्धता ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट होय. पण या प्रबुद्धतेतून हस्तगत झालेली राजकीय सत्ता ही आर्थिक समतेवांचून फोल ठरते. म्हणून राजकीय व आर्थिक समता या जवळजवळ अविभाज्यच मानलेल्या आहेत. ग्रीस व रोम या दोन्ही देशांत आर्थिक समतेचा संग्राम प्रारंभापासून अखेरपर्यंत चालू होता आणि त्या संग्रामामुळेंच प्रारंभींच्या काळीं स्वतंत्र मालकी हक्क असलेला शेतकरीवर्ग या दोन्ही भूमींत निर्माण झाला. लोकशाहीला असा शेतकरीवर्ग अवश्य आहे असें अरिस्टॉटलचें मत होतें. रोमनें कार्थेजचा व ग्रीसचा पाडाव केला आणि भूमध्यसमुद्राभोंवतीं आपलें साम्राज्य स्थापन केलें तेव्हां परदेशांतून अपार धन व गुलाम देशांत आले. त्यामुळें शेतकऱ्याच्या कष्टाचें मोल नाहींसें होऊन तो वर्ग








नाहींसा झाला. त्याबरोबर रोमन लोकसत्ता ऱ्हास पावूं लागली. तेव्हां आर्थिक समता व तिच्यासाठीं होणारा संग्राम हा लोकसत्तेला कसा अवश्य आहे तें कळून येईल. भारतांत अशा आर्थिक संग्राम कधींहि झाला नाहीं. राज्यसत्तेविषयीं लोक उदासीन असत म्हणून तेथें संग्राम नाहीं आणि आर्थिक क्षेत्रांत शेतकरी हा दैववादी होता म्हणून त्यानें तेथेंहि कधीं संग्राम केला नाहीं. युगानुयुगें तो दीन, दरिद्री व दुबळा असाच राहिला. अशांच्या जिवावर लोकसत्ता उभारली जात नाहीं.

### रोमची ' कायद्याच्या राज्या 'ची देणगी

आर्थिक विषमता, अन्याय, जुलूम हीं सर्व देशांतच चालूं असतात. त्यामुळें कष्टकरी वर्ग यातना असह्य होऊन बंडाळ्याहि सर्व देशांत करतो. विषमता, उत्पात, बंडाळ्या, कत्तली व पुन्हां राजसत्तेची स्थापना हाच सर्व देशांचा इतिहास आहे. यांतून लोकशाही निर्माण होत नाहीं. तिच्यासाठीं एका गोष्टीची आवश्यकता असते. धनिक व दलित अशा दोन्ही वर्गांच्या ठायीं सामवृत्ति किंवा समेटवृत्ति नसेल, तर शतकानुशतकें उत्पात व बंडाळ्या होत राहतात. पण त्यांतून कांहींच निष्पन्न होत नाहीं. ग्रीसमध्यें सोलन, पेरिस्ट्राटस् यांच्या काळीं ती कशी निर्माण झाली होती तें वर सांगितलेंच आहे. रोमचा इतिहास असाच आहे. ख्रिस्तपूर्व ५०८ च्या सुमारास रोमन लोकसत्ताक स्थापन झालें. त्या वेळीं कनिष्ठ वर्गा-( प्लीबियन्स )विरुद्ध अनेक जुलमी कायदे रूढ झाले होते. ते रद्द करावे अशी त्यांनीं मागणी केली व त्याचबरोबर कनिष्ठ वर्गांतलेहि न्यायाधीश नेमले जावे व वरिष्ठ व कनिष्ठ वर्गांमध्यें विवाहबंदी नसावी अशा आणखी मागण्या करून, त्यांनीं ' या अमान्य झाल्या तर युद्धकाळीं आम्ही असहकार करूं ' अशी धमकी दिली. पॅट्रीशियन्सनीं या वेळीं व पुढें तीन-चार झगडे झाले त्या वेळीं कनिष्ठ वर्गांच्या मागण्या मान्य करून समेट केला व त्यामुळें रोमचा व जगाचा इतिहास बदलला. इतर देशांत धनिक लोक ही सामवृत्ति धरीत नाहींत म्हणून तेथील इतिहास नेहमींच्या ओघांतून वाहत राहतो.

वरिष्ठ व कनिष्ठ या दोन्ही वर्गांच्या ठायीं सामोपचारवृत्ति असली म्हणजे त्यांतूनच कायद्याची सत्ता आणि कायद्याचें राज्य निर्माण होतें व लोकशाहीची परिणति होते. ' कायद्याचें राज्य ' ही रोमनें जगाला दिलेली सर्वांत मोठी देणगी होय. ग्रीसमध्यें सोलनची सामवृत्ति व घटना आणि कायदा यांचें राज्य होतेंच. त्यांवांचून लोकशाहीला अर्थच निर्माण होत नाहीं. पण रोमनें हा प्रयोग फार मोठ्या प्रमाणावर करून दाखविला. ऑक्टेव्हियस सीझरपासून रोमन लोकसत्तेचा अंत झाला. पण त्यानंतर प्रस्थापित झालेल्या साम्राज्यांतहि कायद्याचें राज्य किती तरी शतकें चालूं होतें आणि हा कायदा साम्राज्यांतील सर्व प्रदेशांना सारखाच लागू केला गेल्यामुळें, लोकशाहीला अवश्य असलेल्या समता, हक्क इत्यादि कल्पनांचा प्रसार अत्यंत मोठ्या प्रमाणावर होऊन, प्राचीन काळांत लोकशाहीचीं तत्त्वें प्रयोगांत येऊन गेलीं, हा जगाला मोठा लाभ झाला.

### प्राचीन ग्रीक व रोमन लोकसत्तेंतील वैगुण्यें

प्राचीन काळीं ग्रीस व रोम या दोन देशांत लोकसत्तेचे प्रयोग झाले. लोकसत्तेचें तत्त्वज्ञान तेथील पंडितांनीं निर्माण केलें व त्याअन्वयें शासनसंस्था स्थापून आपल्या भूमीचा कारभार या नव्या पद्धतीनें चालविण्याचे या दोन्ही देशांतील नेत्यांनीं दीर्घकालपर्यंत प्रयत्न केले. पण लोकसत्तेच्या परिणतीपासून ते फार दूरच राहिले हें विसरतां कामा नये. या दोन्ही लोकसत्तांत दोन फार मोठीं वैगुण्यें होतीं. पहिलें वैगुण्य असें कीं, त्या काळीं लोकसत्तेच्या विचारांचें आवाहन सर्व वर्गांना जरी पोंचत होतें तरी फार अल्पसंख्य वर्ग खरा सत्ताधारी होता. कोणाच्या मतें अथेन्स व रोममध्यें शंभरांपैकीं पंचवीस व कोणाच्या मतें दहा लोकच नागरिक असत व मतदानाचा हक्क तेवढ्यांनाच होता. गुलामांची संख्या फार मोठी होती. त्यांना तर कसलेच—जगण्याचेसुद्धां—हक्क नव्हते. पण हे गुलाम वगळले तरी जनतेंतील एक फार मोठा विभाग मताधिकारशून्यच होता. व्यापारी, कारागीर, शेतकरी, स्त्रिया यांना मुळींच मताधिकार नसे. ज्याला स्वतःच्या उपजीविकेसाठीं कष्ट करावे

लागतात तो मनुष्य त्या काळीं अत्यंत हीन समजला जात असे. असा मनुष्य संस्कृतिहीन असणार व नेतृत्व, राज्यकारभार हीं कामें करण्याची ऐपत त्याच्या ठायीं असणें शक्य नाहीं, असा तेव्हां समज होता. त्यामुळें शेंकडा १०-१५ च्या वर लोकांना या क्षेत्रांत मताधिकारी म्हणूनहि प्रवेश मिळत नसे. म्हणजे ही लोकशाही अत्यंत मर्यादित होती.

पण दुसरें वैगुण्य यापेक्षां फार मोठें आहे. शिस्त व स्वातंत्र्य, व्यक्तित्व व संघटना यांचा समन्वय घालणें ही अत्यंत अवघड गोष्ट आहे. व्यक्तीला स्वातंत्र्य देणें याचा अर्थ शिस्त पाळण्याची, कायदा आपण होऊन मानण्याची, संघटितपणा फुटूं न देण्याची जबाबदारी तिच्यावर टाकणें असा आहे. स्वातंत्र्य नसेल तेव्हां समाजाला अवश्य ती शिस्त, व्यवस्था व संघटना हीं दण्डसत्तेनें टिकवितां येतात. आणि जगांत सर्वत्र हीच रीत रूढ आहे. समाज संघटित ठेवण्याची दण्डसत्ता ही एकच युक्ति बहुतेकांनीं अवलंबिलेली असते. पण या दण्डसत्तेमुळें व्यक्तीच्या गुणांना अवसर मिळत नाहीं व शेवटीं समाज कुजून हतबल होतो, असा अनुभव आहे. बरें, स्वातंत्र्य द्यावें तर विघटना माजून तिकडून समाज हतबल होतो. अशी ही समस्या आहे. अथेन्सला ही सोडवितां आली नाहीं. विघटना, फुटीरपणा, कलह, यादवी यांना हे लोक आवर घालूं शकले नाहींत. स्पार्टा, थीब्स, कारिंथ, अथेन्स हीं भिन्न ग्रीक संस्थानें संघटना करूं शकलीं नाहींतच. पण एकटें अथेन्सहि दुर्भेद्य संघटना निर्माण करूं शकलें नाहीं. त्यामुळें मॅसिडोनच्या फिलिपच्या दण्डायत्त संघटित आक्रमणापुढें त्याचा टिकाव लागला नाहीं व अशा रीतीनें अथीनी लोकसत्तेचा अंत झाला. रोमची कथा ग्रीसच्या तुलनेनें जरा बरी आहे इतकेंच. प्रारंभीच्या काळांत ग्रीस संघटित झाला होता तेव्हां त्यानें इराणच्या प्रचंड आक्रमणास धूळ चारली. त्याचप्रमाणें रोमनें प्रारंभीच्या काळांत सामर्थ्याची जोपासना करून कार्थेज बुडविलें. पण स्वातंत्र्य व सामर्थ्य यांचा समन्वय घालणें पुढें त्याला जमलें नाहीं. जगांत लोकसत्ता अपयशी होतात त्याचें बहुधा हें एकच कारण असतें. हा समन्वय तेथील समाजाला साधत नाहीं. रोमचीं प्रारंभींचीं वर्षें बरीं गेलीं. पुढें साम्राज्यविस्तार झाला व बाहेरची संपत्ति व गुलाम देशांत अमाप आल्यामुळें विषमता पराकाष्ठेला गेली. वास्तविक विपुलता, सधनता, समृद्धि ही लोकशाहीला अत्यंत उपकारक असते. इंग्लंडनें साम्राज्यांतून येणाऱ्या धनाच्या जोरावरच घरचीं लोकशाही टिकविली. पण रोमन लोकांना साम्राज्यांतून मिळणारी संपत्ति पचवितां आली नाहीं. मद्यासारखी ती त्यांच्या मस्तकांत चढूं लागली; त्यांची साम्यवृत्ति, त्यांचा विवेक, त्यांचें कर्तृत्व यामुळें नष्ट झालें व मुख्य म्हणजे रोमन लोकांच्या संघटित समाजाचीं शकलें होऊन तो छिन्नभिन्न झाला ! खिस्तपूर्व १४५ सालीं शेतकऱ्यांच्या बंडाची उठावणी झाली आणि तेथून जी यादवी माजली तिनें रोमला कांहीं काळ कत्तलखान्याचें रूप आलें. मॅरियस, सुला, पॉंपे, सीझर यांनीं स्वकीयांच्याच किती कत्तली केल्या असतील याला गणती नाहीं. यामुळें शेवटीं सामान्य जन कंटाळून गेले व ऑगस्टस सीझरनें शांतता प्रस्थापित करतांच त्याच्या साम्राज्याचें त्यांनीं मनापासून स्वागत केलें.

'भेदमूलो विनाशो हि गणानां उपलक्षये' असें भारतांतील लोकायत्त शासनाविषयीं महाभारतांत म्हटलें आहे. ग्रीस व रोम येथील लोकसत्तांविषयीं हेंच झालें. त्यांचा जीव अत्यंत लहान होता तेव्हां त्यांची संघटना कशीबशी टिकली. पण अनेक नगर-राज्यें एका संघटनेंत आणणें त्यांना केव्हांच शक्य झालें नाहीं. या व यांतूनच निर्माण होणाऱ्या इतर अनेक समस्या सोडवितां न आल्यानें या लोकसत्तांचा लोप झाला. आतां असें असलें तरी अथेन्स व रोम यांचें जग ऋणी आहे. पहिले प्रयोग या दृष्टीनें तरी त्यांच्या लोकसत्तांचें फार महत्त्व आहे. त्यांनीं लोकसत्तेचें तत्त्वज्ञान सिद्ध केलें, त्याअन्वयें प्रत्यक्ष शासन प्रस्थापित केलें व त्यांतून आलेल्या सर्व अनुभवांची नोंद करून ठेविली. अर्वाचीन कालांतील लोकसत्तांना त्यांचा दीपस्तंभासारखा उपयोग होईल.

### तमोयुग व त्यानंतर लोकशाहीचा पुनर्जन्म

रोमन साम्राज्याच्या विलयानंतर खिस्ती धर्माचा

प्रसार सर्व युरोपभर झपाट्यानें झाला. या धर्माच्या आचार्यांनीं मानवाच्या सर्व जीवनावर अत्यंत कडक नियंत्रणें घातल्यामुळें युरोपांत तमोयुग निर्माण झालें आणि सर्वच क्षेत्रांतली मानवाची प्रगति खुंटून गेली. ही स्थिति हजार वर्षे चालू होती. त्यानंतर ग्रीक व रोमन विद्यांच्या पुनरुज्जीवनामुळेंच युरोपीय देशांत चैतन्य निर्माण होऊन पुन्हां लोकशाहीला पोषक अशा व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य, समता इत्यादि तत्त्वांचा प्रसार होऊं लागला. अथेन्स व रोम हीं दोन शरीरें पतन पावल्यावर लोकशाहीचा आत्मा जो अंतराळांत अगतिक होऊन भ्रमत राहिला होता त्याला इंग्लंडच्या भूमींत पुन्हां शरीरप्राप्ति झाली व लोकशाहीचा पुनर्जन्म झाला.

स्वातंत्र्य व शिस्त, बुद्धिप्रामाण्य व संघटना, व्यक्तित्व व सामर्थ्य यांचा समन्वय साधण्याचें जें दुर्घट कार्य अथीनी व रोमन् यांना साधलें नाहीं तें इंग्लिशांनीं साधलें आणि लोकशाहीच्या प्रगतीचा पुढचा पल्ला गांठला. १२१५ सालीं जॉन राजाकडून मॅग्ना चार्टावर सही घेतल्यानंतर व्यक्तिस्वातंत्र्य, राजकीय हक्क, भाषण-मुद्रण-स्वातंत्र्य यांना विघातक होईल असें कसलेंहि बंधन राजसत्तेला घालूं द्यावयाचें नाहीं, असा इंग्लिशांचा कृतनिश्चय झाला आणि त्याचबरोबर या निश्चयामागें जें सामर्थ्य लागतें तें टिकून राहावें म्हणून समाजसंघटनेला विघातक असें कोणतेंहि कृत्य करावयाचें नाहीं, काय वाटेल तें झालें तरी दौर्बल्य निर्माण होईल अशीं समाजाचीं शकलें होऊं द्यावयाचीं नाहींत, असाहि त्यांनीं निश्चय केला आणि हाच प्रयोग सातशें वर्षे चालू ठेवून व्यक्तित्व व सामर्थ्य यांचा समन्वय शक्य आहे, हें आज ब्रिटिशांनीं जगाला सिद्ध करून दाखविलें आहे.

इंग्लिशांनीं तेराव्या शतकांत आपल्या भूमींत लोकशाहीच्या बीजारोपणास सुरुवात केली. त्याच वेळीं फ्रान्स, जर्मनी, हंगेरी, पोलंड या देशांतील लोकांनींहि तोच उपक्रम सुरू केला होता. फ्रान्समध्यें स्टेट्स् जनरल, जर्मनींत डाएट व इतरहि यांसारख्याच लोकसभा प्रस्थापित झाल्या होत्या. पण अशा लोकसभा हें लोकशाहीचें केवळ बाह्य रूप होय, केवळ सांगाडा होय. त्यांत स्नायू, मांस, रुधिर, मेद यांची भर झाली नाहीं व त्यांतून आत्मतत्त्व निर्माण झालें नाहीं, तर लोकशाही निर्माण न होतां तिचें भूत मात्र लोकांच्या मानगुटीस बसतें. संघटना टिकवून धरण्यास जीं पथ्यें पाळावीं लागतात, तीं या देशांनीं कधींच पाळलीं नाहींत. क्षुद्र स्वार्थ त्यांनीं टाकले नाहींत. जनहिताची चिंता केली नाहीं. व्यापक राष्ट्रीय दृष्टीचा अवलंब केला नाहीं. स्वमताच्या आग्रहासाठीं ज्या यातना सोसाव्या लागतात त्या सोसण्याची सिद्धता दाखविली नाहीं. परमताविषयीं जी सहिष्णुता अंगीं बाणवावी लागते ती बाणविली नाहीं. त्यामुळें राजसत्तेशीं संग्राम करून तिच्यावर त्यांना कधींच मात करतां आली नाहीं. आणि त्या देशांतील जनता या सत्तेच्या गुलामगिरींतून मुक्त झाली नाहीं.

पुढें धर्मसंग्राम सुरू झाला. राजसत्ता, धर्मसत्ता सरंजामसत्ता व धनसत्ता यांच्या वर्चस्वांतून मुक्त झाल्यावांचून लोकशाहीला अवश्य अशी कणखर मनोवृत्ति निर्माण होत नाहीं. या सत्तांशीं लढून ही मनोवृत्ति ज्यांनीं जोपासली त्यांनाच लोकशाही यशस्वी करतां आली. लूथरच्या चळवळीमुळें युरोपांत धर्मसत्तेविरुद्ध संग्राम सुरू झाला. तेथपासूनच्या तीनशें वर्षांच्या इतिहासावरून असें दिसतें कीं, त्या काळांत कॅथॉलिक वर्चस्वाखालीं जे देश राहिले त्यांची लोकशाहीच्या दृष्टीनेंच नव्हे, तर कोठल्याच दृष्टीनें प्रगति झाली नाहीं. इटली, स्पेन, पोलंड, दक्षिण जर्मनी, हंगेरी हे देश कॅथॉलिक धर्मसत्तेचे गुलाम राहिले. त्यामुळें ते अगदीं अवनतीस पोहोंचले. फ्रान्सवरहि कॅथॉलिक वर्चस्व होतें. पुढें रूसो, व्हाल्टेर यांच्या प्रयत्नानें तेथें अलौकिक अशी क्रान्ति घडून आली. मानवी मन, बुद्धि, भावना, श्रद्धा, कर्तृत्व यांच्या विकासाला अवसर देणारी समाजरचना असा लोकशाहीचा व्यापक अर्थ आहे. तो अवसर ज्या मानानें, जेवढ्या क्षेत्रांत मिळेल, तेवढ्यापुरती तेथें लोकशाही आहे असें म्हणावयास हरकत नाहीं, हें मागें भारताच्या लोकराज्याचें विवेचन करतांना सांगितलें आहे. या अर्थानें पाहतां लोकशाही ही प्रगतीशीं समानार्थक असून दण्डसत्ता ही तद्विरोधी आहे. ख्रिस्तीधर्मानें मानवाच्या जीवनाच्या सर्वच अंगोपांगांवर करकचून बंधनें घातलीं; त्यामुळें जीं जीं राष्ट्रें कॅथॉलिक पंथाला किंवा पूर्व








युरोपांतील 'ऑर्थॉडॉक्स' पंथाला दृढ धरून बसलीं त्यांची प्रगति झाली नाहीं. त्या लोकांच्या मनाच्या, बुद्धीच्या विकासाला राजकीय, सामाजिक, वैज्ञानिक, धार्मिक, साहित्य-कलाविषयक अशा कोणत्याच क्षेत्रांत स्वातंत्र्य मिळालें नाहीं. त्यामुळें तेथें हा अवसर मिळेपर्यंत तमोयुगच राहिलें. हॉलंड, उत्तर जर्मनी, फ्रान्स, स्वित्झरलंड व अमेरिका हीं राष्ट्रें प्रॉटेस्टंट-पंथाश्रयी झालीं. याचा अर्थ इतकाच कीं, त्यांनीं बुद्धिप्रामाण्याचा आश्रय केला. त्याबरोबर लोकशाहीच्या मार्गानें त्यांची वाटचाल सुरू झाली व ज्या मानानें लोकशाहीचा वर दिलेला व्यापक अर्थ त्यांनीं प्रत्यक्षांत आणण्याचा प्रयत्न केला त्या मानानें त्यांना ध्येयसिद्धि मिळविण्यांत यश आलें.

धर्मसंग्रामानंतर पुढें सरंजामसत्ता व धनसत्ता यांच्याशीं संग्राम झाले. त्याहि काळांत व्यक्तित्वावर आघात होऊं द्यावयाचा नाहीं व संघटना फुटूं द्यावयाची नाहीं हीं मतें इंग्लंड व अमेरिका या राष्ट्रांनीं एकनिष्ठेनें पाळलीं व त्यामुळें आपली लोकसत्ता टिकवून तिची बऱ्याच अंशानें त्यांना परिणति करतां आली. सरंजामशाहीशीं भयानक लढा झाला तो फ्रान्समध्यें. रूसो, व्हाल्टेअर, डिडेरो, मॉटेस्क यांनीं बुद्धिप्रामाण्य, मानवी हक्क, ज्ञाननिष्ठा, समता, बंधुता, स्वातंत्र्य, कायद्याचें राज्य हीं तत्त्वें अत्यंत प्रभावीपणें युरोपांत पसरून दिलीं. त्याच्यानंतर नेपोलियनच्या तलवारीनें त्याच तत्त्वांचा, अभावितपणें का होईना, पण झंझावाती प्रचार केला व युरोपांतील सरंजामशाही धुळीस मिळविली. पण हें सर्व झालें तरी विवेक, समंजसता, सहिष्णुता, सामवृत्ति यांची जोपासना युरोपांतील हीं राष्ट्रें करूं शकलीं नाहींत. व्यक्तित्व, स्वातंत्र्य, मानवी समता, ज्ञाननिष्ठा हीं तत्त्वें आगीसारखीं आहेत. विवेकानें त्यांना नियंत्रणांत ठेवून त्यांच्या शक्तीला योग्य वळण लावलें तर तीं पशूचा मानव करतात. नाहीं तर मानव होण्याच्या प्रक्रियेंत या आगीमुळें समाजचे समाज दग्ध होऊन जातात! ब्रिटन आणि अमेरिका हीं दोन मोठीं राष्ट्रें व हॉलंड आणि स्वित्झर्लंड हीं लहान राष्ट्रें यांच्याखेरीज जगांत अजून या तत्त्वांची उपासना करण्यांत कोणीहि यशस्वी झालेलें नाहीं.

व्यक्तित्वाची जोपासना करणें व ती करूनहि समाज संघटित राखणें या दोन गोष्टी ब्रिटननें केल्या. याखेरीज लोकशाहीच्या प्रगतीच्या दृष्टीनें ब्रिटननें आणखी एक कार्य केलें आहे. तें म्हणजे लोकशाहीचा परिघ जनतेच्या शेवटच्या थरापर्यंत वाढविणें हें होय. ग्रीस व रोम येथें व्यक्तिस्वातंत्र्य, समता, मूलभूत हक्क, लोकांचें सार्वभौमत्व हीं तत्त्वें प्रस्थापित झालीं होतीं. पण वर सांगितल्याप्रमाणें त्यांचा प्रत्यक्ष आचार अत्यंत अल्प समाजांत होता. या नव्या धनाचा लाभ एक-दशांशांनाच फक्त मिळे. ब्रिटनमध्यें प्रारंभीं असेंच होतें. पण हळू हळू तेथील लोकसत्तेचें क्षेत्र व्यापक होऊं लागलें व आतां जनतेचें राज्य म्हणजे सर्व—अगदीं सर्व—जनतेचें राज्य ही कल्पना ब्रिटिशांनीं मूर्त रूपास आणली आहे. समाजांत निर्माण होणारीं सर्व प्रकारचीं धनें—आर्थिक, सांस्कृतिक, वैचारिक, कलाविषयक—समाजांतल्या प्रत्येक व्यक्तीच्या कक्षेंत त्यांनीं आणून लोकशाही हा शब्द सार्थ केला आहे. अशा रीतीनें ग्रीक व रोमन या आपल्या पूर्वजांनीं निर्माण केलेलें तत्त्वज्ञान स्वीकारून, त्यांचे अनुभव जमेस धरून, इंग्लंडनें लोकशाहीच्या मंदिराची पुन्हां उभारणी करण्याचा निश्चय केला व सात शतकांच्या दीर्घ श्रमानें, तपश्चर्येनें व कर्तृत्वानें तें मंदिर पुरें करून आतां त्याच्यावर कळस चढविला आहे. ब्रिटननें केलेली मानवतेची ही सेवा अनन्यसाधारण अशी आहे.

### मार्क्सवाद आणि 'नवी लोकसत्ता'

ब्रिटनची अशी प्रगति चालू असतांनाच गेल्या शतकांत मार्क्सवादाचा उदय झाला. रूसो-व्हाल्टेर यांनीं सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील समतेचें तत्त्वज्ञान सांगितलें. मार्क्सनें आर्थिक क्षेत्रांतील समतेचें तत्त्व सांगून त्यापेक्षांहि शतपटींनीं जास्त खळबळ जगांत निर्माण केली. समाजांत जें जें धन निर्माण होईल त्या सर्वांवर सर्व समाजाचा हक्क आहे, त्या सुखसमृद्धीचा वांटा प्रत्येक व्यक्तीस मिळालाच पाहिजे, या मार्क्सच्या प्रतिपादनामागें कोणचीहि सिद्धांतसरणी असली व तिच्याविषयीं कितीहि मतभेद असला, तरी सत्ताधाऱ्यांविरुद्ध, मदोन्मत्त राजसत्तेविरुद्ध अखिल जनतेनें संग्रामास सिद्ध








होण्याची त्यामुळें जगांतल्या प्रत्येक देशांत जी प्रेरणा मिळाली आहे, तिच्यामुळें लोकशाहीच्या प्रगतीस फार मोठें साहाय्य होईल यांत शंका नाहीं. आज जगांत एकहि लहान-मोठा, जुना-नवा, पौर्वात्य व पाश्चात्त्य देश नाहीं कीं, जेथें मार्क्सचा संदेश जाऊन पोंचला नाहीं व लोक धनिकांविरुद्ध संग्राम करण्यास सिद्ध झाले नाहींत! अन्यायाचा संताप येऊन त्याविरुद्ध लढा करण्यास तयार होणें ही मनुष्याच्या व्यक्तित्वाची पहिली खूण आहे. रशिया, चीन, इंडोनेशिया, जपान या पूर्वेकडच्या अत्यंत विस्तीर्ण भूखंडांतील मानवाला त्याच्या या आद्य लक्षणानें संपन्न करण्याचें श्रेय बहुंशीं मार्क्सवादालाच आहे. दुसऱ्या कोणाच्याहि तत्त्वज्ञानानें लोकजागृतीचें इतकें विलक्षण सामर्थ्य प्रकट केलें नव्हतें. सामाजिक प्रबुद्धता निर्माण करण्यांत मार्क्सवाद इतर कोणाच्याहि तत्त्वज्ञानापेक्षां जास्त प्रभावी ठरला, याविषयीं दुमत होईलसें वाटत नाहीं.

पण दुर्दैवानें जगाला उपकारक ठरणाऱ्या मार्क्सच्या सामुदायिक स्वामित्वाच्या सिद्धान्तामागचें तत्त्वज्ञान लोकशाहीला अत्यंत मारक असें आहे. उत्पात, क्रांति याच मार्गानें प्रगति होते, कामगारवर्ग हाच क्रांतीचा नेता होऊं शकतो, अर्थप्रेरणा हीच सर्वंकष असून मानवी संस्कृति म्हणजे तिचेच पडसाद आहेत, धर्म, राष्ट्र या निष्ठा भांडवलशाहीप्रणीत आहेत आणि म्हणून त्यांचा त्याग केला पाहिजे इत्यादि मार्क्सचीं तत्त्वें लोकशाहीला अत्यंत विघातक आहेत. त्यामुळें व त्यांत इतर अनेक नेहमींच्या कारणांची भर पडल्यामुळें रशियांत मार्क्सवादान्वयें जी क्रांति झाली ती लोकशाही निर्माण करूं शकली नाहीं; इतकेंच नव्हे, तर लोकशाही तत्त्वापासून तेथील शासन दिवसेंदिवस दूर जात आहे. मार्क्सवादांत इंग्लंड-अमेरिकेंतील लोकसत्तांची व तेथील पार्लमेंटरी पद्धतीची जी निर्भत्सना केली आहे, तिचा फायदा घेऊन आजच्या सोव्हिएट रशियांतील नेत्यांनीं लोकशाहीसंबंधीं अत्यंत विपरीत अशा कल्पना पसरून दिल्या आहेत. आणि आपली लोकसत्ता ही एक 'नवी लोकसत्ता' आहे असा प्रचार करून फार मोठी धूळफेंक चालविली आहे!

लोकशाहीला सर्व क्षेत्रांतली जागृति व समता अवश्य आहे. पण राजकीय क्षेत्रांतली जागृति, समता व स्वातंत्र्य हीं इतर सर्व क्षेत्रांतली जागृति, समता व स्वातंत्र्य निर्माण करूं शकतात. म्हणून त्या क्षेत्रांतील व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे भाषण, मुद्रण व संघटन यांचें स्वातंत्र्य—हा लोकशाहीचा आत्मा होय. सोव्हिएट रशिया व त्याचीं मांडलिक राष्ट्रें यांनीं नेमका हा आत्मा नष्ट करून जड सांगाड्याचें स्तोम माजविलें आहे. रशियांत आर्थिक विषमता नष्ट झाली असून सुख-समृद्धीचा वांटा सर्वांना मिळतो असा प्रचार केला जातो. हातीं येत असलेल्या प्रमाणांवरून त्यावर विश्वास ठेवणें कधींच शक्य नाहीं. पण तसा विश्वास ठेवला, तरी त्यामुळें सोव्हिएट रशियाचें शासन लोकायत्त पद्धतीचें आहे असें ठरत नाहीं. राजकारण, धर्म, अर्थ, साहित्य, विज्ञान या क्षेत्रांत विचार, उच्चार व आचार यांचें जास्तींत जास्त स्वातंत्र्य जें शासन लोकांना देईल त्यालाच लोकायत्त शासन म्हणतां येईल. तें रशियांत शून्य आहे. तेव्हां तेथें सुबत्ता आहे व आर्थिक समता आहे असें क्षणभर गृहीत धरलें तरी तेथें लोकसत्ता आहे असें म्हणतां येणार नाहीं. ग्रीसमध्यें स्वातंत्र्याचे हे अधिकार लोकांना प्राप्त झाले होते, पण ते अत्यंत अल्पसंख्य लोकांना. पण तेवढ्यासाठीं तेथें फार मोठ्या जनसमूहाला गुलामगिरींत पिचत पडावें लागत होतें. पण त्या वेळीं समाजाला सर्व प्रकारचें धन इतकें अल्प प्रमाणांत मिळत असे कीं, तें सर्वांना सारखें वांटून दिलें असतें, तर सर्वच उपासमारीनें मेले असते. म्हणून ॲरिस्टॉटल्‌सारखे महापंडितसुद्धां गुलामगिरीचें समर्थन करीत. आतांपर्यंतच्या जगांतली एकहि संस्कृति कोणच्या तरी वर्गाला, जमातीला किंवा मानवसमूहाला पायदळीं गाडल्यावांचून निर्माण झालेली नाहीं. पण विज्ञान व यंत्र यांच्या प्रगतीमुळें जगांत मानवाला उपयोगी अशी संपत्ति अफाट प्रमाणावर निर्माण होऊं लागल्यावर कोणालाहि पायांत गाडल्यावांचून लोकशाही प्रस्थापितां येईल अशी आशा विचारवंतांना वाटूं लागली. आणि सोव्हिएट रशियाकडे त्या आशेनें जग पाहत होतें. पण आजपर्यंत जगांत गुलामगिरी, अस्पृश्यता





इत्यादि मानवाला खालीं गाडण्याच्या ज्या पद्धती सत्ताधाऱ्यांनीं अवलंबिल्या होत्या त्यापेक्षांहि भयंकर अशी मजूरवाड्यांची पद्धति प्रस्थापित करून रशियानें मानवाची सर्व संस्कृति काळी करून टाकली आहे व मानवाच्या प्रगतीच्या आशेला हादरा दिला आहे. गुलाम हा केव्हां तरी स्वतंत्र होण्याची शक्यता होती. अस्पृश्याला बायकामुलांत राहतां येत होतें व कांहीं जमीनवतनाचे हक्क होते. पण उरलचें खोरें, सैबेरिया येथील सोव्हिएट रशियाचे 'कॉन्सेन्ट्रेशन कँप' म्हणजे पिशाच्चभूमी आहेत. तेथें मानव जिवंत असतो. त्याच्या बायकामुलांच्या स्मृती त्याला असतात. पण प्रत्यक्ष वा पत्ररूपानें त्यांची भेट शक्य नसते! पूर्वस्मृतींचा जाच असतो, भावी आशा नसते आणि मृत्यूवांचून सुटका अशक्य असते! ग्रीसनें कांहीं मानवांना पशुत्वाला पोंचवून अल्पसंख्यांमध्यें तरी समता व स्वातंत्र्य प्रस्थापित केलें. सोव्हिएट रशियानें दोन-तीन कोटी मानवांना पिशाच्चभूमींत गाडून त्याच्या बदल्यांत जगाला काय दिलें? व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य, समता, सामवृत्ति या उदात्त कल्पनांना मूठमाती!

मार्क्स्‌चें तत्त्वज्ञान पाठीशीं घेऊन चीननें क्रांति केली आहे आणि मार्क्सवादांतील अनेक घातक कल्पना तेथील नेत्यांनीं सोडून दिल्या आहेत. त्यांच्या हातीं सत्ता येऊन दोन-तीन वर्षें झालीं नाहींत तोंच तेथील समृद्धीच्या, समतेच्या, बंधुभावाच्या गोडगोड बातम्या येऊं लागल्या आहेत! यामुळेंच त्याविषयीं मन साशंक होतें. पण अजून चीनविषयीं कांहीं लिहिणें सयुक्तिक नाहीं. माओ व त्याचे सहकारी यांनीं तेथें अलौकिक क्रांति केली आहे, यांत शंका नाहीं. पण लोकशाहीला अवश्य असणाऱ्या वृत्तींची ते जोपासना करी करतात, करतात कीं नाहीं, का 'नव्या लोकशाही'ला तेहि बळी पडतात, तें अद्याप ठरावयाचें आहे.

## नव्या युगाच्या सीमेवर

भारतानें लोकायत्त शासनाची प्रेरणा ब्रिटनपासून घेतली आहे. आणि राममोहन रॉय यांच्यापासून पंडित नेहरूंपर्यंत अनेक थोर पुरुषांनीं या भूमींत बुद्धिप्रामाण्य, समता, व्यक्तिस्वातंत्र्य, सामवृत्ति, राष्ट्रनिष्ठा, अन्यायाविरुद्ध लढा करण्याचें मनोधैर्य इत्यादि भावनांची जोपासना केली आहे. त्याचेंच फल म्हणून स्वातंत्र्यानंतर एवढ्या मोठ्या खंडप्राय देशांत लोकायत्त शासनाचें बाह्यरूप सर्व टिकवूनहि येथें अराजक न माजूं देण्यांत आपल्याला यश आलें आहे. कसलीहि पूर्वपरंपरा नसतांना स्वातंत्र्याच्या लगतच्या उत्तर काळांत, निवडणुकी जास्तींत जास्त खुल्या व न्याय्य पद्धतीनें करून, तीनचतुर्थांश जनतेचा पाठिंबा कॉंग्रेसनें मिळविला ही गोष्ट निस्तुल अशी आहे. ब्रिटन-अमेरिकेखेरीज कोणत्याहि देशाला ही प्राथमिक पण लोकशाही टिकण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची गोष्ट साधलेली नाहीं. भारतानें लोकशाहीच्या क्षेत्रांत मिळविलेलें हें यश पुढें कितपत टिकेल याविषयीं मात्र शंका वाटण्याजोगी आज परिस्थिति निर्माण झाली आहे. आर्थिक विषमता येथें दिवसेंदिवस वाढत चालली आहे. समाज एकारत चालला आहे. अथेन्समधील महापुरुष सोलन याच्या आधींच्या काळीं तेथें जी एकारलेली स्थिति होती ती आज येथें आहे. आपण एका नव्या युगाच्या सीमेवर सध्यां उभे आहोंत. सामवृत्तीनें येथील धनिकांनीं व शास्त्यांनीं विग्रह टाळला नाहीं, तर येथें उत्पात होईल. आणि मग बंडाळ्या, दंगेधोपे, अराजक, जाळपोळ, कत्तली व त्यांतून रशियासारखी दण्डसत्ता या मार्गानें आपण जाऊं आणि मग भारतांतील व बहुधा जगांतील लोकसत्ता व तिच्या बरोबर सर्व संस्कृतीहि लयास जाईल. हा क्षण असा आहे कीं, या वेळीं मानवी मनावर विवेकाचा जय होतो कीं [illegible] यावर जगाचें भवितव्य अवलंबून आहे. भारताची [illegible]देवता कोणता कौल देते तें पाहावें.










अनुक्रमणिका

डॉ. वा. रा. ढमढेरे

# भारतीय स्थानिक स्वराज्यसंस्था आणि लोकशाही

## जुनी 'पंचायत' आणि 'स्थानिक स्वराज्य'

ब्रिटिश अंमलामुळें ज्या कांहीं गोष्टी आपणाकडे आल्या त्यांमध्यें 'लोकशाही' या कल्पनेस प्राधान्य दिलें पाहिजे. त्यापूर्वीच्या काळांत 'स्थानिक स्वराज्य' अशी कांहीं घटनात्मक व्यवस्था आपल्याकडे होती कीं नाहीं याबद्दल निश्चयानें सांगवत नाहीं. 'ग्रामपंचायत', 'पंचायत' असे शब्द इतिहासांत आढळतात, परंतु त्या 'पंचायती' चें कार्यक्षेत्र आणि आजच्या काळीं 'स्थानिक स्वराज्य' या शब्दसमुच्चयानें जी कल्पना आपणांपुढें उभी राहते त्यांत महदंतर आहे. पूर्वीच्या काळच्या 'पंचायती' आपसांतील—विशेषतः जाती-जातींतील वैयक्तिक भांडणें जातींतर्फे सोडविणें एवढें कार्य प्रामुख्यानें करीत. आज 'स्थानिक स्वराज्य' या कल्पनेंत अंतर्भूत असलेलीं नगर-स्वच्छता, आरोग्य, शिक्षण, दिवाबत्ती, पाणी-पुरवठा, सांडपाण्याची व्यवस्था, आगीची व्यवस्था वगैरे कामें 'पंचायती' कडे असतील असें वाटत नाहीं. यांपैकीं पुष्कळशीं कामें जुन्या काळांत शासनसंस्था स्वतः अथवा पदरच्या मानकऱ्यांकडून करवून घेई आणि अशीं कामें करणाऱ्यांची संभावना शासनसंस्था करीत असे. पुष्कळशीं कामें जो तो आपापल्या पुरतीं पाहात असे. परंतु जेव्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं मतभेद अथवा तंटे उपस्थित होत तेव्हां शासनसंस्थेमार्फत न्याय मागण्यांत येत असे. आपलें घर स्वच्छ ठेवणें, आपल्यापुरत्या विहिरी खणून अथवा नळ आणून पाणी आणणें हीं कामें ज्याला ऐपत व सत्ता असेल तो आपापल्या पुरतीं करी आणि या गोष्टींचा फायदा इतरांना देई. असा इतरांना उपयोग करूं देणें हें एक मोठें पुण्य कृत्य समजण्यांत येई. परंतु या कामासाठीं कांहीं विशिष्ट तंत्र अथवा संघटना असेल असें वाटत नाहीं.

'पंचायत' या शब्दानें उल्लिखित संस्थासुद्धां कोणत्या पद्धतीनें अस्तित्वांत येई याबद्दल निश्चित माहिती मिळत नाहीं. या पंचायतीची घटना जातीपुरती असे आणि जातींतील प्रमुख व्यक्ती एकत्र बसून जातीसंबंधीं प्रश्नांचा विचार करीत. या 'पंचायती' चा निर्णय सामान्यतः जातींतील सर्व व्यक्ती बंधनकारक मानीत. परंतु एकाद्यानें निर्णय जर नच मानले तर शासनसंस्थेकडे दाद मागण्याचा अधिकार जातींतील कोणत्याहि व्यक्तीस असावा असें वाटतें. 'पंचायती'चा निर्णय ही एक महत्त्वाची गोष्ट आहे असें शासनसंस्था मानी; परंतु यापलीकडे 'पंचायती'ला फारसें महत्त्व असेल असें वाटत नाहीं. जातिसंस्था जोंपर्यंत प्रबळ होती तोंपर्यंत 'पंचायती'स महत्त्व होतें. आजहि जातिविशिष्ट बाबतींत 'पंचायती' भरविण्यांत येतात आणि त्यांचे निर्णय सामान्यतः त्या जातींतील व्यक्ती मानतात. परंतु हें बंधन हळू हळू शिथिल होत चाललें असून पुढील ९–५० वर्षांत जातींतील पंचायतींचें महत्त्व पार नाहींसें होईल असें दिसतें.

वर सांगितल्याप्रमाणें 'स्थानिक स्वराज्य' ही कल्पना आपणांकडे ब्रिटिश अंमलांत आली. प्रथम गेल्या शतकांतील या गोष्टीचा इतिहास पाहिल्यास असें दिसतें कीं, 'स्थानिक' बाबतींत व्यवस्था करणें हें काम त्या वेळच्या शासन-








कर्त्यांनीं त्या त्या विभागांतील अधिकाऱ्यांकडे सोंपविलें होतें. 'सरकार' ही संस्था दृढमूल झाल्यावर कामाच्या व्यापाच्या मानानें त्यांत निरनिराळीं खातीं उत्पन्न झालीं आणि 'स्थानिक प्रश्नां'शीं सरकारच्या निरनिराळ्या खात्यांचा संबंध येऊं लागला, तेव्हां त्या त्या खात्यांतील व्यक्तींच्या समित्या प्रस्थापित करण्यांत येऊं लागल्या. या समित्यांचें कार्यक्षेत्र स्थानिक प्रश्नापुरतें तरी 'कार्यकारी' समितीच्या स्वरूपाचें असे. स्थानिक कामांकरितां पट्ट्या गोळा कराव्या ही प्रथा उत्तर पेशवाईपासूनच अंमलांत होती; परंतु त्यांचा विनियोग शासनसंस्थेमार्फतच होत होता.

सन १८५० या वर्षीं प्रथम 'स्थानिक स्वराज्य-संस्था' स्थापन करण्यासंबंधीं पहिला उल्लेख आढळतो. त्या वर्षीं सरकारनें एक कायदा करून 'स्थानिक' प्रश्न सोडविण्याकरितां नागरिकांनीं मागणी केल्यास अशी 'स्थानिक' संघटना स्थापन करण्याची तरतूद केलेली दिसते. सन १८६२ या वर्षीं स्थानिक संस्थांवर, त्या त्या विभागांतील प्रमुख सरकारी नोकरांच्या मार्गदर्शनाखालीं त्यांनीं चालावें असा निर्बंध घातलेला होता. सन १८७३ या वर्षीं मात्र 'स्थानिक स्वराज्यसंस्था' कायदेशीरपणें अस्तित्वांत आल्या. १०,००० लोकवस्तीपेक्षां मोठ्या गांवांत $\frac{2}{3}$ सरकारनें नेमलेले सभासद व $\frac{1}{3}$ सरकारी अधिकारी असावेत असा नियम या कायद्यानें घालून दिला. या कायद्यांतच सरकारनें नेमावयाच्या सभासदांपैकीं कांहीं निवडून यावेत अशी तरतूद होती. परंतु सन १८८२ पर्यंत अशा निवडणुका झाल्या नाहींत. १८८२ या वर्षीं मात्र प्रथम १० नगरपालिकांतून निवडून आलेल्या सभासदांचा समावेश करण्यांत आला.

सन १८८२ हें वर्ष 'स्थानिक स्वराज्य-संस्थां'संबंधीं फार महत्त्वाचें मानलें जातें. कारण या वर्षीं प्रथमच 'स्थानिक स्वराज्यसंस्थां'ची घटना, ध्येय, सरकारी नियंत्रण या सर्व विषयांसंबंधीं त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड रिपन यांनीं एक ठराव करून तो सर्व प्रांतिक सरकारांकडे पाठविला. त्या ठरावाच्या अनुरोधानें पुढील चार-पांच वर्षांत सर्व प्रांतिक सरकारांनीं कायदे करून आपापल्या प्रांतांतील स्थानिक स्वराज्यसंस्थांची उभारणी केली.

### मोठ्या लढ्याचा एक भाग

लोकमत जसजसें जागृत होऊं लागलें तसतशी इतर राजकारणाबरोबर 'स्थानिक स्वराज्य-संस्थां'तूनहि संघर्षास सुरुवात झाली. काँग्रेसच्या पहिल्या पहिल्या ठरावांतून या विषयासंबंधीं मत-प्रदर्शन होऊं लागलें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, परकीय सरकारशीं होत असलेल्या झगड्यांत 'स्थानिक स्वराज्यसंस्थां'चा ताबा आपणांकडे असावा या चळवळीस महत्त्व प्राप्त झालें. याचा परिणाम म्हणून सरकारनेंसुद्धां हळू हळू या संस्थांमधून स्थानिक प्रमुख व्यक्तींचा अंतर्भाव करण्यास सुरुवात केली. टप्प्याटप्प्यानें या स्थानिक प्रमुख व्यक्तींच्या हातीं सत्ता येत गेली, त्यांच्या निवडणुकीची पद्धति ठरत गेली आणि क्रमशः सरकारी अधिकारीच काय परंतु सरकारनें नेमलेल्या व्यक्तीहि कमी कमी होत जाऊन सन १९१९ च्या सुमारास निदान मुंबई प्रांतांत तरी सर्व स्थानिक संस्था लोकनियुक्त प्रतिनिधींच्या ताब्यांत पूर्णपणें आल्या. सरकारशीं जो मोठा झगडा सर्व देशभर चालू होता त्याचा एक भाग म्हणून स्थानिक स्वराज्य-संस्थांचा ताबा मिळविणें ही गोष्ट देशभर चालू होती. तिचा शेवट अशा रीतीनें लोकप्रतिनिधींच्या ताब्यांत सर्वच स्थानिक स्वराज्यसंस्था येण्यांत झाला. जोंपर्यंत त्या मोठ्या लढ्याचा एक भाग म्हणून हा विषय मानण्यांत येत होता, तोंपर्यंत लोकांतील अव्वल दर्जाचे पुढारी स्थानिक स्वराज्य-संस्थांतून निवडून देण्यांत येत आणि पुढील झगड्यांचें शिक्षण घेण्याची जागा म्हणून त्यांचा उपयोग करीत. लोकप्रतिनिधींची जसजशी सरशी होऊं लागली आणि 'स्थानिक' प्रश्नांवरून प्रांतीय अथवा अखिलभारतीय स्वरूपाच्या झगड्यांस विशेष तोंड लागलें त्या वेळीं अव्वल दर्जाचे पुढारी प्रांतीय अथवा भारतीय विधिमंडळाकडे वळले आणि स्थानिक स्वराज्यसंस्थांतून दुय्यम अथवा त्याखालच्या श्रेणींतील माणसें निवडून येऊं लागलीं. तरीहि पुढील कार्यक्षेत्राची एक शिक्षणाची जागा या दृष्टीनें स्थानिक स्वराज्य-

संस्थांचें महत्त्व फार होतें व अजूनहि आहे. आजच्या संसदेंत अथवा राज्य-विधानसभांमधून स्थानिक स्वराज्यसंस्थांतून कित्येक वर्षें कामें केलेलीं किती तरी माणसें सांपडतील !

सरकारशीं भांडून मिळविलेल्या या सत्ता-क्षेत्रांतील सत्ता मात्र जितक्या प्रमाणांत राबवावी तितकी राबविली गेली नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे. ह्या परिस्थितीस एक मोठें कारण असें कीं, सरकारनें हीं क्षेत्रें जरी लोकप्रतिनिधींच्या ताब्यांत दिलीं तरी कांहीं महत्त्वाच्या विषयांतील अंतिम सत्ता मात्र स्वतःकडे ठेविली. मुख्य म्हणजे अर्थव्यवस्था सरकारनें आपल्याकडेच ठेविली होती. कोणत्याहि स्थानिक संस्थेला आपलें उत्पन्न वाढविणें असेल, कर्ज काढणें असेल अथवा कांहीं सुधारणा करणें असेल तर त्या कामीं सरकार-मंजुरीची आवश्यकता असे. तसेंच कांहीं जास्त खर्चाच्या योजनांस सरकारची आर्थिक मदत मिळण्यास त्रास पडे. पहिल्या सुधारणांच्या हप्त्यानंतर ( १९०८–१९ ) सरकारांत द्विदल राज्यपद्धति ( Diarchy ) सुरू होऊन स्थानिक स्वराज्य हें खातें लोकनियुक्त मंत्र्याकडे सोंपाविण्यांत आलें; परंतु त्याच्या हातीं अर्थव्यवस्था नसल्यामुळें असे लोकनियुक्त मंत्री कितीहि चांगले असले, तरी त्यांना फार काम करतां आलें नाहीं. तरीहि पुष्कळशा प्रांतांतून प्राथमिक शिक्षण, नगररचना वगैरे बाबतींत या मंत्र्यांच्या काळांत भरीव कामगिरी झाली.

सन १९२० पासूनच्या काळांत परकीय सत्तेशीं चालू असलेल्या झगड्यास फार मोठ्या प्रमाणांत तोंड लागलें आणि सर्व देशभर हा झगडा सुरू झाला. सर्व देशांत जिकडेतिकडे प्रचंड खळबळ माजली आणि मुख्य जी केंद्रीय सत्ता तीच उखडून काढण्याच्या कामीं पुढारी आपलें लक्ष घालूं लागले. या परिस्थितीचा परिणाम असा झाला कीं, जी स्थानिक स्वराज्यसंस्थांतील सत्ता नुकतीच लोकांनीं जिंकून घेतली होती ती भक्कम पायावर उभी करण्याचा विचार करण्यास लोकांच्या जाणत्या नेत्यांस वेळच झाला नाहीं. बाहेर कामें इतकीं प्रचंड होतीं कीं, या स्थानिक क्षेत्राकडे त्यांचें दुर्लक्ष झालें. जे कांहीं पुढारी या क्षेत्रांत लक्ष घालीत, त्यांना वारंवार घडणाऱ्या तुरुंगवासामुळें या क्षेत्रांवर नियंत्रण करतां आलें नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, हें क्षेत्र विशाल दृष्टि नसलेल्या स्थानिक व्यक्तींच्या सत्ता-स्पर्धेचें केंद्र बनलें. कांहीं अपवाद सोडून सर्वसाधारण मानानें असें म्हणतां येईल कीं, १९२०–२२ पासून आतांपर्यंत या क्षेत्रांत वैयक्तिक स्पर्धाच अधिक चालते. काळ इतक्या झपाट्यानें बदलत आहे कीं, कांहीं बाबतींत सुधारणा या अपरिहार्य म्हणूनच झाल्या आहेत. लोकप्रतिनिधींनीं अभ्यासपूर्वक योजना करून कांहीं नवीन नवीन गोष्टी ‘ स्थानिक स्वराज्यसंस्थां ’तून केल्या असें म्हणतां येणार नाहीं.

अखेर राजकीय झगडा संपून सर्व भारतवर्षाची सत्ता निष्कंटकपणें लोकप्रतिनिधींच्या हातीं येऊन नवीन भारताच्या शासनाची घटनाहि तयार होऊन अंमलांत आली आहे. सर्वच क्षेत्रांत आतां इतकीं प्रचंड कामें पडलीं आहेत कीं, त्यांच्या महत्त्वा-प्रमाणें त्यांची श्रेणी लावून त्या योजनेप्रमाणें एक एक काम हातीं घेण्याची वेळ आलेली आहे. अशा वेळीं स्थानिक स्वराज्यसंस्थांचें कार्यक्षेत्र व तें करण्यास लागणारी यंत्रणा कशी असावी याचा ऊहापोह होऊन कांहीं विशिष्ट पद्धतीनें यापुढील कामें झालीं पाहिजेत अशी कांहीं विशिष्ट योजना करून, त्या योजनेप्रमाणें निश्चयपूर्वक आचरण झाल्याशिवाय स्थानिक स्वराज्यसंस्थांवर येणारी जबाबदारी त्या संस्था पार पाडूं शकणार नाहींत. म्हणून या विषयाचा अभ्यास आस्थापूर्वक करून जाणत्या लोकांनीं लोकमतास मार्गदर्शन करण्याची फार जरूरी आहे.

### योग्य उत्पन्नाच्या अभावीं कुचंबणा

स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या आजच्या परिस्थितीकडे पाहिलें म्हणजे पहिली गोष्ट प्रामुख्यानें दृष्टीस पडते ती ही कीं, या संस्थांवर पडणाऱ्या कामाच्या जबाबदारीच्या मानानें त्यांचें उत्पन्न फार तोकडें पडतें. या संस्थांच्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हणजे घरपट्टी व जकातीचें उत्पन्न या होत. जिल्ह्यांतील ‘ लोकल बोर्ड ’ या संस्थांना उत्पन्नाचें मुख्य साधन म्हणजे जमिनीवरील कराबरोबर ‘ लोकल





फंड सेस ’ या नांवाचा कर हें आहे. या उत्पन्नाचें प्रमाण पाहिलें तर तें फार अल्प आहे. त्यामुळें नगरपालिका आणि विशेषतः लोकल बोर्डें आपल्या प्रदेशांतील कामें उरकण्यास असमर्थ आहेत. म्हणून या क्षेत्रांत कामें करणाऱ्या संस्थांना उत्पन्न जास्त मिळवून दिल्याशिवाय त्यांची कार्यक्षमता वाढविणें अशक्य आहे. कांहीं मोठीं शहरें सोडलीं तर उत्पन्न कमी असल्यामुळेंच या संस्थांचा गाडा अडून पडलेला दिसतो. या विषयाकडे फार दिवसांपासून लोकांचें व सरकारचेंहि लक्ष आहे हें खरें. परंतु ‘ स्थानिक संस्थां ’ना उत्पन्नाच्या बाबी देणें म्हणजे तेवढ्या प्रमाणांत आपलें उत्पन्न सोडण्यास कबूल होणें असा सरकारी अर्थ मानण्यांत येऊं लागल्यामुळें या विषयांत कांहीं प्रगति होऊं शकली नाहीं. उलट, असें दाखवितां येईल कीं, ‘ स्थानिक संस्थां ’च्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या विषयांवरील उत्पन्नहि सरकारनें आपल्याकडेच लावून घेतलें आहे. शहरांतील मिळकतीवरील कर ( Urban Immovable Property Tax ), बिगरशेतसारा, विक्रीकर, विजेच्या खपावरील कर, करमणुकीवरील कर असे कित्येक कर दाखवितां येतील कीं जे वास्तविकपणें स्थानिक संस्थांच्या कार्यक्षेत्रांत येत असल्यामुळें त्यांच्याच उत्पन्नाचीं साधनें व्हावयास पाहिजेत. परंतु हे सर्व कर प्रांतिक सरकारांनीं कायदे करून आपल्याकडेच लावून घेतले आहेत. यामुळें स्थानिक संस्थांची फार कुचंबणा होते आणि कोणतेंहि काम त्यांना हातीं घेतां येत नाहीं. याचा परिणाम स्थानिक संस्था म्हणजे एक थट्टेचा विषय होऊन बसण्यांत झाला आहे. स्थानिक संस्थांतील व्यक्तींच्या वैयक्तिक पात्रापात्रतेवर व स्पर्धेवर त्यांची कार्यक्षमता अवलंबून आहेच; परंतु या संस्थांकडून लोकहिताचीं कामें जास्त प्रमाणांत न होण्याचें मुख्य कारण म्हणजे योग्य उत्पन्नाचा अभाव हेंच होय. सन १९३९–४० या वर्षी मुंबई सरकारनें स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या कारभाराची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिटीनें (–ही [illegible] ‘ काळे-कमिटी ’ या नांवानें प्रसिद्ध आहे–) या विषयावर विस्तृत चर्चा केली असून ‘ [illegible] नवीं नवीं खातीं स्थानिक संस्थांना [illegible] त्यांच्यांत सुधारणा होणें कठिण आहे ’ असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे.

चार-पांच वर्षांपूर्वींपर्यंत घरपट्टीचें प्रमाण फार कमी होतें. सरकारनें स्थानिक स्वराज्यसंस्थांना या विषयांत मुद्दाम आदेश देऊन घरपट्टी घराच्या उत्पन्नाच्या २० टक्केपर्यंत वाढवावी असें सांगितलें. बहुतेक सर्व नगरपालिकांनीं याप्रमाणें आपल्या घरपट्टीच्या प्रमाणांत वाढ केली आहे. परंतु एवढ्यानें त्यांच्या कामास लागणारा पैसा उभा राहणें शक्य नाहीं. त्याकरितां प्रांतिक सरकार आणि स्थानिक संस्था यांच्या उत्पन्नाच्या बाबी तोडून देण्याची व्यवस्था झाली पाहिजे. किंबहुना केंद्रीय सरकार, प्रांतिक सरकारें आणि स्थानिक स्वराज्य-संस्था यांच्यांतील सर्वच उत्पन्नाच्या बाबींचा फेरविचार होऊन प्रत्येकास उत्पन्नाचें क्षेत्र तोडून दिलें पाहिजे. आणि एकाच्या क्षेत्रांत दुसऱ्यास हात घालतां येणार नाहीं अशी व्यवस्था झाली पाहिजे. असें न होईल तर या तिन्हींहि क्षेत्रांत उत्पन्नाच्या बाबींबद्दल ओढाताण चालू राहून कोणतेंहि सुसूत्र धोरण ठरविणें कठिण होऊन बसेल. हा विषय केंद्रीय सरकारनेंच हातीं घेऊन त्याबद्दल कांहीं निश्चित मर्यादा ठरवून दिल्या पाहिजेत.

उत्पन्नाचें दुसरें कलम म्हणजे सरकारकडून ( ग्रँटच्या स्वरूपानें ) मिळणारी मदत. या मदतीबद्दलहि कांहीं विशिष्ट धोरण ठरवून देणें अवश्य आहे. प्राथमिक शिक्षणाकरितां सरकार अशी ग्रँट देतें. तसेंच आरोग्याधिकारी वगैरे कांहीं सेवकवर्गाच्या पगाराकरितांहि सरकार ग्रँट देतें. ही सर्व मदत लक्षांत घेतली, तरी एकूण खर्चाच्या मानानें ती तोकडीच पडते असा सर्वत्र अनुभव आहे. शिवाय अशी ग्रँट देतांना सरकारनें त्याबरोबरच आपलीं नियंत्रणें या संस्थांवर लादलीं आहेत. त्यामुळें या संस्थांचे त्या त्या क्षेत्रांतील अधिकार कमी झालेले आहेत.

जिल्ह्यांतील लोकल बोर्डें आणि खेड्यांतील [illegible] यांच्या बाबतींत तर उत्पन्नाची [illegible] [illegible]. ८०० ते १००० गांवें असलेला [illegible] वाहतूक-आरोग्यादि सर्व कामें [illegible] आणि उत्पन्न मात्र जमीनमहसुलांतील










अनुक्रमणिका

रुपयामागें एक आणा! साहजिकच या संस्थांच्या हातून कांहीं भरीव कामगिरी होत नाहीं. त्यांतच सरकारनें अलीकडे Rural Development या नांवाच्या नवीन सरकारनियुक्त संस्था अस्तित्वांत आणल्या असून, खेड्यांतील जीवन समृद्ध व्हावें या हेतूनें या संस्था काम करीत आहेत. या संस्थांना सरकारी मदत मिळते व त्यांतूनच या संस्था हीं कामें करतात. परंतु या संस्थांचें कार्यक्षेत्र आणि 'लोकल बोर्डा'चें कार्यक्षेत्र इतकीं समान आहेत कीं, हीं कामें लोकल बोर्डांच्याकरवींच कां करण्यांत येत नाहींत हें एक कोडेंच आहे! आहेत त्या लोकनियुक्त संस्थांना मदत करून त्यांच्याकडून कामें करवून घेणें शक्य असतां, सरकारनें या नवीन आपण नेमलेल्या संस्था उत्पन्न केल्यामुळें 'लोकल बोर्डां'-च्या कार्यक्षेत्रावर आक्रमण तर आहेच, परंतु त्या-बोर्डांच्या कार्यक्षमतेवर व कार्यपद्धतीवरहि फार अनिष्ट परिणाम झाला आहे.

पुढील काळांत या सर्व प्रकारच्या स्थानिक संस्थांच्या कार्यक्षेत्राचा विचार करून त्यांच्या कामास पुरें पडेल असें उत्पन्नाचें क्षेत्र या संस्थांस तोडून दिल्याशिवाय स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या कार्यक्षमतेंत सुधारणा दिसणार नाहीं. जरूर वाटल्यास सरकारनें, येणाऱ्या उत्पन्नाचा विनियोग कसा केला जातो, यावर जास्त बारीक नजर ठेवावी; परंतु उत्पन्नांत वाढ त्वरित केली पाहिजे. त्या-शिवाय जनतेशीं दैनंदिन संबंध येणाऱ्या व जनतेला कारभाराचें शिक्षण देणाऱ्या या संस्थांकडून राष्ट्रसेवेबद्दलच्या अपेक्षा फलद्रूप होणार नाहींत.

### मतदारसंघ एकप्रतिनिधिक पाहिजेत

लोकशाही म्हटली कीं, तेथें निवडणुका आल्याच. निवडणुकीशिवाय खरे लोकप्रतिनिधी कोण हें समजणें अशक्य आहे. पूर्वींच्या काळीं स्थानिक स्वराज्यसंस्था सरकारी अधिकारीच चालवीत असत; परंतु पुढें जेव्हां लोकनियुक्त सभासद निवडण्याची प्रथा पडली तेव्हांसुद्धां प्रांतीवरील कर देणारे, कांहीं एक ठराविक जमीनसारा अथवा कर भरणारे, अशाच लोकांना मताधिकार असे. म्हणजे निवडून आलेले प्रतिनिधी हे जनतेच्या वरच्या थराचेच फक्त प्रतिनिधी असत. स्वातंत्र्य मिळाल्या-नंतर नवीन घटनेप्रमाणें वयांत आलेल्या प्रत्येक नागरिकास मताधिकार प्राप्त झाला आहे. त्यामुळें यापुढें निवडून येणारे प्रतिनिधी हे खऱ्या अर्थानें लोकप्रतिनिधी असें म्हणतां येईल. गेल्या ९-१० महिन्यांत सर्व हिंदुस्थानभर ज्या निवडणुकी झाल्या त्यांवरून असें निश्चित म्हणतां येईल कीं, घटनेनें दिलेला हा अधिकार योग्य रीतीनें वापरण्याची कुवत मतदारांमध्यें आहे. कांहीं स्थानिक संस्थां-मधूनसुद्धां प्रौढ मताधिकारान्वयें निवडणुकी झाल्या, त्यावरूनहि ही गोष्ट सिद्ध झालेली आहे. पुष्कळांच्या मतें साधारण प्रौढ माणसास मता-धिकार देणें धोक्याचें आहे; कारण, आपल्या देशांत शिक्षण फार कमी असल्यामुळें साधारण मतदारास मताधिकाराचें महत्त्व समजत नाहीं आणि योग्य उमेदवार निवडून येईलच असें खात्रीनें सांगवत नाहीं. पण गेल्या निवडणुकी इतक्या पद्धतशीर झाल्या, निरनिराळ्या पक्षांनीं आपला प्रचारहि इतका योग्य प्रकारें केला व मतदारांनीं आपलें कर्तव्य इतक्या जाणतेपणानें बजावलें कीं, वरील आक्षेप फोल आहे हेंच सिद्ध झालें. खुद्द इंग्लंड-मध्येंसुद्धां स्थानिक संस्थांचा मताधिकार, वार्षिक १० पौंड उत्पन्न असलेल्या जागेंत राहणाऱ्या इसमास, त्याच्या पत्नीस, विश्वविद्यालयाच्या पदवीधरास आणि 'हाउस ऑफ लॉर्ड्स्'च्या सभासदास आहे. (पहा : English Local Government. 1950, Herman Finch, p. 18). म्हणजे लोकशाहीची जननी म्हणून ज्या देशाची महती वर्णन करतात तेथेंहि संपूर्ण प्रौढमताधिकार अस्तित्वांत नाहीं. अर्थात् इंग्लंडसारख्या देशांत वार्षिक १० पौंड उत्पन्न म्हणजे जवळ जवळ सर्वच प्रौढांस मता-धिकार आहे असें म्हटलें पाहिजे. परंतु आपल्या देशांत मताधिकार हा उत्पन्नावर अवलंबून ठेविलेला नाहीं. तशी स्थिति खुद्द इंग्लंडमध्येंहि नाहीं. ही गोष्ट सहज म्हणून सांगितली. यावरून आपल्या देशांत लोकशाहीच्या दृष्टीनें घटनेनें केवढी मोठी मजल मारली आहे हें लक्षांत येईल.

लोकसभा, राज्यसभा या संस्थांतून सामान्यतः प्रत्येक मतदारक्षेत्रांतून एकच प्रतिनिधि निवडून देण्याची व्यवस्था आहे. त्यामुळें पक्षोपपक्षांनीं

# भारतीय स्थानिक स्वराज्यसंस्था आणि लोकशाही

आपलीं धोरणें लोकांपुढें ठेवणें सोपें होऊन निवडणुकी पक्षातर्फे लढविल्या जातात. पक्षाचा कार्यक्रम हाच महत्त्वाचा, मग त्या पक्षातर्फे व्यक्ति कोण उभी आहे याचा विचार गौण, अशी पद्धति या निवडणुकांतून पडली आहे. स्थानिक संस्थांच्या निवडणुकांमध्यें मात्र एकाच मतदारक्षेत्रांतून अनेक म्हणजे २ पासून ५–६ पर्यंत उमेदवार निवडून यावेत अशी तरतूद करण्यांत आलेली आहे. काळे-कमिटीनें आपल्या निवेदनांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, प्रत्येक मतदारक्षेत्रांतून एकच प्रतिनिधि निवडून देण्याची पद्धत घेतली तर अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी निवडून येणें कठिण होईल. याच विचाराचा अवलंब आजहि करण्यांत येतो आणि अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी निवडून येण्यासाठीं प्रातिनिधिक मतदारसंघांची योजना करण्यांत आलेली आहे. या विषयाबद्दलहि जरा जास्त खोलवर विचार होणें जरूर आहे. आपला देश एकसंघी व्हावा अशी आपली सर्वांची इच्छा आहे. वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, आपला समाज हा जातिनिविष्ट समाज आहे. त्यामुळें प्रत्येक व्यक्ति आपापल्या जातीपुरतांच विचार करते. सुदैवानें ही परिस्थिति फार झपाट्यानें सुधारत असून जातीपेक्षां जास्त व्यापक दृष्टीनें विचार करण्याची संवय आपणांस लागूं लागली आहे. 'अल्पसंख्याक' हा शब्द जरी दिसण्यांत कांहीं विशिष्ट मताचा परंतु संख्येनें कमी अशा लोकसमूहाचा निदर्शक असला तरी आपल्या देशाच्या आजच्या परिस्थितींत या शब्दाचा अर्थ संख्येनें कमी असलेल्या जाती असाच लावला जातो. त्यामुळें अल्पसंख्याकांची सोय करणें याचा अर्थच जातीपुरतें पाहण्याच्या मनोवृत्तीचें पोषण करणें असा होतो आणि म्हणून कांहीं कांहीं जाती 'अल्पसंख्याकत्व' हाच मोठा गुण मानून त्याच्या जोरावर समाजांतील इतर घटकांकडून जास्त फायदा उपटूं पाहतात. मुसलमानांच्या बाबतींतील जुन्या राजवटींतील अनुभव ताजाच आहे. अस्पृश्य समाजास आजहि घटनेनें कांहीं विशिष्ट अधिकार अल्पसंख्याक म्हणून दिलेले असले तरी ते अपवादात्मक, थोड्या मुदतीपुरते आणि अस्पृश्य समाजाची आजवरची हेळसांड दूर करण्यापुरतेच आहेत. सांगण्याचा मुद्दा असा कीं, अल्पसंख्याकांचे असे कांहीं निराळे अधिकार, निराळे प्रश्न, नवीन काळांत राहूं नयेत अशी योजना करण्याची खटपट घटनेंत केलेली आहे. वर सांगितल्याप्रमाणें 'अल्पसंख्याक' म्हणजे संख्येनें कमी असे विशिष्ट मताचे लोक असा असेल, तर तो लोकशाहींत 'विरोधी' पक्ष म्हणून राहून आज ना उद्यां बहुमत आपल्या बाजूला करून घेऊन राज्याचा गाडा आपल्या हातांत घेऊं शकेल. अशा अल्पसंख्याकांची सोय करण्याकरितां 'अनेक-प्रतिनिधिक' मतदारसंघांची योजना करण्याचें कांहीं कारण नाहीं. जातिवाचक 'अल्पसंख्याक' समाजास मुद्दाम प्रतिनिधित्व देण्याची सोय करणें म्हणजे ज्या जातिभेदामुळें आपला अधःपात झाला असें आपण मानतों त्यावर भर देणें होय. म्हणून जातिभेदात्मक 'अल्पसंख्याक' समाजास प्रतिनिधित्व देण्याची तरतूद नवीन काळाशीं सुसंगत दिसत नाहीं.

स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या कामामध्यें स्थानिक प्रश्नासच महत्त्व असणार म्हणून मोठें मतदारक्षेत्र करून त्यांतून ३–४ प्रतिनिधी निवडून देण्यापेक्षां लहान लहान मतदारक्षेत्रें करून त्यांतून प्रत्येकीं एकच प्रतिनिधि निवडून यावा अशी व्यवस्था झाल्यास त्या त्या लहान क्षेत्रांतील कर्तबगार मनुष्य निवडून येणें शक्य होईल. शिवाय पक्षनिष्ठ कार्यक्रमासहि महत्त्व प्राप्त होईल. मतदारक्षेत्र मोठें असेल तर एका टोंकास राहणारा कर्तबगार मनुष्य मतदार-क्षेत्राच्या दुसऱ्या टोंकाच्या मतदारांस फारसा माहीत असेल असें नाहीं. त्यामुळें अशा माणसास निवडून येणें त्रासाचें होईल. उलट, मतदारक्षेत्र लहान असल्यास त्या त्या भागांतील बहुसंख्य लोकांच्या परिचयाचा असा कर्तबगार मनुष्य निवडून देण्याचा संभव फार. म्हणून लोकसभेप्रमाणें स्थानिक संस्थांमध्येंसुद्धां 'एकप्रतिनिधिक मतदार-संघ' निर्माण केल्यास त्या संस्था अधिक प्रातिनिधिक व अधिक कार्यक्षम होतील असें वाटतें.

### तज्ज्ञांच्या सल्ल्याची आवश्यकता

अशा मतदारांनीं निवडून दिलेल्या प्रति-

निधींच्या हातीं संपूर्ण सत्ता आल्यामुळें ज्या विषयांत विशेष ज्ञानाची जरूरी लागते त्या कामांत अशा तज्ज्ञांचा सल्ला मिळण्याची तरतूद करणें जरूर आहे. विशेषतः लहान-लहान गांवांतून ज्या नगरपालिका काम करीत आहेत त्यांना स्थापत्य, आरोग्य, नगररचना वगैरेसंबंधीं विशिष्ट ज्ञान असलेल्या व्यक्तींच्या सल्लामसलतीची आवश्यकता फार भासते. कांहीं नगरपालिकांतून 'आल्डरमेन' म्हणून तज्ज्ञ माणसांची नियुक्ति निवडून आलेल्या सभासदांकडून होण्याची तरतूद आहे. त्याच पद्धतीचा अवलंब केल्यास ही गोष्ट साध्य होईल. अनुभव मात्र असा आहे कीं, अशी नियुक्ति ही पक्षविशिष्ट भूमिकेवरून होत असल्यामुळें मूळ ज्या कारणाकरितां ही नियुक्ति करण्याची कल्पना आहे, ती फलद्रूप होऊं शकत नाहीं. म्हणून तज्ज्ञ माणसांची सल्लामसलत व मार्गदर्शन उपलब्ध होण्यासाठीं त्या त्या सरकारी खात्यांतील तज्ज्ञांचा उपयोग नगरपालिका अथवा लोकल बोर्ड यांस करूं द्यावा. आजहि कांहीं बाबतींत कायद्यांत तरी अशी तरतूद आहे. परंतु सरकारी अधिकाऱ्यांच्या दीर्घसूत्रीपणामुळें अशा तज्ज्ञांचा उपयोग करून घेणें हें स्थानिक स्वराज्यसंस्था टाळतात. 'नगररचना' या विषयापुरतें तर सरकारी अधिकाऱ्यांना पुष्कळच अधिकार दिलेले असून, त्यामुळें नगर-रचना जरी कांहीं विशिष्ट धोरणानें होत असली, तरी त्यांतील दीर्घसूत्रीपणा अत्यंत तापदायक होतो, असा अनुभव आहे. म्हणून या तज्ज्ञांच्या सल्लामसलतीचा फायदा स्थानिक संस्थांना कसा द्यावा हा एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न होऊन बसला आहे. स्थानिक संस्थांतून अशा तज्ज्ञ व्यक्ती सरकारमार्फत नेमल्या जाण्याची तरतूद करणें शक्य आहे. परंतु ही गोष्ट लोकशाहीविरोधी असल्यामुळें मान्य होण्यासारखी नाहीं. स्थानिक संस्थांच्या स्थापत्य, आरोग्य वगैरे समित्यांतून अशा नेमणुका केल्यास स्थानिक संस्थांचें लोकशाही स्वरूप न बदलतां तज्ज्ञ माणसांचा सल्ला त्यांना मिळवून देण्याचा हा एक मार्ग आहे.

### अधिकाऱ्यांच्या नेमणुका

जी गोष्ट वर तज्ज्ञांच्याबद्दल सांगितली तशाच तऱ्हेचा एक प्रश्न म्हणजे अधिकारी वर्गांच्या नेमणुका. आज बहुतेक सर्व नेमणुका स्थानिक संस्था अथवा त्यांचे मुख्याधिकारी करतात; याचा परिणाम असा होतो कीं, या नेमणुका कार्यक्षमतेपेक्षां पक्षीय म्हणजेच व्यक्तिगत राजकारणावर अवलंबून राहतात आणि अधिकारी वर्ग जितका स्वतंत्र व कार्यक्षम असावा तितका असूं शकत नाहीं. मुंबई, पुणें वगैरे कॉर्पोरेशन्समध्यें 'कमिशनर' हा सर्वांत वरचा अधिकारी सरकार नेमतें आणि सेवकवर्ग कमिशनर नेमतो. या व्यवस्थेमुळें अधिकारी वर्ग आणि स्थानिक संस्थांतील पक्षीय राजकारण यांचा संबंध तुटून कार्यक्षमतेंत भर पडते. सरकारनें नेमलेला कमिशनर बदलण्याबद्दलचा अधिकार स्थानिक संस्थांना कांहीं विशिष्ट मताधिक्यानें आहे. त्यामुळें हा कमिशनरहि स्थानिक संस्थेस जबाबदार परंतु स्वतंत्र असा अधिकारी होऊन संस्थांचा कारभार दैनंदिन कामांत चांगला चालूं शकतो. तसेंच एकदां वार्षिक अंदाजपत्रक ठरवून दिलें म्हणजे त्याप्रमाणें कामें उरकण्याची जबाबदारी कमिशनरवर असल्यामुळें कार्यक्षेत्रें तोडून दिल्यासारखीं होतात. पैशाची तरतूद करणें, धोरण आंखून देणें, एकादी गोष्ट करावी कीं न करावी हें ठरविणें एवढ्या गोष्टी लोकनियुक्त प्रतिनिधींनीं कराव्या आणि त्या कामाची अंमलबजावणी अधिकारी वर्गानें करावी अशी ही कामांची वांटणी आहे आणि ती कार्यक्षमतेच्या दृष्टीनें उपयुक्तहि आहे. अशाच कांहींशा धर्तीवर सर्व स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या अधिकारक्षेत्रांची वांटणी केल्यास 'स्थानिक स्वराज्य' हा विषय आज जो थट्टेचा होऊन बसला आहे त्यांत सुधारणा होण्याची शक्यता आहे.

### मतदार जागरूक कसे राहतील ?

स्थानिक स्वराज्यसंस्थांमध्यें निवडून येणाऱ्या प्रतिनिधींपेक्षां त्यांना निवडून देणारे मतदार जास्त जागरूक कसे राहतील याचा विचार जास्त होणें जरूर आहे असें वाटतें. साक्षरतेचें प्रमाण झपाट्यानें वाढत असल्यामुळें पुढील काळांत वृत्तपत्रें वगैरे प्रचारसाधनांचें महत्त्व फार मोठें आहे. मतदार जरी अशिक्षित असला तरी सामान्यतः व्यवहारी असल्यामुळें ज्याचें नांव त्याच्या कानांवरून नेहमीं

जातें, ज्याच्या मोठेपणाबद्दल तो नेहमीं ऐकतो अशा मोठ्या माणसाचें नांव घेणाऱ्या पक्षास अथवा व्यक्तीस तो साधारणपणें मत देतो. क्वचित् प्रसंगीं व्यक्तिगत अथवा पैशाचें दडपण हेंहि मतदारांवर प्रभाव पाडूं शकतें. म्हणून मतदारांस नुसत्या निवडणुकीपुरतेंच नव्हे, तर दैनंदिन व्यवहारांतसुद्धां जागें ठेवणें, सर्व प्रश्नांची माहिती त्याला करून देणें वगैरे गोष्टी मोठ्या प्रमाणावर झाल्याशिवाय सर्व लोकशाहीचा मुख्य पाया भक्कम होणार नाहीं. ज्या ज्या गोष्टींमुळें साधारण मनुष्याला ज्ञान होईल तीं तीं सर्व साधनें उपयोगांत आणून आगामी भविष्यकाळांत मतदार जागा करणें व तो जागा ठेवणें हें काम अत्यंत महत्त्वाचें असून, हें लोकशिक्षणाचें कार्य हेंच यापुढील प्रगति करणारें ठरणार आहे. हें कार्य यशस्वी तऱ्हेनें न झाल्यास स्थानिकच काय, पण कोणत्याहि कामांत यश येणें कठिण आहे.

### स्थानिक स्वराज्यसंस्था आणि राजकीय पक्ष

स्थानिक स्वराज्यसंस्थांमध्यें राजकीय पक्षांच्या भूमिकेवरून निवडणुका लढविल्या जातात. त्यांचा उपयोग देशांत कोणत्या पक्षास किती पाठिंबा आहे हें पाहण्याकडे होतो आणि इंग्लंड वगैरे देशांत स्थानिक संस्थांच्या निवडणुकीच्या निकालावरून देशांत कोणत्या पक्षास अनुकूलता जास्त आहे हें पाहण्यांत येतें. आपल्याकडेहि हीच प्रथा पडूं पाहत आहे. राजकीय पक्षांच्या दृष्टीनें ही गोष्ट सोयीचीच आहे. त्यांना आपलीं प्रचारसाधनें नेहमीं वापरांत ठेवण्यास जितकी संधि मिळेल तितकी हवीच असते. ह्या दृष्टीनें ते ते पक्ष या निवडणुकीचा उपयोग करून घेतात. राजकारणांतील पक्ष आणि स्थानिक स्वराज्यसंस्थांतील पक्ष यांमध्यें मूलभूत फरक असल्यामुळें या पक्षांना तेथें अधिष्ठान कितपत आहे याचा विचार होणें अवश्य आहे. निदान पुढील एक पिढीपर्यंत स्थानिक स्वराज्यसंस्थांतील मूलभूत प्रश्नच इतके प्रचंड आहेत कीं, त्यांवर राजकीय पक्षांचें एकमत आहे. देशांतील राजकारणांतील दैनंदिन प्रश्नांवर मतैक्य न झालें तरी स्थानिक प्रश्नांच्या बाबतीत राजकीय भूमिकेवरून निवडणुका लढविणें आपल्या देशाच्या आजच्या परिस्थितींत तरी युक्त होणार नाहीं असें वाटतें. ही गोष्ट पुष्कळ विचारी माणसांस पटली आहे, असें अलीकडील पुष्कळ घटनांवरून दिसून येईल. ठिकठिकाणीं राजकीय पक्ष एकत्र येऊन स्थानिक स्वराज्याच्या निवडणुकी कांहीं विशिष्ट कारणानुसार लढवितांना दिसतात. ही गोष्ट आजच्या परिस्थितींत योग्य नसून स्थानिक स्वराज्यसंस्थांपासून राजकीय पक्ष दूर राहून कार्यक्रमानुसार जर निवडणुका लढविल्या गेल्या, तर मतदारांना स्थानिक प्रश्नांपुरता विचार करून प्रतिनिधी निवडून देतां येतील.

येथवर आजच्या स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या अडीअडचणींचा विचार झाला. शेवटीं एकाच गोष्टीबद्दल उल्लेख करावासा वाटतो. ती म्हणजे सर्व लोकशाहीचा पाया जो मूळ मतदार त्याच्यांत दैनंदिन व्यवहाराबद्दल जितकी आस्था उत्पन्न होईल तितक्याच प्रमाणांत स्थानिकच काय, पण कोणतीहि लोकशाही यशस्वी होईल. म्हणून यापुढील काळांत या दृष्टीनें सर्व प्रयत्न होणें हें अगत्याचें आहे.

---

" सर्व माणसें सारखीं असून विधात्यानें त्यांना उपजतच कांहीं हक्क बहाल केले आहेत; या हक्कांत जीवन, स्वातंत्र्य आणि सुखासाठीं प्रयत्न यासंबंधींच्या हक्कांचा समावेश होतो. हीं सत्यें स्वयंस्पष्ट आहेत असें आम्ही मानतों. हे हक्क अबाधित ठेवण्यासाठीं सरकारें अस्तित्वांत येतात. ज्यांच्यावर राज्य करावयाचें त्यांच्या संमतीनें या सरकारांच्या हातीं सत्ता देण्यांत येते. मूळ उद्दिष्टालाच जेव्हां एखादें सरकार मारक ठरतें तेव्हां तें सरकार बदलण्याचा किंवा संपुष्टांत आणण्याचा लोकांना अधिकार आहे. त्याचप्रमाणें संरक्षण व सुख अधिक निश्चितपणें मिळावें म्हणून योग्य अशा तत्त्वांवर अधिष्ठित असलेलें सरकार स्थापन करण्याचा लोकांना अधिकार आहे. "

—अमेरिकेच्या ' स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यां 'तून ( ४ जुलै १७७६ ).










गेल्या निवडणुकांतील प्रत्यक्ष अनुभवावरून सुचलेले कांहीं निष्कर्ष : श्री. दि. के. बेडेकर

# भारतीय लोकशाहीच्या नव्या युगास प्रारंभ

आपल्या राष्ट्रीय लढ्याचें सूत्र ब्रिटिश सत्तेला विरोध हेंच होतें आणि "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" या घोषणेंतहि विदेशी सत्ते-ऐवजीं देशी सत्ता आणण्याच्या आकांक्षेचाच उच्चार आहे हेंहि खरें. परंतु जास्त खोलवर पाहिलें, तर असेंहि दिसतें कीं, जी देशी सत्ता येथें प्रस्थापित करावयाची ती लोकमतानुवर्ती प्रातिनिधिक स्वरूपाची असली पाहिजे हें तत्त्वहि अगदीं लोकहितवादींच्या काळापासूनच आपल्या पुढाऱ्यांनीं मांडलेलें आढळतें. केवळ मूठभर धनिक, राजे-रजवाडे व सुखवस्तू व्यक्ती यांच्या तिजोऱ्या भरण्यासाठीं 'स्वराज्या'ला राबविण्याची स्वार्थी कल्पना मनांत घोळविणारी देशभक्तांची जात हळू हळू आपल्या राष्ट्रीय चळवळींत निर्माण होत गेली हें जरी खरें, तरी एकंदर चळवळीचें सामर्थ्य व रोख लोकहितवादी लोकराज्याच्या स्थापनेसाठींच होता. याचें प्रत्यंतर म्हणूनच असें दिसतें कीं, सत्तान्तराच्या वेळींच काढतां पाय घेणाऱ्या ब्रिटिशांना व नव्या सत्ताधाऱ्यांना प्रौढ मताधिकाराचा स्वीकार करावा लागला. या मताधिकाराची प्रत्यक्ष अंमल-बजावणी करण्याची संधि या निवडणुकांमुळें सामान्य जनतेला मिळाली याचें मर्महि माझ्या मतें असें आहे कीं, लोकशाहीला विरोधी असलेल्या वर्गांच्या व व्यक्तींच्या शक्तीपेक्षां भारतीय जनतेच्या राजकीय परंपरेची व जागृतीची शक्ति फार मोठी आहे व म्हणूनच भारतीय लोकशाहीचा विकास झपाट्यानें होण्याची आशा आज बाळगणें शक्य आहे.

आपल्या देशांत 'स्थानिक स्वराज्या'च्या कारभारांत लोकशाहीचा प्रयोग झाला असें मानण्याची व या कारभाराची 'म्युनिसिपालिटी' झाली असें म्हणून, त्यावरून आपल्या देशांतला मतदारच नालायक आहे, असें तुच्छतेनें सुचविण्याची फॅशन सुशिक्षितांत दिसते ! पण पहिली गोष्ट अशी कीं, ब्रिटिशांच्या हुकमती-खालीं त्यांच्या भेदनीतीनें व धनिकांना चुचकारण्याच्या कारवाईनें स्थानिक स्वराज्याचा खेळखंडोबा झाला, म्हणून त्या प्रयोगाला लोकशाही-चा प्रयोग म्हणणेंच धादान्त चूक आहे ! त्यांतून त्या प्रयोगाला जें अपयश आलें त्याचें 'श्रेय' सुशिक्षितां-च्याच पदरीं टाकलें पाहिजे; कारण त्यांनींच या नगरपालिकांमध्यें गटबाजीची व हेवेदाव्यांची हातून स्वार्थ साधण्याची दुष्ट परंपरा निर्माण केली. मग बजबजपुरी माजल्यावर मात्र या लोकांना वाटूं लागलें कीं, असल्या गोंधळापेक्षां एखाद्या शहाण्याची एकतंत्री सत्ता असल्याखेरीज आपलें भलें होणार नाहीं !

सुदैवानें सुशिक्षित वर्गाची लोकशाहीबद्दलची ही अनास्था व संशयित वृत्ति सर्वसाधारण समाजांत कधीं रुजली नाहीं व ह्या विषाची बाधा सामान्य नागरिकाला व मतदाराला झाली नाहीं आणि म्हणूनच प्रौढ मतदानाबद्दल लोकांमध्यें एक उत्साह दिसला. परवांच्या निवडणुकीचें हें वैशिष्ट्य आहे. या उत्साहामुळें लोकांनीं अनपेक्षित चांगलें मतदान केलें व आपल्या कुवतीप्रमाणें उमेदवारांच्या व पक्षोपपक्षांच्या दानतीचें व कर्तृत्वाचें मोजमाप केलें.








# भारतीय लोकशाहीच्या नव्या युगास प्रारंभ

## डोळस मतदान करण्याची धडपड

या निवडणुकींतून सुशिक्षितांमध्यें अनास्था व तटस्थ संशयात्म्यांची वृत्ति मला दिसली व उलट सामान्य मतदारांत उत्साह दिसला, असें माझ्या अनुभवांवरून मी म्हणतों. पुण्याच्या पदवीधरांच्या मतदारसंघांत आणि सोलापूरच्या साधारण मतदार-संघांत आलेल्या विविध अनुभवांच्या आधारावर वरील निष्कर्ष मी काढीत आहे. याच अनुभवां-वरून मला असेंहि दिसलें कीं, सामान्य मतदारांमध्यें नुसती मतदानाची इच्छाच नव्हती, तर तीं डोळस-पणानें करण्याची धडपड होती. उदाहरणार्थ, सोलापूरच्या मतदारसंघांत तेलगू गिरणी-कामगार, मराठी गिरणी-कामगार, शिक्षक व गरीब नोकरी-पेशाचे लोक व मुसलमान कामगार यांच्याशीं माझा संबंध आला. या सर्वांमध्यें केवळ स्वतःच्या मतापुरतें पाहण्याची प्रवृत्ति नव्हती, तर दुसऱ्या जातींचे व वर्गांचे मतदार कोणत्या पक्षाकडे झुकत आहेत व कां झुकत आहेत या गोष्टीकडे सर्वजण मोठ्या जिज्ञासेनें व कळकळीनें पाहत असत. यांपैकीं प्रत्येक जमातीला व वर्गाला वेगवेगळ्या पक्षांकडून जीं आश्वासनें देण्यांत आलीं त्यांचाहि मतदारांनीं विचार केलेला मला आढळला.

येथेंच ही गोष्ट आपण विचारांत घेऊं या कीं, निव्वळ श्रद्धाळुपणा, व्यक्तिमाहात्म्य व पक्षांध वृत्ति यांचा प्रभाव मतदारांच्या मनावर किती प्रमाणावर होता ? या बाबतींत मला असें स्पष्ट दिसलें कीं, असा प्रभाव फारच अल्प प्रमाणावर झालेला दिसतो. उदाहरणार्थ, कॉंग्रेसच्या प्रचारांत पंडित नेहरू व महात्माजी यांच्यावरील श्रद्धेला कौल लावण्याचा प्रयत्न स्थानिक कॉंग्रेस प्रचारकांकडून झालाच व तोहि अगदीं भडक तऱ्हेनें झाला. उमेदवाराच्या कर्तृत्वाची व कॉंग्रेसच्या कार्य-क्रमाची मतदाराला माहिती करून देण्याऐवजीं सगळीकडे नेहरूंच्या रंगीत फोटोंचीं मोठालीं पत्रकें चिकटविण्यांत आलीं व व्याख्यानांतूनहि त्यांच्या गौरवावरच भर देण्यांत आला. परंतु, मतदारांशीं बोलतांना मला असें आढळलें कीं, लोकांना महात्माजींच्या विभूतिमत्त्वाबद्दल आदर आहे व तो अढळ आहे; तसेंच नेहरूंच्याबद्दलहि प्रेम आहे; पण त्यांनीं कॉंग्रेस या राजकीय पक्षाबद्दल पक्ष-संघटना म्हणूनहि विचार केलेला आहे. हा विचार निरक्षरां-नीं केला कसा ? त्यांनीं कोणतीं वृत्तपत्रें वाचलीं ? कोणते जाहीरनामे वाचले ?—यांचें उत्तर अर्थातच असें द्यावें लागेल कीं, या साधारण मतदारांनीं कॉंग्रेसचा, समाजवाद्यांचा, हिंदुत्वनिष्ठांचा किंवा कम्युनिस्टांचा व शेतकरी-कामकरी-पक्षाचा जाहीर-नामा वाचलेला नव्हता. पण स्वतःच्या जीवनांत आलेला अनुभव या मतदारांनीं जमेस धेतलेला दिसला व त्या अनुभवावर आधारलेलेच विचार त्यांच्या मनांत घोळत असलेले मला आढळले.

## भाकरी, नोकरी, घर व शांतता

सामान्य मतदारांनीं ज्या अनुभवांच्या आधारा-वर विचार करून आपलीं मतें टाकलीं ते अनुभव अगदीं साध्या व नित्याच्या व्यवहारांतले होते व म्हणून त्यांचा विचार करून स्वतःचा निर्णय घेणें प्रौढ अशा प्रत्येक पुरुषास व स्त्रीला शक्य होतें व म्हणूनच या निवडणुकांमध्यें लोकमताचें ढोबळ-मानानें पण खरें मोजमाप झालें असें मला वाटतें. एकंदर भारतांत ४१ टक्के मतदारांनीं मतदान केलेंच नाहीं व उरलेल्या ५९ टक्के मतदारांपैकीं ४५ टक्के लोकांनीं कॉंग्रेसला मतें दिलीं. याचा अर्थ काय ? तो अर्थ असा कीं, १७·६ कोटी प्रौढ स्त्री-पुरुषांपैकीं ४१ टक्के मतदार अजाण किंवा तटस्थ होते तरी ५९ टक्के मतदारांनीं ( म्हणजे १०·४ कोटी लोकांनीं ) आपल्या रोजच्या अनुभवांचा विचार करून आपल्याला अमुक तऱ्हेचें राज्य हवें व तें चालविण्यासाठीं अमुक उमेदवार लायक ठरेल असा निर्णय घेतला होता; आणि या निर्णय घेणाऱ्यांपैकीं फक्त ४५ टक्के लोकांना कॉंग्रेसची राजवट चालू राहिली तर क्रमाक्रमानें कां होईना पण आपल्या अडचणी दूर होतील असें वाटत होतें.

मतदारांच्या नित्याच्या अनुभवांमध्यें मुख्यतः मला चार गोष्टींना महत्त्व दिलें गेलेलें आढळलें. त्या चार गोष्टी म्हणजे भाकरी, नोकरी, घर व शांतता. कॉंग्रेसच्या सत्ताधाऱ्यांनीं व कॉंग्रेस पक्षानें या बाबतींत काय आश्वासनें मागें दिलीं होतीं व त्यांपैकीं किती व कशीं पुरीं केलीं याचें मोजमाप








लोकांनीं आपल्या परीनें केलें. काळा बाजार नष्ट करण्यासाठीं कडक उपाय योजण्याचें आश्वासन कॉंग्रेसनें पुरें केलें का? रेशनिंग चालूं राहिलें, परंतु तें नीट चाललें का? धान्याची पैदास वाढविण्यांत यश मिळालें का? कापडाची पैदास व वांटप योग्य झालें का? घरबांधणीची योजना अंमलांत आली का?—या साऱ्या प्रश्नांनीं लोकांचीं मनें भारलेलीं होतीं व त्यांचीं उत्तरें लोक आपल्या अनुभवांतून स्वतःशींच देत होते. सोलापूरचेंच उदाहरण घेतलें तर तेथील मतदारांपुढें दोन-तीन गोष्टी अगदीं उघड दिसणाऱ्या होत्या. तेथील जुनी गिरणी बंद पडल्यामुळें हजारों कामगारांच्या तोंडची भाकरी जाऊन त्यांच्या संसाराची वाताहत झाली होती व या गोष्टीचा अनिष्ट परिणाम कामगार-वस्तींतील छोटे दुकानदार व शिंपी, सलूनवाले इत्यादि धंदेवाले यांनाहि भोंवलेला होता. घरबांधणीचा एक अजब प्रयोग सोलापूरलाच झालेला लोकांना दिसत होता. सरकारनें लाखों रुपये खर्च करुन गिरणी-कामगारांसाठीं घरें बांधलीं, पण तीं बांधण्या-पूर्वीं कामगारसंघाच्या सहकार्याची व कामगारांच्या ऐपतीची दखल घेतली नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, तीं घरें इतक्या महाग बांधणीचीं तयार झालीं कीं, कोठल्याहि कामगाराला पगारांतील चौथा-पांचवा हिस्सा (पंचवीस रुपये महिना) देऊन त्या घरांत राहणें अशक्यच होतें! तेव्हां बांधलेलीं घरें कांहीं काळ रिकामीं पडलीं व शेवटीं तीं रिकामीं राहावयास नकोत म्हणून पोलिस-खात्याला बहाल करण्यांत आलीं!

अशा सर्व गोष्टींचा परिणाम म्हणजे सत्ता-धाऱ्यांसंबंधीं लोकांमध्यें कडवटपणा निर्माण झालेला दिसला व कॉंग्रेस पक्षहि लोकांपासून दूर राहून सत्तेच्या भोंवतीं घोटाळत आहे, असा अनुभव लोकांना या साध्या साध्या गोष्टींमुळें आलेला मला आढळला.

शेवटची म्हणजे शांततेची बाब मात्र अर्थातच नित्याच्या अनुभवांतली नव्हती. सर्वसाधारण मतदारांना या बाबतींत मोठी आंच होती असें नाहीं. पण दुसऱ्या महायुद्धामुळें महागाई, काळा बाजार वगैरे सर्व आपत्ती कोसळल्या व म्हणून पुनः युद्ध नको व देशांतहि यादवी नको असें मात्र प्रत्येक साधारण मतदाराला वाटत होतें असें आढळून आलें. संयुक्त राष्ट्रसंघामधील वादांची सामान्य माणसाला कल्पना नव्हती; कारण आपल्याकडे एकंदरींतच आंतरराष्ट्रीय राजकारणाची माहिती अपुरी आहे. वर्तमानपत्रें नेमानें वाचणारा मत-दारहि एकंदरींत या बाबतींत गोंधळलेला दिसत होता. ब्रिटिश व अमेरिकन राष्ट्रांचे पुढारी आपल्या वसाहती टिकवूं पाहत आहेत व काश्मीर-प्रकरणा-सारख्या प्रत्येक बाबतींत भेदनीतीचें कारस्थान चालवीत आहेत, याची जाणीव लोकांना दिसली; परंतु कॉंग्रेसचें परराष्ट्रीय धोरण चूक का बरोबर, याबद्दल लोकांच्या मनांत गोंधळ असलेला मला दिसून आला. नेहरूंचें एकंदर धोरण स्वतंत्र बाण्याचें दिसतें व तरी साम्राज्यवाद्यांच्या कारस्थानांना आपण तोंड देऊं शकलों नाहीं असेंहि दिसतें. या अपयशाचें कारण काय? रशिया व चीन या देशांबद्दल एकीकडे मैत्रीचें धोरण दिसतें, पण दुसरीकडे या मैत्रीला विघातक ठरणारी ब्रिटिश-अमेरिकनांशीं मिळतें घेण्याची प्रवृत्ति दिसते. या प्रकारांबद्दल लोकांमध्यें अंधुक अशी जाणीव मला दिसली. त्याचबरोबर सुशिक्षित मतदारांपैकीं बहुतेक मतदारांना तिसऱ्या महायुद्धाचा धोका वाढत आहे याची जाणीव आलेली दिसली. आपल्या राष्ट्राचें धोरण आहे त्यापेक्षां जास्त खंबीर व स्वतंत्र असावयास पाहिजे व तिसरें महायुद्ध टाळण्यासाठीं नेहरूंनीं जास्त नेटाचा प्रयत्न केला पाहिजे अशी सुशिक्षित व अशिक्षित अशा सर्वच मतदारांची अपेक्षा आढळून येत होती.

### निवडणुकांनीं सुरू झालेलें नवें पर्व

सन १८८५ पासून सन १९२० पर्यंत भारतीय राजकीय जीवनांतील पहिलें पर्व संपलें. निर्भेळ सनदशीर राजकारणापासून दहशतवादी जहाल कृतीपर्यंत सर्व मार्गांनीं राष्ट्रीय लढ्याचा विस्तार व उग्रपणा वाढत गेला. पण या सर्वच लढ्यांची एक तऱ्हेची कोंडी झाल्यासारखी अवस्था येऊन, सन १९२० मध्यें एका नव्या पर्वाचा प्रारंभ होणें अवश्य ठरलें. जुन्याच्या कोंडींतून नव्याची वाट फोडण्याची ही शक्ति राष्ट्रामध्यें कोठून आली?

याचें उत्तर असें कीं, ही शक्ति सन १९२० च्या सुमारास जो साधारण लोकसमाज होता त्याच्यांतच उत्पन्न झाली होती. ' भारतीय राजकारण मूठभर पुढाऱ्यांनीं व तरुण देशभक्तांनीं चालविण्याचा काळ संपला आहे, आतां आम्ही सारेजण या लढ्यांत प्रत्यक्ष भाग घेण्याला उत्सुक आहोंत. निःशस्त्र असलों, तरी आमच्यांतच आतां धैर्य व राष्ट्रीय बलिदानाची ऊर्मि उत्पन्न झाली आहे ' असा एक मूक संदेशच जणूं काय भारतीय जनतेनें पुढाऱ्यांना दिला होता ! हा संदेश ऐकण्याची व जनतेला प्रत्यक्ष प्रतिकाराचा व्यवहार्य कार्यक्रम देण्याची कुवत त्या वेळच्या मवाळ व जहाल देशभक्तांमध्यें पुरेशी नव्हती व म्हणूनच महात्माजींसारखा एक नव्या प्रतिभेचा पुढारी हवा होता. जनतेच्या मूक सामर्थ्यामध्यें हीच विलक्षण शक्ति असते कीं, तिच्या सामर्थ्यामुळेंच त्या त्या काळाला अनुरूप असा नेता, संघटना व साधनें उत्पन्न होतात व जनतेची वाटचाल नव्या युगाच्या व नव्या निर्मितीच्या रोखानें सुरू होते. नवे पुढारी हे द्रष्टे ठरतात व जनतेच्या श्रद्धेचें अढळ स्थान होऊन बसतात. सन १९२० मध्यें ही विलक्षण गोष्ट घडली व गांधीयुगाचा प्रारंभ झाला. गांधीजी हे जसे या नव्या प्रतिभेचे राष्ट्र-पुरुष होते, त्याप्रमाणें सन १९२० च्या वेळची भारतीय जनताहि या नव्या सामर्थ्यानें संपन्न अशी राष्ट्रनिर्मात्री शक्ति होती.

नेमकी हीच गोष्ट आज तीस वर्षांनीं पुन्हां घडत आहे. निवडणुकींनीं हीच गोष्ट स्पष्ट केली आहे असें मला वाटतें. सन १९४६ च्या निवडणुकांमध्यें आपण असें पाहिलें होतें कीं, कॉंग्रेसला जवळजवळ शंभर टक्के यश मिळालें होतें. त्या वेळीं कॉंग्रेसविरोधी पक्षांपैकीं कम्युनिस्ट पक्षच घेतला तर तो अंतर्गत मतभेदांनीं आजच्याप्रमाणें अशक्त झालेला नव्हता व त्या पक्षावर या वेळीं निवडणुकीमध्यें असलेले निर्बंधहि नव्हते. सन १९४८ नंतरचीं दोन वर्षें साहसवादी धोरण पत्करून जी अप्रियता त्याला या वेळीं लाभली ती सन १९४६ मध्यें नव्हती. असें असून आज ज्या राज्यांमध्यें कम्युनिस्ट पक्षानें प्रचंड यश मिळविलें त्याच ठिकाणीं ( उदा. त्रावणकोर, कोचीन, आंध्र इत्यादि राज्यांत ) कॉंग्रेसला त्या वेळीं भरघोस जय मिळाला होता. उलट, नुकत्याच झालेल्या निवडणुकींत सोलापूरला आम्हांला हा अनुभव आला कीं, सन १९४६ मध्यें उभा राहून यशस्वी झालेला तोच कॉंग्रेसचा उमेदवार आजहि निवडणुकीला उभा राहिला, पण त्या कॉंग्रेस उमेदवाराला या निवडणुकींत सन १९४६ मधल्याच कम्युनिस्ट उमेदवारापुढें हार पत्करावी लागली. हा बदल स्थानिक किंवा वरवरचा नाहीं; उलट, साऱ्या भरतखंडांतील राजकारणाचा नूर बदलला असल्याची व युगच पालटलें असल्याची ही खूण आहे.

### मतदारांची सामाजिक क्रांतीची अपेक्षा

सन १९२० मध्यें सुरू झालेल्या युगाचें, म्हणजे गांधीयुगाचें वैशिष्ट्य राष्ट्रवादाच्या जास्त प्रखर लोकाभिमुखतेंत होतें. त्याप्रमाणें सन १९५० मधील या युगारंभाचें वैशिष्ट्य व्यापक अशा सामाजिक क्रांतीच्या अपेक्षेंत आहे. ही अपेक्षा कॉंग्रेसच पुरी करूं शकेल असें वाटणारा मतदार आज फक्त ४५ टक्के आहे. उलट, ५५ टक्के मतदार कॉंग्रेसविरोधी पक्षांकडे पाहत आहेत. असा हा मतदारांचा कौल आहे. यांत आणखीहि कांहीं गोष्टी बारकाईनें पाहिल्यास दिसूं शकतील. कॉंग्रेसला पाठिंबा देणाऱ्या मतदारांपैकीं बराच वर्ग असाहि होता कीं, त्याला कॉंग्रेसच्या भावी कर्तृत्वाबद्दल विशेष आशा उरली नव्हती; परंतु केवळ आहे ती सत्ता स्थिर राहावी व अराजक होऊं नये या बुद्धीनें त्यांनीं कॉंग्रेसला मतें दिलीं. अशा केवळ सावधगिरीच्या भूमिकेवरून कॉंग्रेसला पाठिंबा मिळाला. याचाच परिणाम असा झाला कीं सत्ता स्थिर राहावी असें इच्छिणारे मतदार तात्पुरते कॉंग्रेसचे समर्थक राहिले.

सामाजिक क्रांतीसाठीं समाजाला मार्गदर्शन करण्याची तयारी दाखविणाऱ्या पक्षांना सत्ता काबीज करतां येईल व नीट राज्य चालवितां येईल अशी खात्री, किंबहुना नुसती आशाहि, जर या ४५ टक्के मतदारांना असती, तर निवडणुकांचे निकाल अगदीं वेगळे लागले असते; कॉंग्रेसला सगळीकडे



अनुक्रमणिका








अपयश येऊन बहुतेक ठिकाणीं लोकाभिमुख पक्षांची सत्ता आली असती !

असें प्रत्यक्षांत घडलें नाहीं, याचें कारण काँग्रेस-विरोधी पक्षांच्या धोरणांत आहे. या पक्षांपैकीं समाजवादी पक्ष हा निवडणुकीच्या रंगणांत मोठ्या गर्जना करीत उतरला. परंतु त्या गर्जना केवळ आत्मवंचनेसारख्या ठरल्या. मतदारांनीं आपला जो कौल दिला त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, सामाजिक क्रांतीसंबंधींच्या केवळ घोषणांनीं मतदार हलत नाहीं, तर कर्तृत्वाकडेहि व पक्षाच्या इतिहासा-कडेहि तो डोळसपणानें पाहूं शकतो. अपेक्षेप्रमाणें यश न मिळण्याचें हें कारण समाजवादी पक्षाच्या धर-सोडीच्या इतिहासांत पाहावयास मिळतें. तीच गोष्ट कम्युनिस्ट पक्षाच्या बाबतींत म्हणतां येईल. या युगपरिवर्तनाच्या आणीबाणीच्या वेळीं जितक्या निर्णायक तऱ्हेनें जनतेचा व्यापक पाठिंबा मिळविणें कम्युनिस्ट पक्षाला आवश्यक होतें व मतदारांच्या तयारीच्या दृष्टीनें पाहतां शक्यहि होतें तितका पाठिंबा कम्युनिस्टांना मिळवितां आला नाहीं. नुसता कार्यक्रम व प्रखर निष्ठा व कार्यकर्त्यांची कुशलता ह्या गोष्टी आवश्यक असल्या, तरी शेवटीं त्या दुय्यम असतात. कोठच्याहि पक्षाचें सामर्थ्य हें अखेरीस लोकांच्या पाठिंब्यावरच अवलंबून असतें ही गोष्ट कम्युनिस्टांना जें मर्यादित यश ( आणि वास्तविक गरजेच्या कसोटीनें अपयश ! ) मिळालें त्यावरून दिसून येतें. साहसवादाच्या घोर चुकीमुळें व राष्ट्रीय आणि प्रादेशिक प्रश्नांशीं पूर्णपणें समरस न झाल्या-मुळें कम्युनिस्टांनीं स्वतःबद्दल एक दुजाभाव निर्माण करून घेतला होता व म्हणूनच काँग्रेसला बाजूला सारून कम्युनिस्टांना सत्ताधिष्ठित बनवि-ण्याचा धीर सामान्य जनतेला झाला नाहीं. सामान्य लोकांना हिंसा-अहिंसेच्या वादाचा बागुल-बोवा वाटत नव्हता व तो कधींच वाटत नाहीं. तसेंच कम्युनिस्ट पक्षाला रशियाचे भाडोत्री हस्तक मानण्याइतकी सामान्य जनता दूधखुळीहि नाहीं ! काँग्रेसच्या आणि समाजवाद्यांच्या वतीनें अशा तऱ्हेचा प्रचार भडक तऱ्हेनें झाला तरी त्याचा लोकमतावर परिणाम झाला असें मला वाटत नाहीं. पण लोकांना असें मात्र वाटलें कीं, कम्युनिस्टांनीं अजून स्थानिक प्रश्नांचीं उत्तरें कोणतीं तीं तत्त्वतः आणि व्यवहारांत पटवून दिलेलीं नाहींत आणि त्यांच्या हातून झालेल्या चुकांमुळें आजच त्यांच्या हातीं सत्तेचीं सूत्रें येणें धोक्याचें आहे. हा लोक-मताचा अंदाज निवडणुकींतील एकंदर मतदाना-वरून बरोबर ठरतो असें मला वाटतें.

## आतां यापुढें कसोटीचा काळ

येथपर्यंत निवडणुकीमधील लोकमताच्या कौलावरून कांहीं ढोबळ निष्कर्ष मीं काढले आहेत त्यावरून निवडणुकीनंतरच्या काळाबद्दल थोडें सांगून मी समारोप करतों. सन १९२० प्रमाणेंच आपल्या राष्ट्रीय लढ्यांत व आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवनांतहि आज सन १९५० नंतर एक नवें युग सुरू झालें आहे, हें मीं मागेंच सांगितलें आहे. मागील युगारंभाच्या वेळीं महात्माजींच्या व्यक्तित्वामुळें व सुशिक्षित आणि अशिक्षित समाजांतील सत्त्व, धैर्य आणि कार्य-कौशल्य यांमुळें आपल्या देशाचें पाऊल कोंडींतून बाहेर पडलें. आजच्या या युगारंभाच्या वेळींहि संयुक्त आघाडीचा उदय झालेला दिसत आहे व त्या आघाडीमध्यें सर्व जहाल पक्षांतील कार्य-कर्त्यांची, निःस्वार्थी काँग्रेसवाद्यांची आणि सर्व समाजांतील राष्ट्रप्रेमाची व ध्येयवादाची शक्ति एकवटण्याचा क्षण आज ना उद्यां येईल असें दिसत आहे. सन १९२० मध्यें महात्माजींच्या व्यक्तित्वाचें महत्त्व व माहात्म्य त्या काळाला अनुसरून फार होतें, पण आजची भारतीय जनता व्यक्तिमाहात्म्याच्या व गूढ अंतःप्रेरणेवर आधार-लेल्या भावनात्मक श्रद्धेच्या राजकारणापासून जेवढें शिकावयाचें तेवढें शिकून जास्त प्रौढ, डोळस व बुद्धिवादी झाली आहे. निव्वळ 'कायदा व सुव्यवस्था', 'राज्याचें स्थैर्य', 'राष्ट्रीय गौरव'-असल्या घोषणांनीं आज जनता भुलत नाहीं व साधनशुचि-तेच्या वादंगांतहि ती गुरफटत नाहीं हा अनुभव निवडणुकीनें सर्वांना आणून दिला आहे. त्याच-बरोबर भडक आतषबाजीसारख्या घोषणांनींहि जनतेला भुरळ पडत नाहीं हा धडा आपण शिकलों आहोंत.

## भारतीय लोकशाहीच्या नव्या युगास प्रारंभ

मग आतां पुढची वाटचाल कशी होणार व लोकांच्या सामर्थ्याचा आविष्कार होण्यास कोणाचें नेतृत्व पुरें पडणार हा प्रश्न आहे व यांतच साऱ्या पक्षांची कसोटी आहे. हीच भारतीय लोकशाही-चीहि कसोटी आहे. आपला देश यादवीच्या अग्निदिव्यांतून न जातां शांततेच्या मार्गानें नव्या युगांतील विकास करूं शकेल कीं नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर जनतेच्या बाजूनें स्पष्ट 'होय' असें आहे. शांततामय विकास नुसता इष्टच नव्हे, तर शक्य आहे. तो भारतांतच काय, पण प्रत्येक देशांत शक्य होता व यापुढेंहि आहे. जनतेचें दुर्दैव असें दिसतें कीं, जें शांततेनें शक्य असतें तें जनतेला हवेसें वाटलें, तरी मूठभर स्वार्थी धनिकांना तें नको असतें व मग त्यांच्याकडून देशावर यादवी लादली जाते. हाच अनुभव मागें फ्रेंच क्रांतीमध्यें व रशियन क्रांतींत आला व तोच अनुभव चीन-मध्यें मावत्से-तुंगलाहि आला. तरी पण भारतीय लोकशाहीचा शांततेनें विकास होण्याचा प्रयत्न आज या युगांतील क्रांतीची धुरा ज्यांना वाहा-वयाची आहे त्या लोकाग्रणींनीं करावयास हवाच. जर त्यांना अपयश आलें व मावत्से-तुंगप्रमाणें यादवीच्या हलाहलाला पचवून राष्ट्राला पुढें नेण्याची वेळ आली, तर तशी वेळ येतांच तें कार्य त्यांना पार पाडण्याचें सामर्थ्यहि येईल. कारण, अखेरीस हें सामर्थ्य एखाद्या महापुरुषाच्या अंतःप्रेरणेंत किंवा एखाद्या पक्षाच्या संघटनेंत नसून सामान्य लोकसमूहाच्या मनांतील व मनगटांतील अजिंक्य व अमर्याद शक्तींतच असतें ! निवडणुकांमध्यें या शक्तीचें स्वरूप केवळ ओझरतें प्रगट झालें आहे. संयुक्त लोकशाही आघाडीचें निशाण हें या शक्तीचें नुसतें चिन्ह आहे. या शक्तीचा आविष्कार यापुढें आपल्या जीवनांतील प्रत्येक क्षेत्रांत झपाट्यानें होत जाणार आहे व या आविष्काराला उपकारक असा व्यवहार प्रत्येक पक्ष, वर्ग आणि व्यक्ति कितपत जाणतेपणानें व खंबीरपणानें करते यावरच आपल्या देशाचें व संस्कृतीचें भवितव्य अवलंबून आहे.

---

## कम्युनिस्टांची प्रणयाची कल्पना

एका चिनी कम्युनिस्टानें हॉंगकॉंग येथील वृत्तपत्रांत प्रणयभावनेसंबंधीं कांहीं विचार प्रकट केले आहेत. त्यावरून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" प्रणयभावनेचेंहि तीन ऐतिहासिक कालखंडांतून संक्रमण झालें आहे : सरंजामशाहीच्या काळांत पुरुष आणि स्त्री यांच्यामधील प्रणयाचें स्वरूप मालक-गुलाम या प्रकारचें होतें; स्त्रीनें नेहमीं माणसाचें निमूटपणें ऐकायचें; ती पुरुषाच्या मालकीची एक वस्तु होती. भांडवलशाहीच्या काळांत प्रेमाची खरेदी-विक्री होऊं लागली. पुरुषाकडून मिळणाऱ्या सुखसोयी आणि ऐषआराम यांच्या बदल्यांत स्त्री ही आपलें सौंदर्य, तारुण्य आणि शरीर पुरुषाला विकूं लागली. शेवटचा ऐतिहासिक टप्पा म्हणजे कम्युनिस्ट 'नव'-लोकशाहीचा. या काळांत स्त्रीपुरुषसंबंधांतील भाडोत्रीपणा नाहींसा होऊन प्रणयभावना उदात्त कोटीला पोहोंचली आहे. ही प्रणयभावना किंवा प्रेम हें गंभीर, बौद्धिक असून तें क्रांतीला निश्चितपणें उपकारक असतें. हीं कम्युनिस्ट प्रणयी युगुलें चन्द्राकडे पाहत किंवा 'बुरुजी' कामुकांप्रमाणें कुजबुजत बसणार नाहींत ! जर शत्रुपक्षाकडील एकादी स्त्री वा पुरुष कम्युनिस्ट पुरुषाशीं वा स्त्रीशीं प्रणयचेष्टा करायला लागला, तर कम्युनिस्ट त्याचा धिक्कार करील ! "--हा धिक्कार कोणत्या रूपानें केला जातो हें वरील चिनी लेखकानें स्पष्ट केलें नाहीं. कदाचित् शत्रुपक्षाकडील प्रणयाचा धिक्कार नवीन कम्युनिस्ट प्रणयगीत त्याच्या तोंडावर फेंकून करीत असतील. अशा एका कम्युनिस्ट प्रणयगीताचा शेवट पुढीलप्रमाणें आहे :

" माझ्या प्रियकरा, तूं सरहद्दीवर मोठ्या अभिमानानें पहारा करीत आहेस. सावध रहा. कोणालाहि निसटून आंत येऊं देऊं नकोस. या पहांटेच्या वेळीं गवत दंवबिंदूंनीं तार्जेतवानें हिरवेंगार दिसत आहे. माझ्या लाडक्या, सावध रहा. "

—'रॅडिकल ह्युमॅनिस्ट' वरून ( ६–७–५२ ) सारांशरूपानें अनुवादित.










लोकशाहीच्या अपयशांतून निर्माण होणाऱ्या समस्यांचें दिग्दर्शन : प्रा. ना. अ. मावळंकर

# लोकशाहीच्या पुनर्घटनेची आवश्यकता

## लोकशाही हा एक 'मंतरलेला' शब्द !

दोन महायुद्धांच्या दरम्यान जीं हुकुमशाही राष्ट्रें निर्माण झालीं, त्यांच्या उदयापासून जगामध्यें मुख्यत्वेंकरून दोन गट पडले आहेत : एक लोकशाही राष्ट्रांचा आणि दुसरा हुकुमशाही राष्ट्रांचा. परंतु त्याचबरोबर लोकशाहीभोंवतीं एक प्रकारचें अद्‌भुत-रम्यतेचें वलय निर्माण झालेलें आहे. शतकानुशतकें चालत आलेल्या लोकशाहीच्या तत्त्वाचा अजूनहि इतका प्रभाव आहे कीं, प्रत्येक राष्ट्र आपण लोकशाही राष्ट्र असल्याचें आवर्जून सांगत आहे; मग देशांतील राज्यपद्धति कोणतीहि असो ! एक गट असें म्हणतो कीं, भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत लोकशाही नांदूंच शकत नाहीं आणि म्हणून स्टॅलिनचा रशिया व माओचा चीन हींच लोकशाहीचीं खरीं माहेरघरें आहेत. सोविएत रशिया आणि त्याच्या गटांतील पूर्व युरोपांतील राष्ट्रें स्वतःला 'जनतेच्या लोकशाह्या' म्हणवून घेतात याचें कारण हेंच आहे. याच्या उलट, भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें असें कीं, समाजवाद ही गुलामगिरीची पहिली पायरी आहे आणि खरी लोकशाही ही भांडवलशाही समाज-रचनेंतच रुजूं शकेल. यावरून एक गोष्ट सिद्ध होते. ती ही कीं, आजच्या सुसंस्कृत जगांत प्रवेश पाहिजे असेल, तर लोकशाही हा परवलीचा शब्द झालेला आहे. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत ज्याप्रमाणें कोणतीहि गोष्ट मान्य व्हावयाची म्हणजे ती 'नैसर्गिक' व 'शास्त्रीय' असावी लागे, त्या-प्रमाणें विसाव्या शतकांत जें लोकशाहीला धरून आहे तें श्रेष्ठ नि कल्याणकारक असावयाचेंच, असें जणुं कांहीं समीकरणच बनलें आहे ! लोकशाही ही एक आदर्श जीवनपद्धति झालेली आहे. आजच्या मानवतेनें जें अत्यंत प्रिय आणि पवित्र म्हणून उराशीं बाळगलेलें आहे, त्याचें लोकशाही म्हणजे एक प्रतीक झालेलें आहे. मनुष्याच्या आकांक्षांची ती एक ध्वजा आहे आणि आपल्या प्राणांचें मोल देऊनहि या लोकशाही ध्वजेचें रक्षण करायला आजचा मानव तयार आहे.

तेव्हां १९४७ सालीं स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपण लोकशाही पद्धतीचा राज्यकारभार आपल्या देशांत सुरू केला हें योग्यच झालें.

## देशी हुकुमशाहीचा धोका

परंतु ही जी लोकशाही आपण आपल्या देशा-मध्यें अस्तित्वांत आणली, हिनें कोणत्या गोष्टी साध्य केल्या ? कित्येक लोक असें मानीत होते कीं, स्वातंत्र्य हेंच जीवनांतील उच्चतम मूल्य आहे आणि त्याच्या प्राप्तीबरोबर इतर सर्व मूल्यें आपल्या-समोर हात जोडून उभीं राहतील. परंतु या बाबतींत त्या सर्वांची निष्ठुर वंचना झाली आहे ! व्यक्तीचें जीवित आणि मालमत्ता सुरक्षित राहणें हा सुसंस्कृत जीवनाचा आधार आहे. पण स्वातंत्र्य-प्राप्तीपासून व्यक्तीच्या जीविताची आणि माल-मत्तेची शाश्वति कमी झाली आहे. मूलभूत हक्कांच्या बाबतींत आपली स्थिति ब्रिटिशांच्या 'सैतानी' राजवटींत होती तशीच—किंबहुना त्याहूनहि थोडी वाईटच अशी आहे. असें म्हणणें हें कदाचित् देशाभिमानाशीं विसंगत असेल, परंतु तें खरें आणि प्रामाणिकपणाचेंहि आहे. गांधीवादानें भारून गेलेल्या कांहीं राज्य-सरकारांनीं लाठीमार करणें, गोळीबार करणें, १४४ कलम पुकारणें या बाबतच्या ब्रिटिश परंपरेंत मुळींच खंड पडून दिलेला नाहीं. अशा परिस्थितींत व्यक्तीच्या ठिकाणीं जें कांहीं उच्च नि उदात्त आहे, त्याचा विकास होणें शक्य नाहीं हें उघड आहे. स्वातंत्र्यप्राप्तीबरोबरच निरनिराळ्या वर्गांत आणि हितसंबंधी लोकांत धुमसणाऱ्या मतभेदांनीं उग्र स्वरूप धारण केलें आणि या निरनिराळ्या विचारसरणींच्या लोकांना आणि हितसंबंधी व्यक्तींना सारखा न्याय देणें, निःपक्ष-पातीपणें वागविणें सरकारला शक्य झालें नाहीं ही गोष्ट आतां जाहीर आहे. सामाजिक न्यायाची प्रस्थापना



अनुक्रमणिका






अजून दूरच आहे. सामाजिक, आर्थिक व राजकीय स्वरूपाची पिळवणूक पूर्वीप्रमाणेंच चालू आहे. लांचलुचपत आणि वशिलेबाजी अंगवळणीं पडल्या आहेत आणि सत्तांध नोकरशाही तज्ज्ञांचा सल्ला झुगारून मन मानेल तसा धुडगूस घालीत आहे. भाववाढीनें मध्यमवर्ग मेटाकुटीला आलेला आहे आणि देशाचें आर्थिक धोरण ठरविण्याबाबत सरकार आणि भांडवलदार यांच्यामध्यें जणुं काय एक अपवित्र करारच झाला आहे! अन्नप्रश्नासारखे सार्वराष्ट्रीय प्रश्न तसेच भिजत पडले आहेत. 'न्यू स्टेट्स्मन अँड नेशन' मध्यें (१९-१-५२) श्री. अनिता मलीक यांनीं आपल्या 'अँज इंडिया व्होट्स्' या लेखांत म्हटल्याप्रमाणें—"टाळतां येण्यासारख्या आर्थिक घोडचुका, पैशाच्या गैरव्यवहाराचीं कुप्रसिद्ध प्रकरणें आणि जगजाहीर झालेले लांचलुचपतीचे आणि वशिलेबाजीचे प्रकार" हीं कॉंग्रेसच्या कारभाराचीं वैशिष्ट्यें होत. पंडित नेहरू ही सगळी घाण काढून टाकतील असें लोकांना वाटत होतें, पण त्याहि बाबतींत अपेक्षाभंग झाला आहे.

यावर सत्ताधारी पक्ष असें विचारूं शकेल कीं, "तर मग आज हिंदुस्थानांत खरी लोकशाही अस्तित्वांत नाहीं काय? आम्हीं नेहमीं लोकशाही मार्गाचा आणि पद्धतीचाच दक्षतेनें अवलंब केलेला नाहीं काय? गेल्या सार्वत्रिक निवडणुका म्हणजे लोकशाहीचाच एक भव्य प्रयोग नव्हता काय? प्रतिबंधक स्थानबद्धतेच्या कायद्यांवर बरीच टीका होते. परंतु हे कायदे भारतांतील सर्वोच्च न्यायालयासमोर तावूनसुलाखून निघालेले नाहींत काय? आणि ते घटनेशीं सुसंगत असल्याचा निर्वाळा त्या न्यायालयानेंच दिला नाहीं काय? अखेरीस कायदा म्हणजे तरी काय? जो कायदेमंडळांतील बहुमतानें एका विशिष्ट ठरलेल्या पद्धतीनें संमत केलेला असतो तो कायदा. ही पद्धत कांटेकोरपणें पाळलेली असली म्हणजे मग त्या कायद्यानें जें ठरतें तें योग्य आणि न्याय्य असलेंच पाहिजे." परंतु लोकशाहीचा बाह्य आचार आणि तिचें भरीव अंतरंग यांत फरक करण्यास सत्ताधारी पक्ष विसरला आहे. घटनेच्या २१ व्या कलमान्वयें कोणाहि व्यक्तीचें जीवित अगर स्वातंत्र्य "कायद्यानें घालून दिलेल्या पद्धतीचा अवलंब केल्याखेरीज (except according to procedure established by law)" हिरावून घेतां येत नाहीं. "कायद्याचा योग्यपणें अवलंब केल्या-(due process of law) खेरीज" या नेहमींच्या शब्दांऐवजीं वरील शब्द वापरण्यांत आले आहेत. याचा हेतु असा दिसतो कीं, कायद्याचा योग्य अवलंब कोणता आणि अयोग्य अवलंब कोणता याची चर्चा करण्यास न्यायालयांस जागा राहूं नये. मध्यवर्ती सरकारचे एक माजी मंत्री असें म्हणतात कीं, सत्याग्रह करणें हें लोकशाहीच्या विरुद्ध आहे. मग मिलचे ते अमर शब्द निरर्थकच म्हणावयाचें कीं काय? तो म्हणतो,[1] "सबंध मानवजात एका बाजूला असेल आणि एकहि मनुष्य जर दुसऱ्या बाजूला असेल, तर त्या एका मनुष्यानें त्याच्या अंगीं बळ असेल, तर सबंध मानवजातीचें तोंड बंद करणें जितकें अन्याय्य ठरेल तितकेंच मानवजातीनें त्या एकट्या मनुष्याचें तोंड बंद करणें चुकीचें ठरेल." कायदेमंडळानें बहुमतानें मान्य केलेल्या सर्व गोष्टी तें निवडणुकीनें प्रस्थापित झालेलें आहे म्हणून योग्य समजावयाच्या असतील, तर मग कायदेमंडळाची तरी काय गरज आहे? तर्कदृष्ट्या पाहिलें, तर निवडून दिलेलें कायदेमंडळ जर जनतेचें पुरेपूर प्रतिनिधित्व करूं शकतें—इतकें कीं सरकारविरोधी मतप्रतिपादनहि लोकशाहीविरोधी होतें—तर मग निवडून दिलेला एखादा माणूसहि—जर त्याला आंतल्या आवाजाची देणगी आणि ऋषितुल्य सामर्थ्य हीं असलीं—तर जनतेच्या आकांक्षांचें प्रति-

1. "If all mankind minus one were of one opinion and only one person were of contrary opinion, mankind would be no more justified in silencing that one person, than he, if he had the power, would be justified in silencing mankind"—Mill.—'On Liberty.'






निधित्व कां करूं शकणार नाहीं ? गेल्या निवडणुकांत पंडित नेहरूंना मत देतां न आल्यामुळें अनेक मतदारसंघांतील मतदार निराश होऊन परत गेले. यावरून हेंच सिद्ध होत नाहीं काय कीं, एखादी व्यक्तीहि सबंध राष्ट्राचें यशस्वी रीत्यां प्रतिनिधित्व करूं शकेल ? हिंदुस्थानांत अजून राजकीय शिक्षणानें मूळ धरलें नाहीं. क्रांतिकालांतील ज्या बेशिस्त वागणुकीनें आम्हीं आमच्या जुलमी राज्यकर्त्यांना हांकलून लावलें, ती बेशिस्त वागणूक एवढेंच आमचें सध्यांचें राजकीय भांडवल आहे. आणि म्हणून आज असा फार मोठा धोका आहे कीं, परदेशी वर्चस्वाची जागा देशी हुकुमशाही घेईल.

## लोकशाही हें साध्य कीं साधन ?

यावरून असा एक प्रश्न उपस्थित होतो कीं, लोकशाही हें साध्य आहे कीं, कांहीं विशिष्ट मूल्यांच्या प्राप्तीचें साधन आहे ? शुंपिटरनें असें आग्रहानें म्हटलें आहे कीं, लोकशाही हें एक निव्वळ साधन आहे आणि लोकशाहीच्या अगदीं कट्टर पुरस्कर्त्यांनेंहि कांहीं विशिष्ट मूल्यें लोकशाहीपेक्षांहि अधिक श्रेष्ठ मानलीं पाहिजेत.[2] लोकशाही म्हणजे कांहीं 'तिळा उघड' सारखा मंत्र नव्हे कीं, जो जपल्याबरोबर सर्व मूल्यें ऋद्धिसिद्धीसारखीं हात जोडून समोर उभीं राहावींत ! एखादें वंशाभिमानी लोकशाही राष्ट्र लोकशाहीचा आचार न सोडतां इतर वंशांच्या लोकांना मतदानाचा हक्क नाकारील किंवा त्यांना नागरिकत्व देणार नाहीं. एखादें धर्माधिष्ठित राष्ट्र इतर धर्मीयांना सावत्र मुलांप्रमाणें वागवील. किंवा शुंपिटर सांगतो त्याप्रमाणें एखादें काल्पनिक राष्ट्र आपण डोळ्यांसमोर उभें केलें, तर आपल्या असें लक्षांत येईल कीं, खिश्चनांची ससेहोलपट करणें, चेटकींना जिवंत जाळणें, ज्यू लोकांची कत्तल करणें इत्यादि गोष्टी तें राष्ट्र लोकशाहीची पद्धति न सोडतांहि करूं शकेल ! मग केवळ लोकशाही पद्धति कांटेकोरपणें पाळण्यांत आली आहे म्हणून आपण या गोष्टींना मान्यता देऊं काय ? अशा बाबतींत आपली भूमिका समाजवाद्यांसारखी आहे असें शुंपिटर म्हणतो. समाजवाद्यांच्या दृष्टीनें भांडवलशाही ही चेटकींना जाळण्याहूनहि किंवा वर्णभेदाहूनहि वाईट आहे. आणि म्हणून ती नष्ट करण्याकरितां ते लोकशाही-विरोधी मार्ग अवलंबिण्यासहि तयार असतात.

ही जी तुलना शुंपिटरनें केलेली आहे तिच्यावरूनच त्याच्या विचारसरणींतील गर्भित धोका लक्षांत येतो. लोकशाही म्हणजे लोकशाही पद्धति नव्हे तर कांहीं विशिष्ट मूल्यांची प्राप्ति असें म्हणणें म्हणजे हुकुमशाहीला मुक्तद्वार देण्यासारखेंच नाहीं काय ? प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजापासून पुढें जो जो हुकुमशहा झाला तो तो असेंच निक्षून सांगे कीं कोटि, सूर्याइतक्या तेजाळ अशा सत्य आणि न्याय या दिव्य तत्त्वांचा आपल्याला साक्षात्कार झाला आहे; आणि हीं मूल्यें जरूर तर बळाचा उपयोग करूनहि अस्तित्वांत आणणें हें आपलें कर्तव्य आहे ! याच दृष्टीनें रूसो, हेगेल आणि इतर चैतन्यवादी (Idealists) यांनीं असें म्हटलें आहे कीं, मानवांना जर त्यांचें हित, त्यांचें स्वातंत्र्य कशांत आहे तें कळत नसेल तर त्यांचें स्वातंत्र्य त्यांच्यावर लादलें पाहिजे ('must be forced to be free'). फॅसिस्ट राष्ट्रांचे जे नेते होऊन गेले त्यांचीहि अशी प्रामाणिक श्रद्धा होती कीं, आपण आपल्या देशबांधवांच्या वैभवासाठीं आणि सुखासाठीं झटत आहोंत. या विचारसरणींतून जी गोष्ट सूचित होते ती शुंपिटरनें मोकळेपणानें मान्य केली आहे. जनतेच्या न्यायासनासमोर येशू ख्रिस्ताला आणण्यांत आलें तेव्हां हुकुमशाहीचा प्रतिनिधि जो पायलेट तो स्वातंत्र्याच्या आणि सहिष्णुतेच्या बाजूनें उभा होता; तर त्या वेळची त्याच्यासमोरील जनता ही व्यक्तिस्वातंत्र्याच्या विरुद्ध, असहिष्णुतेच्या बाजूनें उभी होती. शेवटीं पायलेटला जनताजनार्दनापुढें-लोकशाहीपुढें माघार घ्यावी लागली ! ही गोष्ट खुद्द शुंपिटरनेंच नमूद केली आहे. (कित्ता. पृ. २४). प्रजाहितदक्ष हुकुमशहांना नेहमीं लोकांचें त्यांच्यापासूनच रक्षण करण्यासाठीं झटावें लागलें आहे आणि त्यांनीं ज्या सुधारणा घडवून आणल्या त्या अखेरीस लोकांच्या हिताच्याच ठरल्या आहेत.

---

2. Schumpeter—'Capitalism, Socialism and Democracy' p. 242.






तेव्हां हा एक मोठा पेंच किंवा शृंगापत्तिच आहे. लोकशाही हें जर साध्य मानलें, तर आपल्याला प्रिय असणारीं अशीं कांहीं मूल्यें नष्ट होतील अशी भीति निर्माण होते. याच्या उलट, लोकशाही हें कांहीं विशिष्ट मूल्यें प्राप्त करून घेण्याचें एक केवळ राजकीय साधन आहे असें मानलें, तर असा धोका निर्माण होतो कीं, आपण आपल्या अल्पबुद्धीनें जगाचीं मूल्यें ठरवून जगाचें नियमन करण्याचा मक्ता आपणांकडे घेण्याचें धाष्टर्य करूं!

## रशियामधील प्राचीन ग्रामसंघटना

परंतु सुज्ञ वाचक या ठिकाणीं असा प्रश्न विचारील कीं, लोकशाहीचे बाह्य आचार पाळून तिचें अंतरंगहि टिकविणें शक्य नाहीं काय? लोकशाहीवर एक पद्धति म्हणून सर्वस्वीं विश्वास ठेवून, त्या पद्धतीनेंच ज्या मूल्यांचें रक्षण व्हावें असें आपल्याला वाटतें त्यांचें रक्षण करणें शक्य नाहीं काय? आणि हाच खरोखरीं महत्त्वाचा मुद्दा आहे. कांहीं देशांमध्यें कांहीं कालखंडांत साध्य आणि साधनें यांचा इतका सुंदर मिलाफ झाला होता कीं, व्यक्तींचीं उच्चतम मूल्यें साध्य करणें लोकशाहीला शक्य झालें. ग्रीक लोकशाहीविषयींचें पेरिक्लिसचें स्मशानांतील भाषण इतकें सुप्रसिद्ध आहे कीं, तें येथें उद्धृत करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. परंतु रशियन 'मिर' चा (प्राचीन रशियांतील गांवांचा) कारभार कसा चालत असें याविषयीं कांहीं मनोरंजक व उद्बोधक माहिती देणारा उतारा खालीं देतों:

"मिरचे निर्णय सर्व सभासदांच्या एकमतानें घेतले जातात. जर सभेच्या वेळेस कांहीं लोक विरुद्ध मताचे असले तर सभा अपूर्ण आणि अयशस्वी मानण्यांत येते. बहुमतानें निर्णय घेणें शेतकऱ्यांना समजतच नाहीं. त्यांना एवढेंच समजतें कीं, प्रत्येक बाबतींत बरोबर निर्णय एकच असूं शकतो आणि सर्वांत शहाणा आणि प्रामाणिक मनुष्यच असा निर्णय घेतो. सत्य शोधून काढण्यासाठीं सर्व सभासदांनीं एकत्र यावयाचें अशी कल्पना असते आणि तें सत्य सांपडलें, तर त्याबरहुकूम सर्वांनीं वागलें पाहिजे. जर एखाद्या सभासदाचा सर्वानुमतें घेतलेल्या निर्णयाला विरोध असेल, तर त्याला एकच मार्ग उघडा राहतो. तो म्हणजे मिरपासून अलग होणें. याचा अर्थ असा कीं, तेव्हांपासून तो गांवचा रहिवाशी नाहीं...मिर हें एखाद्या लाटेप्रमाणें असतें. एकाचा विचार तोच सर्वांचा विचार. मिर हा जणुं कांहीं कुणी एक मोठा माणूस आहे!"[3]

ग्रीक लोकशाही किंवा रशिया आणि हिंदुस्थान येथील ग्रामसंघटना यशस्वी झाल्या याचें कारण हे समाज लहान लहान होते. या समाजांतील व्यक्तींमध्यें एक प्रकारचें साम्य होतें. त्यांची जीवनपद्धति, विचारसरणी, आशा-आकांक्षा समान होत्या. त्यांचे प्रश्न साधे व सोपे होते. समाज आणि राष्ट्र यांत कांहीं फरक नव्हता. त्याचप्रमाणें व्यक्तीच्या खाजगी आणि सार्वजनिक आयुष्यांतहि कांहीं फरक नव्हता. नागरिकत्व म्हणजे सार्वजनिक जीवनामध्यें व राष्ट्रजीवनामध्यें भाग घेणें असा अर्थ होता.

## भांडवलशाही चढाओढीचें घातकी स्वरूप

ग्रीसमधील हीं नगरराष्ट्रें नाहींशीं झाल्यावर कित्येक शतकें लोकशाहीची कल्पना मागें पडली, ती पुन्हां भांडवलशाहीबरोबर उदय पावली. आधुनिक लोकशाही हा भांडवलशाही समाजरचनेचा परिपाक आहे. भांडवलशाही ज्या वेळेस निर्माण झाली, त्या वेळेस ती एक क्रांतिकारी शक्ति होती व तिनें सरंजामशाहीच्या शृंखलांतून व्यक्तीची सुटका केली. त्या वेळेस भांडवलशाही हें एक गतिमान, अपारंपरिक आणि सर्व प्रकारच्या वर्चस्वाला विरोध करणारें तत्त्वज्ञान होतें. या तत्त्वज्ञानाच्या प्रगतीआड ज्या ज्या मध्ययुगीन संस्था अगर विचारसरणी आल्या त्या भांडवलशाहीच्या जोरदार प्रवाहांत लुप्त झाल्या. आणि हें सर्व स्वातंत्र्य, न्याय, समता, 'जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त हित' या तत्त्वांच्या नांवानें करण्यांत आलें. भांडवलशाहीनें असें एक 'मुक्तद्वार' (open frontier) निर्माण केलें कीं, तेथें जो महत्त्वाकांक्षेनें, उमेदीनें

---

3. N. P. Semenov (quoted in Mitrany 'Marx against the Peasant' p. 276)






आणि उत्साहानें उभा राहील त्याला, तो मिळवूं शकेल, त्यापेक्षां किती तरी मोठें भांडार खुलें दिसावें! व्यक्तींमध्यें परस्परांच्या हितसंबंधांविषयीं संघर्ष निर्माण होण्याचा प्रश्नच नव्हता. कारण प्रत्येकानें स्वतःकरितां जास्तींत जास्त शक्य असेल तितकी संपत्ति मिळविली असती, तरी देशांतील संपत्ति अपुरी पडली नसती. स्मिथ म्हणाला त्याप्रमाणें प्रत्येक जण आपापलें हित सांभाळीत होता आणि जणुं कांहीं कोणाचा तरी अदृश्य हात त्यांच्याकडून सार्वजनिक हिताची जपणूकहि करून घेत होता! आणि म्हणून १९ व्या शतकांत बऱ्याच काळापर्यंत अशी समजूत होती कीं, प्रत्येक व्यक्तीला एक एक मत दिलें कीं, चढाओढीच्या अर्थशास्त्राप्रमाणें चढाओढीचें राजकारणहि यशस्वी होईल.

अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांना चढाओढीचें आत्मघातकी स्वरूप कांहीं नवीन नाहीं. चढाओढींतून नेमकी विरुद्ध गोष्ट निर्माण होते आणि ती म्हणजे मक्तेदारी. पैशाकडे पैसा जातो आणि या पैशाच्या जोरावर सत्ता केंद्रित केली जाते. या सत्तेचा उपयोग पुन्हां संपत्ति मिळविण्याकडे किंवा आणखी सत्ता मिळविण्याकडे करतां येईल आणि याला कांहीं अंत नाहीं. 'ज्याच्याकडे आहे त्याला आणखी दिलें जाईल आणि ज्याच्याकडे नाहीं त्याच्याकडून जें कांहीं थोडें त्याच्याकडे आहे तेंहि घेतलें जाईल' असा नव्या भांडवलशाही बायबलाचा कायदा आहे! नाईट म्हणतो त्याप्रमाणें ज्या खेळांत जिंकलें असतां जिंकणाऱ्याची बाजूच अधिक बळकट होते तो खेळ फार काळ चालणार नाहीं! ( नाईट– 'एथिक्स ऑफ कॉंपिटिशन' पृ. २९८ ). लोकशाही ही साध्य आणि साधन या दोन्ही दृष्टींनीं आज अपेशी ठरली आहे.

### खासगी मालमत्तेच्या कल्पनेंत क्रान्ति

आणि लोकशाहीच्या या अपयशांतूनच आजच्या पिढीची समस्या निर्माण झाली आहे. आज आपल्याला लोकशाहीची अशा रीतीनें पुनर्घटना करावयाची आहे कीं, जीवनाच्या उच्चतम मूल्यांच्या प्राप्तीसाठीं आपण लोकशाहीला आपल्या कामीं जुंपूं शकूं. लोकशाहीचा कारभार यशस्वी व्हावा यासाठीं कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, त्याची यादी कोठच्याहि राजकारणावरील पाठ्यपुस्तकांत आढळेल. त्या यादीचा सारांश असा कीं, व्यक्तीचें नैतिक आणि आध्यात्मिक पुनरुज्जीवन घडवून आणणें आवश्यक आहे. राजकारणांतील ही जी 'मानवी' साधनसामग्री आहे ती उच्च दर्जाची पाहिजे असें शुंपिटर म्हणतो. परंतु मनुष्याला नैतिक बनवायचा कसा? याबाबत ज्या दोन विचारसरणी आहेत त्या दोहोंपासून आपण सावध राहिलें पाहिजे. पहिली विचारसरणी अशी कीं, मनुष्य स्वतः विचार करून, चिंतन-मननानें आत्मपरिवर्तन घडवून आणूं शकतो आणि हेंच खरें व्यक्तीचें परिवर्तन होय. कारण खरी क्रांति ही मानसिकच असते. ही विचारसरणी चैतन्यवाद्यां ( Idealists )ची आहे. परंतु हे चैतन्यवादी हें विसरतात कीं, विचार किंवा परिवर्तनाच्या कल्पना कांहीं आकाशांतून पडत नाहींत. एखाद्यादुसऱ्या व्यक्तीनें उत्स्फूर्तपणें जादूगाराप्रमाणें हवेंतून तत्त्वें काढावींत असें कधींच होत नाहीं. उलट मॅनहाइम म्हणतो त्याप्रमाणें प्रत्येक व्यक्तीला असें दिसून येतें कीं, एका विशिष्ट परिस्थितीला अनुरूप अशा विचारप्रणालीचा आपणांला वारसा मिळालेला आहे.[4] यांतूनच दुसऱ्या विचारसरणीचा म्हणजे भौतिकवादाचा उगम होतो. भौतिकवाद्यांचें म्हणणें असें कीं, मानव हें परिस्थितीचें 'अपत्य' आहे आणि म्हणून परिस्थिति बदलल्याखेरीज व्यक्तीला बदलणें शक्य नाहीं. परंतु परिस्थिति तरी व्यक्तींनीं केलेल्या कार्याखेरीज दुसऱ्या कशानें बदलणार? ज्याप्रमाणें मनुष्य स्वतःचे केस धरून स्वतःला उचलूं शकत नाहीं, त्याप्रमाणें परिस्थितीहि आपोआप बदलूं शकत नाहीं. खरी गोष्ट ही कीं, व्यक्ति आणि परिस्थिति ह्या परस्परावलंबी आहेत. त्यांच्यामधें क्रिया व प्रतिक्रिया सतत चालू असते. परिस्थिति आणि मानव यांमधील क्रियाप्रतिक्रियांचे

4. 'Every individual finds himself in an inherited situation with patterns of thought that are appropriate to the situation',



अनुक्रमणिका






प्रा. व. मं. सिरसीकर

# ब्रिटिश लोकशाहीचें स्वरूप

## पारतंत्र्याचा अभाव; सामाजिक एकात्मता

कोणत्याहि समाजाची राजकीय यंत्रणा ही तिच्या सामाजिक जीवनाचा ऐतिहासिक परिपाक असतो. ब्रिटिश लोकशाहीच्या बाबतींत तर हें विधान अक्षरशः खरें ठरतें. ब्रिटिश लोकशाहीविषयीं विचार करणें आजच्या घटकेस औचित्यपूर्ण आहे; कारण त्या राष्ट्रांतील राजकीय यंत्रणेची एक प्रकारें प्रतिमाच आपण आपल्या देशांत निर्माण केलेली आहे. ब्रिटिशांच्या सहवासामुळें लोकशाही राज्यपद्धतीबद्दल जी आस्था निर्माण झाली, त्यामुळें आपण लोकशाही राज्यपद्धतीचाच अवलंब करावयाचें ठरविलें आहे. या दृष्टीनें ब्रिटिश लोकशाहीच्या यशाला कोणत्या मूलभूत गोष्टी कारणीभूत आहेत याची छाननी करणें आवश्यक आहे. ब्रिटिश जनतेमुळें लोकशाही यशस्वी झाली कीं लोकशाहीमुळें ब्रिटिश जनता वैभवशाली झाली या प्रश्नाचाहि विचार करणें आवश्यक ठरतें. ब्रिटनचें समाजजीवन या दृष्टीनें अभ्यसनीय आहे. दुसऱ्या अनेक समाजांशीं तुलना केली म्हणजे ब्रिटिश समाजजीवनाचें वैशिष्ट्य तत्काळ ध्यानांत येतें. गेल्या अनेक शतकांत या भाग्यवान् समाजाला कधींहि दुःसह आणि दुर्गतीस पोहोंचविणाऱ्या पारतंत्र्याचा अनुभव आला नाहीं. या एकाच गोष्टीचा परिणाम सर्व राष्ट्रजीवनावर किती होतो, हें नव्यानें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. केवळ पारतंत्र्याचा अभाव हेंच ब्रिटिश समाजजीवनाचें वैशिष्ट्य आहे, असें मात्र नाहीं. राजकीय, आर्थिक किंवा धार्मिक मतभेद हे या भूमींत कधींच विकोपास गेलेले आढळून येत नाहींत. विकोपास गेलेल्या मतभेदांमुळें निर्माण होणारी भावनांची कटुता व प्रसंगीं समाजांत उत्पन्न होणारी दुही या दोन्ही गोष्टींचा ब्रिटनमध्यें अभाव आहे. ब्रिटनच्या शेजाऱ्याचेंच–फ्रान्सचें उदाहरण या सर्वच दृष्टींनीं उद्बोधक आहे. फ्रान्सशीं तुलना केली म्हणजे ब्रिटनमधील सामाजिक एकात्मतेचें रहस्य कळूं शकतें. याचा परिणाम म्हणूनच कीं काय, ब्रिटनच्या आधुनिक इतिहासांत, पहिल्या चार्ल्सचा केलेला वध हा एकमेव अपवाद वगळल्यास, राजकीय जीवनांत रक्तपात, आततायीपणा, प्रतिपक्षाविषयीं द्वेष इत्यादींचा मागमूसहि आढळत नाहीं.

ब्रिटिश लोकशाहीच्या यशाला ब्रिटनचें भौगोलिक स्थान व परिस्थिति यांनीं देखील हातभार लावला आहे. युरोपखंडापासून ब्रिटन वेगळें असल्यामुळें, त्याला युरोपांतील इतर देशांप्रमाणें राज्यक्रान्त्या, आक्रमणें व पारतंत्र्य या सर्वांपासून सुरक्षित राहण्याची संधि स्वतःच्या भौगोलिक परिस्थितीमुळें मिळाली. त्याचबरोबर या लहानशा बेटांतील जनता बाकीच्या राष्ट्रांतील लोकांपासून अलग असल्यामुळें, त्यांच्यांत आत्मीयतेची भावना अत्यन्त प्रकर्ष पावली. या आत्मीयतेच्या बळावर ब्रिटननें आतांपर्यंतच्या साऱ्या संकटांवर मात केलेली आहे. राजकीय, आर्थिक, धार्मिक अथवा तात्त्विक झंझावातांनीं ब्रिटनचें राजकीय जीवन कधींहि झांकळून गेल्याचें दृष्टिपथांत येत नाहीं. त्याचें एक कारण सर्वसाधारण ब्रिटिश नागरिक हा व्यवहारी आणि संयमी आढळून येतो हें होय. या मनोवृत्तीला वर वर्णन केलेल्या भौगोलिक परिस्थितीमुळें उत्पन्न होणारी सामाजिक एकात्मता याचीहि जोड मिळाली आहे.

## साम्राज्यवादाचा उपकार !

पण केवळ याच दोन कारणांचा विचार करून चालत नाहीं. ब्रिटिश लोकशाहीच्या यशाला ब्रिटनचा १८ व्या व १९ व्या शतकांतील साम्राज्यवाद उपकारक झाला आहे. हें विधान सकृद्दर्शनीं जरी असत्य वाटलें, तरी तें खरें आहे. कारण, सामान्य ब्रिटिश नागरिकाचा घटनात्मक पद्धतीच्या मार्गावर असलेला विश्वास अविचल राहण्याचें मुख्य कारण म्हणजे गेल्या दोन शतकांत ब्रिटनच्या सत्ताधारी वर्गानें वेळोवेळीं सामान्य जनतेला दिलेल्या सवलती आणि सुखसोयी हें होय. अर्थात् सत्ताधारी वर्गाचें हें साम्राज्यशाही








# ब्रिटिश लोकशाहीचें स्वरूप

पिळवणुकीवर आधारलेलें औदार्य ' हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ' या प्रकारचें होतें.

वरील ऐतिहासिक पार्श्वभूमीमुळें ब्रिटिश राजकीय जीवनांत अनेक बाबतींत मूलभूत ऐक्य आढळून येतें. या मूलभूत ऐक्यावरच ब्रिटिश लोकशाही आधारलेली आहे. समाजांत मूलभूत ऐक्य नसल्यास अनेक प्रश्नांबाबत आणि महत्त्वाच्या प्रसंगीं समाजांतील वर्ग आणि पक्ष परस्परांपासून दुरावण्याची नेहमींच भीति असते. या दृष्टीनें इंग्लंड भाग्यवान् आहे. त्यांतील मूलभूत ऐक्याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. उदाहरणार्थ, गेल्या दोन महायुद्धांत अनेक राजघराणीं देशोधडीस लागलीं व कित्येक सिंहासनें नष्ट झालीं. पण इंग्लंडचें राजपद मात्र अबाधित टिकून राहिलें आहे. १९३६ मध्यें मिसेस् सिम्पसन या घटस्फोटित स्त्रीशीं विवाह करण्याच्या प्रश्नावरून आठव्या एड्वर्डला राज्यत्याग करणें भाग पडलें. आठव्या एड्वर्डला वैवाहिक स्वातंत्र्य असावें कीं नसावें अशा प्रकारचा वाद त्या वेळीं उत्पन्न झाला होता. पण ब्रिटनच्या राजाचा विवाह हा वैयक्तिक निर्णयाचा प्रश्न नसून त्याला राष्ट्रीय महत्त्व आहे आणि त्या बाबतींत सिंहासनाधिष्ठित व्यक्तीच्या इच्छेपेक्षां ब्रिटिश जनतेच्या राजपदाविषयीं सन्मान आणि सभ्यता यांच्या कल्पना लक्षांत घेणें त्या वेळच्या ब्रिटिश मुख्य प्रधानाला आवश्यक वाटलें. बॉल्डविननें घेतलेला राज्यत्यागाचा निर्णय लोकसभेनें मान्य करण्याचें देखील हेंच कारण होतें. या सर्व प्रकरणांत दिसून आलेली ब्रिटिश जनतेची मनोवृत्ति लक्षांत घेण्याजोगी आहे. राजपदच नष्ट करावें असा पर्याय कोणाहि पक्षानें सुचविला नाहीं; कारण ब्रिटिश राजपद हें तेथील लोकशाहीचा एक अविभाज्य घटक बनलें आहे. सर्व जनतेच्या राष्ट्रनिष्ठेचें दृश्य प्रतीक, राज्यकारभाराचे सर्वश्रेष्ठ प्रमुख व ब्रिटिश राष्ट्रकुटुंबांतील भिन्न राष्ट्रांना जोडणारा एक दुवा या अनेक नात्यांनीं ब्रिटिश राजपद उपयोगी ठरलें आहे.

## विचार–उच्चार–स्वातंत्र्य

लोकशाही तत्त्वज्ञानाचा, मतभेद आणि त्याचा उच्चार, या दोन्हींवर विश्वास असतो. पण प्रत्यक्षांत मात्र लोकशाही राष्ट्रें मतभेदाला आणि विरोधकांना कितपत वाव देतात हें सांगणें अवघड आहे. दुसऱ्यांच्या मताविषयीं स्वमताइतकाच आदर बाळगणें, विरोधकांच्या प्रामाणिकपणाबद्दल यत्किंचित्‌हि शंका नसणें इत्यादि बाबतींत ब्रिटनचें उदाहरण उल्लेखनीय आहे. युद्धकाळांत फॅसिस्ट पुढारी सर ओस्वाल्ड मोस्ले याला स्थानबद्ध करण्यांत आलें होतें. युरोपीय युद्ध संपतांच तिसऱ्या दिवशीं त्याची सुटका करण्यांत आली. इतकेंच नव्हे, तर त्याला आपल्या विचारस्वातंत्र्याचा आणि प्रचारस्वातंत्र्याचा अधिकार देखील पूर्णपणें उपभोगावयास मिळाला ! मोस्लेच्या प्रचारसभांना जनतेचा विरोध होऊं लागतांच तत्कालीन मजूर-सरकारनें मोस्लेला पोलिसांचें संरक्षण दिलें. विरोधकांच्या राजकीय दृष्टिकोनाचा विचार न करतां, त्यांना आपले विचार प्रगट करण्याचा हक्क आहे आणि तो हक्क त्यांना मिळावा म्हणून ब्रिटिश लोकशाही नेहमीं प्रयत्नशील असते. या एकाच उदाहरणावरून विचारस्वातंत्र्य किंवा प्रचारस्वातंत्र्य हें केवळ लोकशाही राज्यपद्धतीवरच अवलंबून नसून लोकांच्या मनोवृत्तीवरहि अवलंबून असतें, हें कळून येईल.

१९४५ सालीं झालेल्या युद्धोत्तर काळांतील पहिल्या निवडणुकी या देखील ब्रिटिश लोकशाहीच्या स्वरूपावर चांगलाच प्रकाश टाकतात. ब्रिटिश जनता ही विभूतिपूजक नसून तत्त्वपूजक आहे, असेंच वरील निवडणुकींनीं पुनः एकदां सिद्ध केलें. रणझुंझार चर्चिलचें युद्धकाळांत सर्वमान्य ठरलेलें प्रभावी नेतृत्व झुगारून देऊन, ब्रिटिश जनतेनें शांततेच्या काळांत शांत आणि सौम्यप्रकृति ॲट्लीची निवड केली. इंग्रज इतिहासकार प्रा. सॉमरवेल यांनीं म्हटल्याप्रमाणें ही निवडणूक म्हणजे प्रभावी नेतृत्व आणि निश्चित कार्यक्रम असलेला पक्ष यांच्यांतील लढा होता. व्यवहारी ब्रिटिश नागरिकांना नेतृत्वाचें आकर्षण वाटलें नाहीं; युद्धोत्तर पुनर्रचनेसाठीं निश्चित कार्यक्रम आणि धोरण असलेला पक्षच आवश्यक आहे, असें त्यांनीं आपल्या निवडीनें सिद्ध केलें.

## अलिखित घटनेचा विशेष

ब्रिटिश लोकशाहीचें वैशिष्ट्य म्हणून तिच्या







अलिखित घटनेचा उल्लेख करण्यांत येतो. अलिखित घटना याचा शब्दशः अर्थ करणें चूक ठरेल. ज्याप्रमाणें इतर देशांत स्वातंत्र्यप्राप्तीनंतर, राज्यप्राप्तीनंतर अथवा यादवीनंतर मुद्दाम प्रयत्नपूर्वक लिखित घटना तयार करण्याची जरूरी निर्माण झाली, तशी आवश्यकता ब्रिटनला भासली नाहीं. कारण ऐतिहासिक विकासांत ज्या गोष्टींचा अडथळा विशिष्ट काळीं झाला तेवढ्यांपुरताच विचार करून तो दूर करण्याचें ब्रिटिशांचें धोरण होतें. याच्या मुळाशीं अर्थातच असलेल्या परिस्थितींत फारसा बदल शक्यतों न घडवतां आपली परंपरा कायम ठेवण्याची लोकांची धडपड कारणीभूत होती. ब्रिटनचें परंपरेला चिकटून राहणें हें इतिहासप्रसिद्ध आहे. या प्रवृत्तीवर प्रगतिविरोधी म्हणून टीका करण्यांत आली, तरी तिचें राष्ट्रीय जीवनांतील स्थान कमी होत नाहीं. राजकीय जीवनाला स्थिरता प्राप्त होण्यासाठीं, आततायी मार्गाऐवजीं सनदशीर मार्गानें जाण्याची प्रवृत्ति दृढ होण्यासाठीं देखील याच प्रवृत्तीचा उपयोग झालेला आहे. या मूलभूत प्रवृत्तीमुळें ब्रिटिश जनतेला लिखित घटना करण्याची निकड कधींच वाटली नाहीं. शब्दाचे अर्थ बदलले, सत्तेचें हस्तान्तर झालें, राज्यप्रकार बदलला, तरी देखील इंग्लंडची घटना या सर्वांना सामावून घेऊं शकली. या अलिखित घटनेविषयीं लिहितांना प्रा. डायसी यांनीं तिचीं दोन वैशिष्टयें सांगितलीं आहेत : विधिमंडळाचें सार्वभौमत्व व विधिनियमांची अधिसत्ता.

जगांतील घटनात्मक राष्ट्रांचे साधारणतः दोन विभाग पाडतां येतील. पहिल्या विभागांत ब्रिटन, फ्रान्स, हिंदुस्थान इत्यादि राष्ट्रें अंतर्भूत होतात. या सर्व राष्ट्रांत विधिमंडळ सार्वभौम असतें. दुसऱ्या विभागांत घटना सार्वभौम मानल्या जातात. विधिमंडळाच्या सार्वभौमत्वामुळें राज्यव्यवस्थेचें स्वरूप हें विशिष्ट प्रकारचें होतें. उदाहरणार्थ, ब्रिटनमध्यें मॉंटेस्क्यूनें वर्णिलेलें 'सत्ताविभागणीचें तत्त्व' आढळून येत नाहीं. एक प्रकारें सर्व सत्तेचें केंद्रीकरण विधिमंडळाच्या ठिकाणीं झालेलें आढळून येतें. विधिमंडळ विधिनियम तयार करतें, कार्यकारी मंडळा-( Executive )ला जन्म देतें आणि सर्वश्रेष्ठ न्यायदानाचें कार्य देखील करतें. कार्यकारी मंडळ आपलीं सर्व धोरणें आणि कृत्यें यांबद्दल विधिमंडळाला जबाबदार असतें. विधिमंडळानें ठरविल्यानंतर त्या बाबतींत कोणालाहि बदल करतां येत नाहीं. इतकेंच नव्हे तर, गतकाळालाहि लागू होणारे गतकालपरिणामी विधिनियम करण्याचाहि अधिकार विधिमंडळाला असतो. या अधिकारामुळें भूतकाळांत कायदेशीर असलेलें कृत्य नंतर निर्माण झालेल्या विधिनियमांमुळें बेकायदेशीर ठरूं शकतें किंवा बेकायदेशीर ठरलेलें कृत्य कायदेशीर ठरूं शकतें. अलिखित घटनेचा दुसरा विशेष म्हणजे विधिनियमांची अधिसत्ता हा होय. प्रा. डायसी यांच्या मतें याचा अर्थ ब्रिटनमधील सर्व नागरिक विधिनियमांच्या दृष्टीनें समान मानले जातात हा होय. नागरिकांत भेद करण्यांत येत नाहीं. तसेंच कोणाहि नागरिकाला सर्वसाधारण न्यायालयासमोर सर्वसामान्य विधिनियमानुसारच आणतां येतें. ब्रिटिश मुख्यप्रधानापासून तों थेट रस्त्यांत उभे राहणाऱ्या पोलिस-शिपायापर्यंत, सर्व सरकारी नोकर आणि सामान्य नागरिक यांच्यांमध्यें न्यायालयांत भेदभाव करण्यांत येत नाहीं. सर्वांसाठीं एकच विधिनियम अस्तित्वांत आहे. ब्रिटिशांची राज्यघटना अलिखित असल्यामुळें तिच्यांत स्वभावतःच घटनात्मक संकेतांना विधिनियमांइतकेंच स्थान आहे. त्याशिवाय ब्रिटिशांची परंपरेवरील निष्ठा देखील या संकेतांना पोषक ठरली आहे. अर्थात् सर्वच घटनात्मक संकेत सतत अस्तित्वांत राहतात असेंहि नाहीं. कांहीं संकेत बदलत्या परिस्थितीनुसार कालौघांत नष्ट होतात. ब्रिटिश राज्यघटनेंतील घटनात्मक संकेतांचें प्राबल्य किंवा महत्त्व एका उदाहरणावरून स्पष्ट होईल : ब्रिटनचें मुख्यप्रधानपद हें १९३७ पर्यंत संकेतांवरच आधारलेलें होतें; त्या पदाला कायदेशीर असें स्थान नव्हतें.

### द्विपक्ष-पद्धति

ब्रिटिश लोकशाहीची वरील पार्श्वभूमि लक्षांत घेतल्यानन्तर तिची कार्यपद्धति सुलभपणें लक्षांत येतें. ब्रिटनमध्यें आजवर द्विपक्ष कार्यपद्धति यशस्वी ठरली आहे. १८ व्या व १९ व्या शतकांत हुजूर व

उदार पक्षांनीं ब्रिटनच्या राज्यकारभाराची धुरा वाहिली. पण पहिल्या महायुद्धानन्तर ब्रिटनची द्विपक्ष पद्धति नाहींशी होऊन तेथें अनेकपक्षीय लोकशाही निर्माण होते कीं काय, अशी भीति वाटत होती. पण ब्रिटिश उदार-पक्षाचें गेल्या २५ वर्षांत राजकीय जीवनांतून झालेलें उच्चाटन पाहिलें म्हणजे ही भीति निराधार वाटते. मजूर-पक्षाच्या उदयामुळें उदार-पक्षांतील तरुणवर्ग मजूर पक्षाकडे आकर्षिला गेला. ब्रिटिश लोकशाहीच्या यशांत या द्विपक्ष पद्धतीचा वांटा फार मोठा आहे. कारण, या पद्धतीमुळेंच निवडून येणारीं मंत्रिमंडळें हीं एक-पक्षाच्या भरपूर पाठिंब्यावर अधिकारारूढ झालेलीं असतात. त्यामुळें फ्रान्समधील मिश्र मंत्रिमंडळां-सारखीं तीं अल्पायुषी नसतात. त्यांचें धोरण खंबीर व निश्चित स्वरूपाचें असतें. अनिश्चितता आणि गोंधळ यांना वाव राहत नाहीं. त्याचबरोबर या पद्धतींत दोनच पक्ष असल्यामुळें विरोधी पक्षाचें स्थान हें महत्त्वाचें मानलें जातें. कारण विरोधी पक्षच भावी अधिकारारूढ होणारा पक्ष असूं शकतो. ब्रिटनमध्यें विरोधी राजकीय मताविषयीं जी सहिष्णुता दाखविण्यांत येते, त्याचाहि परिणाम विरोधी पक्षाला इतर राष्ट्रांतील विरोधी पक्षापेक्षां अधिक आदराचें स्थान मिळवून देण्यांत झाला आहे. एका दृष्टीनें तर असें म्हणतां येईल कीं, ब्रिटनमधील विरोधी पक्ष हा सरकारचे सर्व महत्त्वाचे निर्णय घेण्यांत—विशेषतः परराष्ट्रीय धोरण ठरविण्यांत सहभागी असतो. आपल्या दृष्टीनें, याविषयींचें उद्बोधक उदाहरण म्हणजे कट्टर साम्राज्यवादी चर्चिलनें मजूर सरकारच्या हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याच्या धोरणाला दिलेला पाठिंबा हें होय. ब्रिटनमधील द्विपक्ष हे अंतर्गत राजकारणांत कितीहि परस्परविरोधी असले, तरी महत्त्वाच्या परराष्ट्रीय धोरणाच्या प्रसंगीं त्यांची एकजूट होऊं शकते.

### सनदी नोकरवर्गाचें महत्त्व

ब्रिटिश लोकशाहीच्या कार्यपद्धतींतील दुसरा उल्लेखनीय विशेष म्हणजे ब्रिटिश सनदी नोकर-वर्ग. लोकशाही कार्यपद्धतींत पक्षाच्या राजकीय चढउताराप्रमाणें सत्तेचीं सूत्रें निरनिराळ्या पक्षांकडे जाणें अपरिहार्य असतें. अशा परिस्थितींत राष्ट्राचा दैनंदिन राज्यकारभार ज्याच्या हातीं असतो, त्या कायम स्वरूपाच्या नोकरवर्गाला दोन कारणांमुळें फार महत्त्व येतें. एक तर सनदी नोकरवर्गाचें स्थान कायम असतें. मंत्री बदलत असतात पण सनदी नोकर तेच रहातात. दुसरें कारण म्हणजे लोकांचे प्रतिनिधी म्हणून आलेले मंत्री अननुभवी, नवशिके असतात; तर सनदी नोकर अनुभवी आणि त्या विषयांतील तज्ज्ञ म्हणून आलेले असतात. त्यामुळें साहजिकच सनदी नोकरांच्या हार्दिक सहकार्याशिवाय कोण-त्याहि पक्षाला राज्यकारभार करणें शक्य नसतें. ब्रिटनच्या सनदी नोकरवर्गानें आपल्या वर्तनानें याविषयींचा एक आदर्श निर्माण केला आहे. अधिकारारूढ पक्षाच्या राजकीय तत्त्वज्ञानाकडे दृष्टि न देतां अस्तित्वांत असलेल्या सरकारचें बिनतक्रार आणि बिनचूक आज्ञापालन करणें याकडेच सनदी नोकरवर्गानें सर्व लक्ष केन्द्रित केलेलें आढळतें. नोकरवर्गाच्या या सहकार्यामुळें कोणत्याहि पक्षाला आपला कार्यक्रम अंमलांत आणण्याची खात्री वाटते. सनदी नोकरवर्गानें अधिकारारूढ पक्षाशीं सहकार्य न केलें, तर त्याचा परिणाम लोकशाही विकलांग होण्यांत कसा होतो, याचें चांगलें उदा-हरण १९१९ नंतर स्थापन झालेल्या जर्मनींतील 'वायमार' लोकशाहीनें जगाच्या निदर्शनास आणलें आहे ! ब्रिटिश लोकशाही कार्यक्षम आणि यशस्वी ठरण्यांत सनदी नोकरांचा केवढा मोठा वांटा आहे हें यावरून लक्षांत येईल.

### मुख्य प्रधानाचें असाधारण स्थान

सनदी नोकरवर्ग, राजकीय पक्ष, विधिमंडळ आणि सामान्य जनता यांना सांधणारा दुवा म्हणजे ब्रिटिश मुख्य प्रधान हा होय. या स्थानाचें महत्त्व आणि स्वरूप हें देखील ऐतिहासिक रीत्या उत्क्रान्त झालेलें आहे. राजा-विरुद्ध-प्रजा या संघर्षांत मुख्य-प्रधानाचा नेहमींच राजाशीं संबंध येई. त्या वेळीं त्याला मंत्रिमंडळांतील मतभेदांवर पांघरूण घालून राजासमोर एकजुटीचें चित्र उभें करावें लागे. याच पद्धतींतून कालान्तरानें मुख्यप्रधानाचें मंत्रिमंडळां-तील एकमेवाद्वितीय असें स्थान निर्माण झालें. अर्थात् हें स्थान निर्माण होण्यांत डिस्रायली ग्लॅड्स्टन, लॉईड जॉर्ज, चर्चिल यांसारख्या प्रभावी

व्यक्तित्व असलेल्या मुख्य प्रधानांचा हातभार लागलेला आहे. त्याबरोबरच मंत्रिमंडळाच्या सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वाचाहि विकास झाला. सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व आतां इतकें सर्वमान्य झालेलें आहे कीं, भारतीय राज्यघटनेंत त्या तत्त्वाला घटनात्मक स्थान देण्यांत आलें आहे. अलीकडील काळांत मात्र सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व मागें पडत चाललें असून, मुख्य प्रधानाच्या आज्ञेनुसार वर्तन करणें एवढेंच कर्तव्य इतर मंत्र्यांचें आहे, असें समजलें जाऊं लागलें आहे. उदाहरणार्थ, इंग्लंडच्या १९४५ च्या मजूर मंत्रिमंडळांतील एक प्रमुख मंत्री श्री. शिनवेल यांनीं याविषयीं स्पष्ट कबुली दिली होती कीं, 'मी ॲटलींच्या आदेशानुसार प्रत्येक कार्य करीत असतों.' या उदाहरणावरून सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व मागें पडण्याचीं कारणें—मुख्य प्रधानाचें व्यक्तित्व, राजकीय पक्षांची कडक शिस्त आणि राज्यकारभारांतील वाढतें विकेंद्रीकरण—हीं आहेत हें स्पष्ट होईल.

ब्रिटिश लोकशाहीच्या यशाचें मूल्यमापन करतांना वर उल्लेखिलेल्या ऐतिहासिक पार्श्वभूमीचा, कार्यपद्धतीचा विचार करणें जसें आवश्यक आहे, तसेंच तेथील जनतेच्या राजकीय जागृतीचा व लोकशाहीवरील निष्ठेचा विचार करणें इष्ट आहे. सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं ब्रिटनमध्यें होणारें मतदान या दोन्ही गोष्टींची चांगली साक्ष देतें. अलीकडील निवडणुकींत झालेलें शें. ८४ मतदान जनतेच्या राजकीय जागृतीचें निदर्शक आहे. सामान्य मतदार रात्रपाळीवरून थकून भागून परत आल्यानंतर मतदानाचा अधिकार बजावण्यासाठीं मतदारांच्या रांगेत तासन् तास तिष्ठत उभा राहतो, पण मतदान केल्याशिवाय घरीं जात नाहीं. ही सामान्य मतदाराची आस्थाच ब्रिटिश लोकशाहीचा मूलाधार आहे.

---

## लोकशाहीची जोपासना [ ५३ पानावरून चालू ]

अधिकारी पक्षाप्रमाणेंच विरोधी पक्षावरहि देशांतील लोकशाहीच्या जोपासनेची जबाबदारी असते. परंतु अनेक कारणांमुळें हे पक्ष अद्याप तितकेसे सुसंघटित किंवा जोरदार नाहींत. त्यामुळें परिणामकारक असें कांहींच कार्य त्यांजकडून होत नाहीं. लोकशाहीच्या स्थापनेस किंवा रक्षणास त्यांचा आज प्रत्यक्षतः फारसा उपयोग होत नाहीं. वर उल्लेखिलेल्या दोषांशिवाय व एका अर्थी त्यांचें मुख्य कारण म्हणून असें म्हणतां येईल कीं, भारतीय लोकशाहीचें आध्यात्मिक उद्दिष्ट व पाया कॉंग्रेसच्या नेत्यांस नीट समजत नाहीं किंवा पटत नाहीं. गांधीजींनीं आपल्या जीवनानें दिलेला साधी राहणी (simplicity) व अहिंसा ( non-violence ) यांचा संदेश ध्यानांत घेऊन भारतीय लोकशाहीचें आर्थिक, सामाजिक व आंतरराष्ट्रीय जीवन आंखलें गेलें तरच खरी शांतता व समृद्धि होईल व खरी लोकशाही येथें नांदेल. 'गांधीवादाचें विसर्जन करा' ('Dissolve Gandhism') या मथळ्याचें नुकतेंच 'हरिजन'च्या अंकांत संपादकीय प्रसिद्ध झालें आहे, त्याचें योग्य मनन करून गांधींच्या इच्छेनुरूप ( त्यांच्या जीवनाच्या खऱ्या ध्येयाकरितां ) राज्य केल्यास या देशाचें खरें कल्याण होईल व सर्वोच्च लोकशाही स्थापन होण्यास मदत होईल.

हिंदुस्थानला आज झेंपेल व इष्ट होईल अशा राज्यव्यवस्थेचें वर्णन करावयाचें म्हटलें, तर त्यांत पहिली गोष्ट—खेड्यांची शक्य तितकी स्वयंपूर्णता प्रस्थापित करणें—ही होय. देशाच्या आर्थिक जीवनाच्या योजनेंत अमेरिकेचें ध्येय न ठेवतां चीन-जपानचें ठेवणें अवश्य आहे. आमच्या राहणीचा दर्जा वाढविणें या उद्दिष्टापेक्षां राहणी व मिळकत यांचें समप्रमाण राहील असे प्रयत्न व्हावेत. या देशास अयोग्य अशी राहणी व सुखसोयी औद्योगीकरणाच्या खोट्या कल्पनेनें भारून जाऊन, येथें आणूं नये.

---

श्री. शंकरराव देव

# लोकशाही आणि सर्वोदय

भारताच्या व जगाच्या वर्तमान व भूतकालीन परिस्थितीचा सांगोपांग व दूरवर विचार करून या देशांत लोकशाही राज्यपद्धति व संस्कृति यांची स्थापना करावयाची अशी आम्हीं पवित्र प्रतिज्ञा केली आहे. या पवित्र प्रतिज्ञेची प्रेरणा आम्हांला पाश्चात्त्य व मुख्यतः आंग्ल सामाजिक व राजकीय विचार-आचारांपासून मिळाली आहे, याबद्दल दुमत होण्याचा संभव नाहीं.

आमच्या इकडे वज्जी, मल्ल इत्यादिकांचीं गण-सत्ताक राज्यें बुद्धाच्या वेळीं अस्तित्वांत होतीं (-स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेंत प्रजासत्ताक 'गणराज्य' असा शब्द योजिलेला आहे–) हें जरी खरें असलें, तरी ज्या अर्वाचीन लोकशाहीच्या संसाराचा मांड आम्ही मांडीत आहोंत तिचें माहेर पाश्चात्त्य जग असून तिचें उगमस्थान शोधावयाचेंच म्हटलें, तर तें प्राचीन ग्रीक नगरराज्यांतच सांपडेल. हीं प्राचीन ग्रीक राज्यें एक शहर व त्याच्या आजूबाजूचा थोडा प्रदेश यांचीं बनलेलीं असल्यामुळें तीं लहान होतीं व नागरिकांनीं स्वतः आपला कारभार पाहणें ही कल्पना त्यांत अभिप्रेत होती. पण अर्वाचीन लोकशाहीचा जन्म मोठमोठ्या देशांत झालेला असून प्रातिनिधिक पद्धतीला बरोबर घेऊनच ती जवळ-जवळ जन्माला आली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. मात्र यामुळें 'जनतेचें स्वामित्व पण प्रतिनिधींचें प्रभुत्व' अशी अर्वाचीन लोकशाहीची व्याख्या करणें अपरिहार्य होऊं पाहत आहे.

## लोकशाहीची मूळ प्रेरणा ही नैतिक

आधुनिक युरोपांतील लोकशाहीचा उदय व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतूनच झालेला आहे. धार्मिक, सामाजिक वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत व्यक्तीला विचारांचें व आचारांचें जसें संपूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे, तसेंच प्रत्येक व्यक्तीला आपल्या गुणांचा पूर्ण उत्कर्ष करून घेण्यास समान व योग्य संधि आणि साधनसामग्री मिळाली पाहिजे, हे स्वातंत्र्याचें व समतेचे दोन सिद्धान्त या व्यक्तिवादाच्या बुडाशीं आहेत. लोकशाहीचीं हीं दोन फुप्फुसें आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्व माणसें सारखीं आहेत आणि एखादें मत सत्य असेल आणि तें सत्य असल्याचा पुरावा माणसापुढें मांडला, तर त्याची बुद्धि निःपक्षपातीपणें त्या मताचा विचार करून आज ना उद्यां त्याचा स्वीकार करील,–हीं तत्त्वें येथें गृहीत धरलेलीं आहेत. पण समता आणि विवेकबुद्धि या ज्या दोन गोष्टी येथें गृहीत धरल्या आहेत, त्या जगाच्या व्यवहारांत सिद्ध झालेल्या नाहींत. त्या अजून साध्य करावयाच्या आहेत, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. एकाच मातापित्यांचीं दोन अपत्यें घेतलीं तरीसुद्धां तीं सारखीं नसतात. मग दूरच्या दोन माणसांचा प्रश्न कशाला ? माणसांचीं शरीर, मन, बुद्धि वगैरे अंगें व त्यांचे गुण घेतले व त्यांची परीक्षा केली, तर त्यांच्यांत हमखास विषमता आढळून येते. तसेंच माणसांची बुद्धि नेहमीं सत्य चटकन् ग्रहण करतेच असाहि अनुभव नाहीं. जगांत सुवर्णानें सत्याला झांकलेलें आहे ('हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्'). सामान्य माणसाचीच काय, पण तथाकथित श्रेष्ठींची बुद्धिसुद्धां स्वार्थानें व लोभानें लडबडलेली असते. स्वार्थालाच परार्थ समजणें हा सामान्य बुद्धीचा जणुं स्वभावच दिसतो ! म्हणून समता व धर्म-अधर्म, कार्य-अकार्य यांच्यांत विवेक करणारी बुद्धि हीं ज्या लोकशाहीचीं साधनें आहेत व साध्येंहि आहेत त्या लोकशाहीची मूळ प्रेरणा खरी नैतिक आहे हें विसरतां कामा नये. संपूर्ण लोकशाहीच्या प्रस्थापने-साठीं लोकांमध्यें 'सर्वांच्या ठिकाणीं स्वतःला पाहणें' ही वृत्ति व सत्यान्वेषिणी व सत्यनिष्ठ बुद्धि असणें जरूर आहे.

ज्या जीवनामुळें लोकांमध्यें ही समता वृत्ति व विवेकबुद्धि जागृत होऊन पोसली जाईल तें जीवनच खऱ्या अर्थानें लोकशाही जीवन म्हणतां येईल. पण ज्या युरोपीय राज्यनीतिशास्त्रज्ञांनीं व कार्यधुरंधर मुत्सद्द्यांनीं अर्वाचीन लोकशाहीचें पालन-

पोषण केलें त्यांचें लोकशाहीच्या या मूलगामी नैतिक अंगाकडे जावें तसें लक्ष गेलेलें नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें.

### ' शहाण्या स्वार्था 'चें लोकशाहीला ग्रहण

अर्वाचीन लोकशाहीच्या जन्मस्थानीं जे दोन ग्रह होते, त्यापैकीं धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा एक पुण्यग्रह होता; तर दुसरा आर्थिक क्षेत्रांतील स्वातंत्र्य व समता यांच्यावर आधारलेला व्यक्तिवाद हा पापग्रह होता ! आर्थिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाचें ध्येय वैयक्तिक सांपत्तिक भरभराट हें बनलें. या व्यक्तिवादांतूनच समाजाच्या आर्थिक व्यवहारावर वित्तरक्षण आणि करारांचें पालन यांखेरीज कोणतींहि राजकीय बंधनें नसावींत हें अनियंत्रणाचें तत्त्व पुढें आलें आणि प्रत्येकानें आपापलें सुख संपादन करण्याचा प्रयत्न करीत राहिलें म्हणजे व्यक्ती-व्यक्तींमध्यें जी अनिर्बंध स्पर्धा निर्माण होते तीमुळें एकंदर समाजाचें हित किंवा ' अधिकांत अधिकांचें अधिकांत अधिक सुख ' आपोआप साध्य होतें, हें घातक तत्त्व प्रसार पावूं लागलें. याचा परिणाम असा झाला कीं, या व्यक्तिवादास सुखवादाचें व त्यावर आधारलेल्या लोकशाहीला भांडवलशाहीचें स्वरूप प्राप्त झालें. सुखवादाचा परिणाम लोकशाही राष्ट्रांतील लोक स्वार्थपरायण व सुखलोलुप बनण्यांत झाला आणि भांडवलशाहीचा परिणाम साम्राज्यशाहीची तृष्णा वाढण्यांत झाला. जेथें स्वार्थपरायणतेनें व सुखलोलुपतेनें बाजारपेठा काबीज केल्या तेथें नीतीची देवघेव कोण व कशी करणार ? तेथें भरभराट झाली तरी ती ' शहाण्या स्वार्था 'चीच होणार ! आज युरोपीय व अमेरिकन लोकशाही राष्ट्रांची नीति अथवा धर्म हा ' शहाणा स्वार्थ 'च बनला आहे. शहाण्या स्वार्थाच्या नांवाखालीं अधर्मच धर्माच्या बुरख्याखालीं उजळ माथ्यानें वावरूं लागला आहे व त्यामुळें लोकशाहीला ग्लानि आणि क्षीणता आली आहे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील बुद्धिप्रधान व्यक्तिवादाचा वैयक्तिक स्वार्थ आणि लोभ यांच्याशीं कांहीं संबंध नसून आत्मशुद्धि व सत्यशोधन हें त्यांचें साध्य आहे. परंतु राहूनें जसें चंद्राला त्याप्रमाणें या दोन व्यक्तिवादांना आर्थिक क्षेत्रांतील तिसऱ्या व्यक्तिवादानें ग्रासून टाकलें आहे. स्पर्धा व सुख यांवर आधारलेल्या तिसऱ्या प्रकारच्या व्यक्तिवादाच्या विषारी वायूनें लोकशाहीचीं स्वतंत्रता व समता हीं जीं दोन फुप्फुसें तीं क्षीण करून टाकलीं आहेत. आज याचा परिणाम असा झाला आहे कीं, लोकशाही मृत्युशय्येवर पडलेली असून तिचा विनाशकाल जवळ येऊं लागला आहे.

### यंत्रप्रधान युगांतील केन्द्रीकरण

लोकशाहीला आणखीहि एक गोष्ट विघातक ठरली आहे, तिचाहि विचार करणें अवश्य आहे. अर्वाचीन लोकशाहीला ज्या भांडवलशाहीचें स्वरूप प्राप्त झालें आहे, त्या भांडवलशाहीचें यंत्रप्रधान प्रचंड उद्योगधंदे हें अन्न आहे. या भांडवलशाहीनें आपल्या वाढीबरोबर सत्तेचें अधिकाधिक केंद्रीकरण केलें आहे व पक्षनिष्ठ राजकारणाला जन्म देऊन सत्तादानाच्या वा सत्तासंक्रमणाच्या राजकीय युगाला प्रारंभ केला आहे. पण पक्षनिष्ठ व सत्तासंक्रमणाच्या राजकारणाचा परिणाम आधुनिक लोकशाहीला अभावात्मक बनविण्यांत झाला आहे. भांडवलशाहीप्रधान लोकशाहींत खऱ्या लोकसत्तेचा अभावच दिसून येतो. या लोकशाहींत सामान्य नागरिकांचा आत्मविश्वास व स्वावलंबन वाढण्याऐवजीं त्यांची असहायता व परावलंबनच वाढत आहेत. तसेंच, लोकशाही पक्षनिष्ठ बनल्यामुळें सर्वांचें सुख अथवा हित हें तिचें ध्येय न राहतां बहुसंख्याकांचें किंवा अधिकांत अधिकांचें हित अगर सुख हें तिचें ध्येय बनलें आहे. तसेंच सध्यांच्या पक्षनिष्ठ लोकशाहींत व्यक्तीला स्वतःच्या विवेकबुद्धीप्रमाणें वागण्याला क्वचितच वाव राहिला आहे. पक्षनिष्ठेनें व्यक्ति इतकी भारली गेली आहे कीं, तिच्या जीवनांत विवेकाची जागा पक्षशिस्त व आज्ञापालन यांनीं घेतली आहे. या शिस्तीमुळें व्यक्तीच्या जीवनांत सत्यनिष्ठेचा हळूहळू लोप होत जाऊन व्यक्तीचा विकास हा जो लोकशाहीचा मूळ हेतु, तो विफल होऊं पाहत आहे !

लोकशाहीवरील हीं सर्व अरिष्टें टळून व्यक्तिविकास हा जो तिचा मूळ हेतु, तो सफल व्हावयाचा










तर लोकशाहीची मूळ प्रेरणा नैतिक आहे या कल्पनेचें पुनरुज्जीवन झालें पाहिजे. आणि व्यक्तीची जीवनगंगा नैतिक मूल्यांच्या पवित्र पात्रांतून वाहूं लागली पाहिजे.

धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाचा मूळ हेतु सत्यसंशोधनानें प्रत्येक माणसाला स्वतःची शुद्धि व उन्नति करून घेण्याला स्वातंत्र्य असावें व या बाबतींत सर्व माणसें सारखीं मानलीं जावीं हा आहे. उन्नति किंवा सुख म्हणजे केवळ शारीरिक किंवा भौतिक सुख, पैशाअडक्याचें सुख असा अर्थ मानण्यांत येऊं लागला. म्हणूनच आर्थिक क्षेत्रांतील व्यक्तिवादाला स्पर्धेचें स्वरूप प्राप्त झालें व स्वतःच्या किंवा पुष्कळांच्या सुखासाठीं अगर उन्नतीसाठीं इतर थोड्यांचें नुकसान करणें वा त्यांना दुःख देणें समर्थनीय ठरलें. असें झाल्यामुळेंच लोकशाही म्हणजे लोकांचें राज्य असें नांव राहिलें, पण प्रत्यक्षांत लोकांपैकीं किंवा समाजापैकीं कांहीं लोकांच्या सुखांसाठीं अगर हितासाठीं लोकशाहीला राबविण्यांत येऊं लागलें. सध्यांची राजकीय पक्षपद्धति लोकशाहीचा सर्वांसाठीं उपयोग न करतां तिला कांहीं थोड्यांच्यासाठीं राबविण्याचें मुख्य साधन बनलें आहे.

समाजांतील व्यक्ती केवळ स्वसुखपरायणच असतात अथवा असणें शक्य आहे, स्वसुख म्हणजे पैशाच्या मानदंडानें मोजतां येण्यासारखें आर्थिक वा भौतिक सुख आणि तें प्राप्त करून घेणें हीच मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति आहे—या दोन सिद्धान्तांवर आधुनिक लोकशाहीची उभारणी झालेली आहे. पण हे दोन्हीहि सिद्धान्त फक्त कांहीं अंशींच खरे आहेत. कारण मनुष्य म्हणजे केवळ शरीर नव्हे. शरीराप्रमाणें माणसाला मन, बुद्धि व आत्मा हीं आहेत. म्हणून माणसाचें सुख किंवा उन्नति म्हणजे केवळ शारीरिक सुख किंवा भौतिक संपत्तीची प्राप्ति नव्हे, तर बौद्धिक व आत्मिक सुखाची व उन्नतीची प्राप्ति होय.

## राजकीय पक्ष ही आपत्ति

सद्गुणांचें संवर्धन करून व्यक्तीला सत्यसंशोधनानें आत्मोन्नति करून घेतां येईल अशी परिस्थिति निर्माण करणें व त्याला तशी संधि देणें हेंच कोणत्याहि राज्यपद्धतीचें मुख्य ध्येय असलें पाहिजे. याच अर्थानें लोकशाही राज्यपद्धति सर्व राज्यपद्धतींत श्रेष्ठ मानली गेली आहे. कारण, या राज्यपद्धतींत स्वतःसाठीं अशी परिस्थिति निर्माण करण्याचें नागरिकांना जितकें स्वातंत्र्य व सत्ता असते तितकी दुसऱ्या कोणत्याहि राज्यपद्धतींत नसते असें गृहीत धरलें आहे व अनुभवानें तें सिद्धहि झालें आहे. असें असल्यामुळें लोकशाहीचा कारभार अशा रीतीनें चालला पाहिजे कीं, त्यांत आत्मक्लेशानें परस्परांची सदसद्विवेकबुद्धि जागृत करून सद्भावजन्य व्यवहारानें एकमेकांची आत्मशक्ति जागृत करण्याला नागरिकांना जास्तींत जास्त उत्तेजन व संधि मिळाली पाहिजे. स्पर्धेवर आधारलेलें पक्षनिष्ठ राजकारण या गोष्टींना प्रतिकूल आहे हें सांगावयास नकोच.

सद्यःस्थितींत राजकीय पक्ष-पद्धति एक आवश्यक आपत्ति ( necessary evil ) मानली तरी ' सर्व नागरिकांना स्वातंत्र्य व समतेचा परस्परव्यवहार ' हें लोकशाहीचें साध्य शीघ्र सिद्ध व्हावयाचें तर लोकांत सत्यनिष्ठा व प्रेमवृत्ति अधिकाधिक बाणत गेलीं पाहिजेत हें विसरतां कामा नये. हें कार्य राजकीय पक्षांपेक्षां सर्वोदयी जीवनदृष्टीचा व जीवनपद्धतीचा ज्यांनीं स्वीकार केला आहे, असे सत्याग्रही निष्ठेचे निःस्वार्थी सेवक सत्तानिरपेक्ष जनसेवेनेंच अधिक करूं शकतील. अशा सेवकांचा वर्ग जसजसा वाढत जाईल त्या मानानें राजकीय पक्षांचें प्रयोजनच ( raison d'etre ) असमर्थनीय ठरेल व एक काळ असा येईल कीं, त्या वेळीं ते अंतर्धान पावतील.

राजकीय पक्षाच्या लोपाबरोबर बहुसंख्याकांच्यासाठीं लोकशाहीला राबवून घेण्याची अनिष्ट प्रथाहि नाश पावून खऱ्या लोकशाहीला खरोखर अभिप्रेत अशा ' सर्वकल्याणकारी ' समाजकारणाच्या व राजकारणाच्या शुभ युगाला प्रारंभ होईल.

———










प्रा. नारायण देशपांडे

# अमेरिकन लोकशाहीचें स्वरूप

आजच्या जागतिक विचारसंघर्षामध्यें लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्या पाश्चात्त्य राष्ट्रांपैकीं अमेरिका (United States of America) हें एक प्रमुख राष्ट्र आहे. साहजिकच लोकशाहीचें स्वरूप व व्यवहार यांचें परीक्षण करतांना अमेरिकन लोकशाहीबद्दल विचार करणें अपरिहार्य आहे.

## नागरिक-हक्कांचा राज्यघटनेमध्यें समावेश

लोकशाहीचें तत्त्व अगर लोकशाहीची कार्यपद्धति यांचा पुरस्कार करण्याचें धोरण अमेरिकेनें नव्यानें अंगीकारलें नसून, तें अमेरिकेच्या राष्ट्रीय जीवनाचें प्रथमपासूनच मुख्य अंग आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, कायद्याचें अधिराज्य आणि प्रत्येक नागरिकाला राज्ययंत्रणेवर नियंत्रण ठेवण्याच्या अधिकारांत वांटा या गोष्टी प्रथमपासूनच अमेरिकेच्या राष्ट्रीय जीवनांत समाविष्ट झाल्या आहेत. ज्या विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीमध्यें अमेरिकन वसाहतींची सुरुवात व वाढ झाली त्या परिस्थितीचाच एक परिणाम असा झाला कीं, प्रथमपासूनच हे वसाहतवाले व्यक्तिस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते बनले. धार्मिक अधिराज्य व प्रस्थापित राजसत्ता यांच्या विरुद्ध झगडा करून देश सोडलेल्या वसाहतवाल्यांनीं नव्या परिस्थितीमध्यें आपलें स्वातंत्र्य व हक्क जागरूकतेनें राखले. पुढें वसाहतींची वाढ झाली तीसुद्धां व्यक्तिस्वातंत्र्याला खुला व पुरा वाव मिळाल्यामुळेंच. या कारणानें अमेरिकन राष्ट्राच्या घडणीची पार्श्वभूमीच प्रत्येक नागरिकाला आत्मविकासासाठीं पूर्ण मोकळीक असली पाहिजे या तत्त्वावर आधारलेली आहे. इंग्लंडविरुद्ध या वसाहतींनीं लढा करून आपलें स्वातंत्र्य मिळविलें आणि नव्या राष्ट्राची घडी बसवितांना व्यक्तिस्वातंत्र्य व नागरिकांचे मूलभूत हक्क अबाधित राहतील अशी व्यवस्था केली.

नागरिक-हक्क राज्यघटनेमध्यें ग्रथित करून त्याविरुद्ध आक्रमण होणार नाहीं अशी तरतूद करण्याची प्रथा अमेरिकेनें पाडली. राज्यसत्तेला जणूं आव्हान देऊन त्या स्वरूपांत मानवी हक्कांची घोषणा करून त्यांकडे लोकांचें लक्ष प्रभावी रीत्या वेधून घेण्याचें काम फ्रेंच राज्यक्रांतीनें केलें, हें खरें. पण राष्ट्राच्या मूलभूत कायद्याचा पाठिंबा देववून व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क चिरस्थायी स्वरूपांत सुरक्षित ठेवण्याची योजना अमेरिकेनें सुरू केली. गेल्या दीडशतकामध्यें निरनिराळ्या देशांनीं राज्यघटना केल्या. त्यांपैकीं अनेकांनीं अमेरिकेचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून नागरिक-हक्कांचा राज्यघटनेमध्यें समावेश केला आहे. भारतीय राज्यघटनेमध्यें मूलभूत हक्कांची योजना तर आहेच; पण शिवाय अमेरिकेप्रमाणेंच या हक्कांच्या अंमलबजावणीबद्दलहि तींत योजना असून, न्यायालयावर खास जबाबदारी टाकली आहे. अमेरिकेच्या राज्यघटनेंतील नागरिक-हक्कांसंबंधींची तरतूद आदर्शवत् मानून त्या अनुरोधानें भारतीय राज्यघटनेंतील मूलभूत हक्कांसंबंधींच्या कलमांचें परीक्षण करण्याची प्रवृत्ति भारतीय घटनासमितीच्या कामकाजांत मोठ्या प्रमाणावर आढळून आली.

## 'खुलें' नागरिक जीवन

अमेरिकन जीवनामध्यें व्यक्तिस्वातंत्र्याचा व्याप केवळ राजकीय क्षेत्रापुरता मर्यादित नाहीं. 'व्यक्तिवाद' या एका शब्दामध्यें अमेरिकेच्या समाजजीवनाचें सार सांगतां येईल. व्यक्तीच्या जीवनावर कमींत कमी नियंत्रण असलें पाहिजे, असा त्या समाजाचा रोख आहे. भारतीय नागरिकाचें जीवन जन्मापासून मृत्यूपर्यंत अनेक बंधनांनीं जखडलेलें असतें. तो कुटुंबाशीं अत्यंत निगडित असतो. जात, गोत, धर्म, संस्कार, परंपरा इत्यादि अनेक बंधनें भारतीय नागरिकाच्या जीवनाच्या विविध क्षेत्रांत जाणवत असतात. त्या दृष्टीनें अमेरिकन नागरिकांचें जीवन 'खुलें' आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांपैकीं कांहीं समाज जात-गोत वगैरे बंधनांनीं जखडलेले नसले, तरी त्यांच्या जीवनामध्यें कुटुंब, परंपरा इत्यादि बंधनें आहेतच. त्या कारणानें अशा समाजामध्यें निरनिराळे वर्ग आढळतात व सामाजिक जीवनामध्यें पुरी समता दिसत नाहीं. इंग्लंड हा

देश लोकशाहीचा पुरस्कर्ता असूनहि तेथील समाजाचें जीवन बहुंशीं परंपरागत आहे. दैनंदिन व्यवहारामध्यें व सामाजिक जीवनाच्या विविध अंगांमध्यें समाजाच्या कांहीं घटकांना वर्गभेद जाणवतो. आणि याचें कारण त्या समाजावर अजूनहि परंपरा, संस्कार, राजनिष्ठा, कौटुंबिक प्रतिष्ठा इत्यादि बंधनें आहेत. या उलट, अमेरिकन समाज हा नवसमाज असल्यामुळें तेथें परंपरा बनल्या नाहींत व संस्कार रुजले नाहींत. राजसत्तेच्या अभावामुळें राजनिष्ठेचें बंधन नाहीं. धर्मच्छलाविरुद्ध बंड करूनच हें राष्ट्र बनल्यामुळें धार्मिक असहिष्णुतेचा धोका नाहीं. वयांत आल्या-बरोबर कुटुंबांतून अलग होऊन स्वतःच्या पायावर उभें राहण्याची जरूरी असल्यामुळें कौटुंबिक नियंत्रणाची भीति नाहीं. जातिसंस्था नसल्यामुळें सामाजिक व्यवहार व व्यवसायाची निवड या बाबतींत पूर्ण मोकळीक. अशा 'खुल्या' समाजा-मध्यें अमेरिकन नागरिकाला स्वतःच्या कल्पने-प्रमाणें व कुवतीप्रमाणें जीवनांतून मार्ग काढण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आहे आणि असें पूर्ण स्वातंत्र्य व्यक्तीला असलें पाहिजे, हें अमेरिकन समाजाचें तत्त्वज्ञान बनलें आहे.

### राज्यसत्तेची विभागणी

कायद्याचें अधिराज्य हें लोकशाहीचें एक वैशिष्ट्य समजलें जातें. राज्यकारभार हा एखाद्या व्यक्तीच्या किंवा अधिकाऱ्याच्या लहरीप्रमाणें न चालतां प्रस्थापित कायद्यांप्रमाणें चालला पाहिजे व लोकांच्या प्रतिनिधींनींच ते कायदे केले किंवा बदलले पाहिजेत ही लोकशाहीची अपेक्षा असते. अमेरिके-च्या राज्यघटनेनें ही तरतूद केलेली आहे. किंबहुना, राज्यसत्ता जर एका अधिकारी संस्थेमध्यें केंद्रित झाली तर ती व्यक्तिस्वातंत्र्याला विघातक ठरेल, म्हणून राज्यसत्तेची निरनिराळ्या संस्थांमध्यें विभागणी करण्याचें तत्त्व अमेरिकेच्या राज्यघटनेमध्यें ग्रथित केलें आहे. कार्यकारी शाखेचा प्रमुख अध्यक्ष, कॉंग्रेस (कायदेमंडळ) व वरिष्ठ न्यायालय या सरकारच्या तीन शाखांमध्यें राज्यसत्तेची विभागणी झाली असून ती काटेकोरपणानें अंमलांत यावी अशा घटनेचा आग्रह आहे. राज्यघटना बनविली त्यानंतरच्या काळांत परिस्थिति बदलली आणि नव्या परिस्थितीला तोंड देण्याच्या दृष्टीनें घटनेनें ठरविलेली ही सत्ताविभागणी कित्येक वेळां अयोग्य वाटूं लागली. अशा परिस्थितींत शब्दांचे अर्थ ताणून किंवा नवीन अर्थ लावून प्रत्यक्षांत ही विभागणी बदलण्यांत आली आहे. गेल्या कांहीं वर्षां-मध्यें अमेरिकेच्या अध्यक्षाची सत्ता याच मार्गांनीं खूप वाढली आहे; परंतु वरिष्ठ न्यायालय व कॉंग्रेस या दोन्ही संस्था आपापल्या अधिकारांबद्दल व सत्ता-क्षेत्राबद्दल जागरूक असल्यामुळें अध्यक्षाची सत्ता विशिष्ट मर्यादेबाहेर वाढत नाहीं. अगदीं अलीकडचें एक उदाहरण म्हणजे राष्ट्रीय सुरक्षिततेसाठीं पोलाद कारखान्यांवर सरकारी नियंत्रण बसविण्याचा अधिकार अध्यक्षाला नाहीं, असा निर्णय वरिष्ठ न्यायालयानें दिला. राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें कांहीं वेळां अध्यक्षाच्या सत्तेवर न्यायालयीन निर्णयाचें बंधन नसतें तर बरें झालें असतें, असें अमेरिकेंतील कांहीं विचारवंतांना वाटतें. प्रे. फ्रॅंक्लिन रूझवेल्ट यांच्या पहिल्या अध्यक्षीय कारकीर्दीमध्यें त्यांच्या पुढाकारानें 'न्यू डील' या नांवानें संबोधिलेला कार्यक्रम सरकारनें स्वीकारला. त्यापैकीं बराचसा भाग त्या वेळच्या वरिष्ठ न्यायालयानें घटनाबाह्य ठरवून रद्द करविला. तेव्हां न्यायालयाच्या या अधिकाराबद्दल अमेरिकेंत पुष्कळ ऊहापोह झाला. पण हा अधिकार रद्द किंवा मर्यादित करण्याचा विशेषसा प्रयत्नहि अद्याप झाला नाहीं.[1] कारण परिणामतः घटनेनुसार झालेली ही सत्ताविभागणीच लोकशाहीला पोषक आहे, हें मत अजूनहि तेथें प्रभावी आहे.

कॉंग्रेसनें आपल्या अधिकाराबद्दल जागरूकता ठेवून अध्यक्षाच्या अधिकारावर नियंत्रण ठेवण्याचे

---

१ प्रे. रूझवेल्ट यांची अध्यक्षीय कारकीर्द लांबल्यामुळें या काळांत वरिष्ठ न्यायालयाचे बरेच सदस्य सेवानिवृत्त झाले व त्यांच्या जागीं आपणांस अनुकूल असे सभासद रूझवेल्ट यांनीं नेमले व ही तात्कालिक अडचण दूर केली ही गोष्ट निराळी.

प्रसंग वरचेवर येतात. अमेरिकन सैन्य युरोपमध्यें पाठविण्याच्या प्रश्नावर काँग्रेसनें ही जागरूकता दाखविली. चार डिव्हिजन्स एवढें सैन्य पाठवावयाला काँग्रेसनें संमति दिली होती हें खरें; पण त्यापुढें कांहीं-हि नवी योजना ठरविण्यापूर्वी अध्यक्षांनीं काँग्रेसचें मत घ्यावें असा स्पष्ट इशाराहि दिला. आंतरराष्ट्रीय कराराला काँग्रेसच्या वरिष्ठ सभागृहाची संमति आवश्यक असल्यामुळें काँग्रेसचा पाठिंबा नसेल, तर अध्यक्षाची कशी चमत्कारिक स्थिति होते याचें, राष्ट्रसंघाबाबत झालेली प्रे. विल्सन यांची परिस्थिति हें उत्तम उदाहरण होय.

अमेरिकेच्या राज्यघटनेमध्यें राज्यसत्ता केंद्रित होऊं नये यासाठीं विशेष खबरदारी घेतली आहे. राज्यसत्तेचा वापर करणाऱ्या अधिकाऱ्यांची परस्परांवर मर्यादा घालून हा हेतु साधला आहे. अमेरिका हें संघराज्य असल्यामुळें संघराज्य सरकार व संस्थान-सरकारें यांच्या परस्परांवर मर्यादा येतातच. प्रत्येक सरकारामध्यें कार्यकारी शाखा, कायदेमंडळ व न्यायालय यांचें एकमेकांवर नियंत्रण आहेच. कायदेमंडळामध्यें दोन शाखांची योजना करून कोणतीहि एक शाखा सत्ता काबीज करणार नाहीं अशी योजना आहे. ' सत्तासमतोला'चें तत्त्व राज्य-व्यवहाराच्या सर्व अंगोपांगांमधून स्वीकारलेलें आहे.

## पक्षसंघटना आणि हितसंबंधी गट

सत्तेचा वापर करणाऱ्या अनेक अधिकाऱ्यांमध्यें सत्तेची विभागणी करून व त्यांची परस्परांवर मर्यादा घालून सत्तेचें केंद्रीकरण होऊं नये, ही व्यवस्था अमेरिकेनें केवळ राज्यघटनेमध्येंच केली आहे असें नाहीं. राज्यकारभार कसा चालतो याचें प्रत्यक्ष निरीक्षण केलें म्हणजे हेंच सत्ता-समतोलाचें तत्त्व राज्यव्यवहारामध्यें सरकारबरोबर सहभागी होणाऱ्या इतर संघटनांच्याबाबतहि लागू आहे असें दिसतें. या बाबतींत अमेरिकेच्या राजकीय पक्षसंघटनांचें उदाहरण देतां येईल. अमेरिकेंतील राजकीय पक्ष हे युरोपमधील राजकीय पक्षांप्रमाणें एखाद्या विशिष्ट हितसंबंधांचे प्रतिनिधी म्हणून बनलेले नाहींत. रिपब्लिकन व डेमोक्रॅट हे जे अमेरिकेंतील दोन प्रमुख पक्ष ते म्हणजे एकाच नाण्याच्या दोन बाजू होत, असें त्यांचें वर्णन करण्यांत येतें. याचें कारण दोन्ही पक्षांच्या मतप्रणालींमध्यें तात्त्विक दृष्ट्या कांहीं मौलिक फरक नाहीं हें होय. तसेंच प्रत्येक पक्षाच्या मागें विशिष्ट हितसंबंध आहेत असेंहि म्हणतां येणार नाहीं. आर्थिक दृष्ट्या विचार करतां शेतकरी, मजूर, मध्यमवर्ग, वगैरे गटांतील लोक दोन्ही पक्षांत आहेत. तसेंच निरनिराळे सांस्कृतिक गटहि दोन्ही पक्षांत आहेत. एवढेंच नव्हे, तर एकाच पक्षामध्यें एका वेळेला एक वर्ग प्रामुख्यानें असतो, तर दुसऱ्या वेळेला दुसरा वर्ग जास्त प्रभावी असतो. १९ व्या शतकांत डेमोक्रॅट पक्ष मुख्यत्वें दक्षिण व पश्चिम संस्थानांतील शेतकऱ्यांचें प्रतिनि-धित्व करीत होता; तर अलीकडे औद्योगिक मजूर-वर्ग यांचें तो प्रतिनिधित्व करतो. तरीहि १९४८ च्या अध्यक्षीय निवडणुकीमध्यें प्रे. ट्रुमन यांच्या अनपेक्षित विजयाला पश्चिमेकडील शेतकरी-वर्गाचा पाठिंबा बराचसा कारणीभूत झाला.

प्रत्येक पक्ष हा अनेक हितसंबंधांचें संघराज्य बनलेला आहे. त्यामुळें पक्षाचा कार्यक्रम सर्व हितसंबंधीयांना सामावून घेऊं शकेल असा असावा लागतो. साहजिकच दोन्ही पक्षांच्या कार्यक्रमामध्यें बऱ्याच गोष्टी समान असतात व पक्षसंघटनाहि बरीचशी ढिली असते. तत्त्वनिष्ठा अगर वर्गहित-संबंध यामुळें युरोपांतील राजकीय पक्षांची घडण जशी ताठर व कडक झाली आहे, तशी अमेरिकें-तील पक्षांची झालेली नाहीं. प्रत्येक पक्षामध्यें वेग-वेगळ्या गटांची देवाणघेवाण चालते व त्यांची परस्परांवर मर्यादा पडते. राजकीय पक्षांचें मुख्य कार्य निवडणुका लढवून राज्यसत्तेचीं सूत्रें आपल्या गटाच्या स्वाधीन करून घेणें हें असतें.

अध्यक्षीय निवडणुकीची मोहीम यंदां असल्या-मुळें अमेरिकेंतील राजकीय पक्ष एकमेकांविरुद्ध जोरानें प्रचार करीत आहेत. या पक्षाच्या घोषणा पाहून परराष्ट्रीय धोरणाबद्दल डेमोक्रॅट व रिपब्लिकन पक्षांमध्यें फार मोठे मतभेद आहेत असें वाटतें. पण आयसनहॉवर यांची उमेदवारी पत्करून रिपब्लिकन पक्षानें जो कार्यक्रम पुरस्कारला आहे, त्याचा अभ्यास करतां असें दिसतें कीं, अमेरिकेनें अलिप्तता-वादाला सोडचिठ्ठी दिली असून आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या नेतृत्वाची धुरा पत्करली आहे. साम्य-

वादाचें साम्राज्य फैलावूं नये यासाठीं इतर राष्ट्रांचें सहकार्य मिळविण्याची आवश्यकताहि अमेरिकेला पटली आहे व त्या दृष्टीनें पश्चिम युरोपांतील राष्ट्रांच्या सहकार्यानें एक प्रभावी संघटना बनविण्याला अमेरिका बांधली आहे. या महत्त्वाच्या मुद्द्यांवर मतैक्य असल्यामुळें डेमोक्रॅट व रिपब्लिकन पक्षांच्या परराष्ट्रीय धोरणांतील मतभेद हे तपशिलांच्या बाबीपुरते आहेत व मुख्यतः निवडणुकीसाठीं त्यांचें महत्त्व मुद्दाम वाढविण्यांत येत आहे, ही गोष्ट स्पष्ट होते.

राजकीय पक्षसंघटनेशिवाय अमेरिकेच्या राज्य-व्यवहारामध्यें सहभागी होणारी आणखी एक संस्था म्हणजे निरनिराळे हितसंबंधीय गट (pressure groups). सामाजिक जीवनाच्या विविध क्षेत्रांतील—शैक्षणिक, सांस्कृतिक, धार्मिक, आर्थिक इत्यादि—हितसंबंधांचें प्रतिनिधित्व करणाऱ्या अनेक संस्था राज्यव्यवहारावर जनमताचें दडपण आणून राज्यसंस्थेमार्फत आपापले हेतू साध्य करून घेतात. या संस्था राजकीय पक्षांशीं संलग्न असल्या तरीहि स्वतंत्रपणें आपापलें कार्य करीत राहतात. मजूर-संघटना, स्त्रीसंघटना, धार्मिक संघटना इत्यादि संघटना सरकारी अधिकारी व कायदे-मंडळांतील प्रतिनिधी यांच्यामार्फत हें काम करतात. सामान्यपणें जनमत संघटित करून तें परिणामकारक करण्याचे मार्ग म्हणजे प्रत्येक मतदारसंघांतून अनेक पत्रें, तारा व विनंत्या तेथील प्रतिनिधींकडे पाठवावयाच्या; सभा, वृत्तपत्रें, रेडिओ व टेलिव्हिजन या साधनांच्या साहाय्यानें प्रचार करावयाचा; आणि सरकारी अधिकारी किंवा कायदेमंडळांतील प्रतिनिधी यांच्या समक्ष गांठी घेऊन त्यांना आपली बाजू मांडावयाला सांगावयाची वगैरे. विशिष्ट कारणासाठीं तात्पुरत्या स्वरूपाच्या संघटना अस्तित्वांत येतात व कार्यसिद्धि झाली कीं नामशेष होतात. मजूरसंघटनांसारख्या संघटना संपाचाहि उपयोग करतात. परंतु या निरनिराळ्या हितसंबंधीयांच्या संघटना एकाच वेळीं काम करीत असल्यामुळें त्या आपापल्या कार्यानें परस्परांवर मर्यादा घालतात, आणि साधारणपणें जी गोष्ट बहुसंख्येनें मान्य होण्यासारखी असेल तीच शेवटीं राज्यसत्तेच्या गळीं उतरविण्यांत येते. या कार्यपद्धतीमुळें कोणत्याहि एका हितसंबंधाचें राज्यव्यवहारावर दडपण राहत नाहीं. उलट, अनेक संघटना कार्यकुशल बनल्या असून त्यांच्या कार्यक्षेत्राचा विस्तारहि खूप वाढला आहे.

नागरिकांपैकीं प्रत्येकाला राज्यकारभारावर नियंत्रण ठेवण्याच्या अधिकारांत वांटा असणें हें लोकशाहीमध्यें आवश्यक मानलें जातें. सामान्यपणें अधिकाराची जागा घेण्याला मोकळीक व मतदानाचा हक्क या दोन अधिकारांतून ही जाणीव व्यक्त होते. अमेरिकेमध्यें सार्वत्रिक प्रौढमतदानाचा हक्क नागरिकांना असून अधिकाराची जागा घेण्याबद्दलहि त्यांना मुभा आहे. त्यामुळें राज्यकारभारावर नियंत्रण ठेवण्याचा हक्क तेथील नागरिकांना आहे हें उघड आहे.

### खुली चढाओढ

लोकशाही परिणामकारक रीतीनें अंमलांत यावयाची असेल, तर नागरिकांना केवळ हक्क देऊन भागत नाहीं. या हक्कांचा उपयोग करण्याला अनुकूल अशी परिस्थिति निर्माण करावी लागते. अमेरिकेची समाजरचना व्यक्तिवादी असल्यामुळें तेथें व्यक्तिविकासाला पुष्कळ अनुकूल वातावरण आहे हें खरें. मतदानाचा अधिकार सार्वत्रिक असल्यामुळें राजकीय क्षेत्रामध्यें समता व्यक्त होते. पण ही समता प्रभावी करण्यासाठीं लोकांच्या जीवनांतील आर्थिक विषमता नाहींशी करण्याची जबाबदारी राज्यव्यवस्थेवर आहे, ही गोष्ट अमेरिकन विचारप्रणालीमध्यें दृढ झालेली नाहीं. जीवन ही खुली चढाओढ आहे व यामध्यें जो तो आपापल्या मगदुराप्रमाणें व कर्तबगारीप्रमाणें चढेल अथवा पडेल; त्यांत सरकारनें अथवा इतर संस्थांनीं उगाच ढवळाढवळ करूं नये; मात्र, ही चढाओढ खुली राहील याबद्दल समाजानें जरूर दखल घ्यावी व सरकारमार्फत योग्य ती उपाययोजना करावी—अशी एकंदर त्या समाजाची विचारसरणी आहे.

अलीकडे व विशेषतः १९३० सालच्या आर्थिक मंदीचे परिणाम अनुभविल्यानंतर या सामान्य विचारसरणीमध्यें बदल होऊं लागला आहे. प्रे. रूझवेल्ट यांच्या आर्थिक नियोजनाच्या कार्यक्रमाची लोकप्रियता, सरकारी कार्यक्षेत्राचा वाढलेला

अवाढव्य विस्तार, संघराज्य व संस्थान-सरकारें यांनीं अंगीकारलेली सामाजिक सुरक्षिततेच्या योजनांची जबाबदारी या व तत्सम इतर घडामोडी या बदललेल्या विचारसरणीच्या निदर्शक आहेत. सरकार या संस्थेबद्दल सामान्य अमेरिकन नागरिकाची वृत्ति तटस्थतेची किंवा उदासीनतेची आहे, ही गोष्ट अजूनहि खरी आहे. पण दिवसेंदिवस ही वृत्तिसुद्धां बदलत चाललेली आहे यांत शंका नाहीं. जनतेच्या कल्याणासाठीं व समाजाच्या विकासासाठीं सरकारला विधायक कार्य केलेंच पाहिजे ही जाणीव अमेरिकेमध्यें हळूहळू वाढत आहे. विशेषतः आंतरराष्ट्रीय राजकारणांतील अमेरिकेच्या विशिष्ट स्थानामुळें व मोठ्या जबाबदारीमुळें राज्यसंस्था व सरकार यांबद्दलचा सामान्य नागरिकांच्या कल्पनांना धक्का बसत आहे.

### वर्णभेदाचा कलंक

आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील वाढत्या व्यवहारामुळें अमेरिकन नागरिकांच्या वर्णभेदाच्या कल्पनांनाहि धक्का बसूं लागला आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता वगैरे हीं जीं अमेरिकेच्या समाजजीवनाचीं वैशिष्ट्यें वर चर्चिलीं, त्यांचा व्याप गौरवर्णीयांपुरता मर्यादित आहे. नीग्रो लोकांचें जीवन इतर अमेरिकनांच्या जीवनाशीं समरस झालेलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर अजूनहि वर्णभेद हा अमेरिकेच्या समाजजीवनामध्यें रुजलेला आहे. या वर्णभेदामुळें अमेरिकन लोकशाही कलंकित आहे याची तेथील अनेक विचारवंतांना जाणीव आहे व हा कलंक नष्ट करण्यासाठीं त्यांचे प्रयत्नहि सुरू आहेत. आंतरराष्ट्रीय संघटनांच्या वाढत्या कार्यांमुळें अमेरिकेंतील वर्णभेद हा अनेकांचें लक्ष्य होऊन बसला आहे व स्वाभाविकच अमेरिकन नागरिकांच्या यासंबंधींच्या कल्पनांना धक्के बसत आहेत. परंतु व्यक्तिस्वातंत्र्य व संस्थानांची स्वायत्तता यांसंबंधींच्या रूढ कल्पना इतक्या प्रबल आहेत कीं, अजूनपर्यंत वर्णभेद नष्ट करण्याच्या दृष्टीनें कोणतीहि परिणामकारक योजना यशस्वी होवूं शकली नाहीं.

### बदलणारीं मूल्यें

या बदलत्या परिस्थितीमध्यें समाजाचीं मूल्यें बदलणें अपरिहार्य आहे. व्यक्तिवादी तत्त्वप्रणाली व व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार पूर्वीं अमेरिकेंत लोकशाहीला पोषक झाला. नव्या जमान्यांत या मूल्यांची स्थिति काय होणार हें ठरावयाचें आहे. शेतीप्रधान अर्थव्यवस्था, नैसर्गिक संपत्तीची विपुलता, सरकारी व सामाजिक नियंत्रणांचा मर्यादित व्याप आणि धकाधकीच्या आंतरराष्ट्रीय व्यवहारापासून अलिप्तता—या पार्श्वभूमीवर अमेरिकन समाजरचना व सामाजिक मूल्यें लोकशाहीला पोषक ठरलीं. आतां औद्योगीकरण झालें; नागरी जीवनाचा विस्तार वाढला; नैसर्गिक संपत्ति अपुरी पडूं लागली; सरकारचें नियंत्रण वाढलें आणि अनिच्छेनें का होईना, आंतरराष्ट्रीय राजकारणामध्यें अमेरिकेवर नेतृत्व येऊन पडलें. अशा बदललेल्या परिस्थितींत पूर्वींचीं सामाजिक मूल्यें व समाजरचना लोकशाहीला पोषक ठरतील काय, हा मोठा प्रश्न आहे. याचें एक सूचक उदाहरण म्हणून, अमेरिकाविरोधी कार्याचें निरीक्षण करण्यासाठीं काँग्रेसनें जी एक समिति गेल्या कांहीं वर्षांमध्यें नेमली होती (Un-American Activities Committee) तिचा उल्लेख करतां येईल. या समितीच्या कार्याचा अलीकडील रोख व्यक्तिस्वातंत्र्यावर मर्यादा घालण्यास पोषक ठरत आहे असें अमेरिकेंतल्याच कांहीं विचारवंतांना वाटत आहे. या समितीचें कार्य हें या बदलत्या परिस्थितीचें निदर्शकच आहे कीं काय असें वाटूं लागतें. साम्यवादाचा विरोध हा मतस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांवर घाला घालण्याइतपत सर्वंकष होऊं पाहत आहे व लोकशाहीच्या भवितव्याच्या दृष्टीनें ही एक चिंताजनक गोष्ट आहे.

अमेरिका हें राष्ट्र आज संधिकालांत आहे. समाजरचनेच्या दृष्टीनें या राष्ट्राला अद्याप प्रौढपणा आलेला नाहीं. बदलत्या परिस्थितीमुळें समाजाची घडी विस्कळित दिसते व या विस्कळितपणाचें प्रतिबिंब सामान्य नागरिकांच्या व्यक्तिमत्त्वामध्यें पाहायला सांपडतें. नागरिकांच्या मानसिक अस्थैर्याचें मोठें प्रमाण हें या विस्कळितपणाचेंच लक्षण आहे. त्या समाजाची घडण स्थिरस्वरूपांत झाल्याशिवाय अमेरिकन लोकशाही चिरस्थायी झाली असें म्हणतां येणार नाहीं.











# अमेरिकन लोकशाहीचा शाहीर वॉल्ट् व्हिट्मन्

एखादें राजकीय तत्त्वज्ञान काव्याला स्फूर्ति देईल काय ? —आणि एखाद्या कवीच्या स्फूर्तींतून एखादें राजकीय तत्त्वज्ञान उदय पावेल काय ? एखादी लोकशाही कवीचें स्फूर्तिस्थान होऊं शकेल काय ?—आणि एखाद्या कवीच्या स्फूर्तींतून आदर्श लोकशाहीचीं सूक्तें स्त्रवूं लागतील काय ?

आजच्या राजकारण-युगांत हे प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचे आहेत. हे प्रश्न क्वचित् विचारले गेलेहि आहेत. राजकारणी लोकांनीं त्यांचीं उत्तरें आपल्या सोयीप्रमाणें दिलींहि आहेत !

कवीच्या स्फूर्तींतून नवीं राजकीय तत्त्वज्ञानें स्त्रवल्याचीं उदाहरणें इतिहासांत अर्थातच अधिक आहेत. पण आधींच निघालेल्या राजकीय तत्त्वज्ञानावर अगर राजकीय प्रयोगांवर लुब्ध होऊन काव्यरचनेला प्रवृत्त होणाऱ्या कवींचीं उदाहरणें केव्हांहि कमीच असणार ! राजकारणी लोकांच्या वाङ्मयीन अपेक्षा मात्र या ऐतिहासिक अनुभवाच्या उलट असतात ! “ एखाद्या ‘ इझम् ’-वर अगर त्या ‘ इझम् ’च्या तत्त्वानुसार चालू झालेल्या राज्ययंत्रावर साहित्यिक लोक अद्याप कसें साहित्य प्रसवत नाहींत ? ” असा त्यांना प्रश्न पडतो; आणि साहित्यिकांच्या कालपराङ्मुखतेवर त्या दोषाचें ‘ राजकीय खापर ’ फोडलें जातें !

उलट प्लेटो, रूसो, नीत्शे, गांधी, इक्बाल, सावरकर यांच्यासारख्या स्वप्नदर्शी ‘ कवीं ’च्या प्रतिभेंतून राजकीय तत्त्वज्ञानें आणि प्रयोग यांचा उदय झाल्याचें दाखवितां येईल. या महर्षींपैकीं प्रत्येकानें आपलें स्वप्न राज्यरूपानें साकार होण्याची आशा केली. पण त्यांनीं कल्पिलेलीं राज्यें जन्मतःच तरी भंगलीं, नाहीं तर भंगलेलींच तरी जन्माला आलीं ! त्यांचीं ध्येयस्वप्नें मात्र वाङ्मयरूपानें अभंग राहून भावी राजकीय प्रयोगांना जन्म देणार आहेत. प्लेटोच्या आदर्श-राज्याचा उच्चार अनेक शतकें होत आहे व होईल; पण त्यानें वांच्छिलेले ‘ फिलॉसफर ’ राज्यकर्ते अद्याप तरी जगांत अवतरलेले नाहींत. रूसोचें ध्येय आणि फ्रान्समध्यें प्रत्यक्ष घडलेली राज्यक्रान्ति यांत साधर्म्य बेताचेंच होतें. नीत्शेला हवा असलेला ‘ लोकोत्तर ’ मानव आणि नाझी जर्मनीनें तयार केलेला मानव, यांत कांहीं साम्य होतें, असें नीत्शेच्या द्वेष्ट्यांखेरीज कोणीच म्हणूं धजणार नाहीं ! इक्बाल्च्या कल्पना-सृष्टींतील इस्लामूचें राज्य आणि पाकिस्तानमध्यें प्रत्यक्ष साध्य झालेली राजवट यांत काडीचेंहि साम्य नाहीं, हें इक्बालच्या ग्रंथांचे अभ्यासक जाणतातच. गांधींचें अहिंसानिष्ठ ध्येयराज्य आणि गांधींच्या कॉंग्रेसनें आज प्रत्यक्ष स्थापन केलेलें राज्य यांतहि साम्य तितपतच आहे. सावरकरांनीं रचलेलीं ‘ अभिनव ’ भारताचीं स्वप्नें आणि आजचा खंडित भारत यांतहि साधर्म्य अत्यल्पच आहे.

### लोकशाही हें ‘ राजकारण ’ नव्हे, ‘ धर्म ’च

कविकल्पना आणि ऐतिहासिक घटना यांज-मधील ही अपरिहार्य विपरीतता पाहतां, अमेरिकन लोकशाहीच्या दर्शनानें ज्याला स्फूर्ति लाभली, अशा वॉल्ट् व्हिट्मन् ( १८१९–१८९२ ) सारख्या ‘ लोकशाहीच्या शाहीरा ’ची महती इतिहासांत अधिकच भासूं लागते. अमेरिकन वसाहती आपल्या माय-भूमीपासून स्वतंत्र झाल्या त्या वेळीं अगर उत्तर आणि दक्षिण संस्थानांमध्यें उद्भवलेल्या

अंतर्गत युद्धाच्या दिव्यांतून अमेरिकन 'रिपब्लिक' सहीसलामत बाहेर पडलें त्या वेळीं, पाश्चात्त्य जगांत राज्यशास्त्र, अर्थशास्त्र आणि इतिहासशास्त्र यांचे नवे नवे सिद्धान्त मांडले जात होते, यांत शंका नाहीं. तथापि अमेरिकेंतील राज्यक्रांति ही कोणीं राजकीय सांप्रदायिकांनीं केलेली नसून, स्वातंत्र्य-प्रेमी, पापभीरु, व्यवहारनिपुण अशा सर्वसामान्य वसाहतवाल्यांनीं केलेली होती. शेजारधर्म, माणुसकी, स्वाभिमान, रोखठोक व्यवहारवाद हेंच त्यांचें तात्त्विक भांडवल होतें. वॉशिंग्टन, फ्रँक्लिन्, लिंकन् यांच्यासारखे राष्ट्रनिर्माते मुत्सद्दी आणि इमर्सन्, थोरो, वॉल्ट व्हिट्मन् यांच्यासारखे तत्त्वज्ञ कवी यांच्या कृतींतून आणि उक्तींतून या नूतन राष्ट्राला कांहींसें अस्फुट तत्त्वज्ञान लाभत होतें. मूळ वसाहतवाल्यांचा कडक नैष्ठिकपणा (Puritanism) मागें पडून, सृष्टि आणि मानव यांजमधील सौंदर्यावर आणि अद्वैतावर भर देणारें व्यापक गूढवादी तत्त्वज्ञान स्फुरूं लागलें होतें. आणि स्वातंत्र्यभक्तीची परिणति लोकशाहीच्या पूजनांत होत होती. पण राजकीय आणि आध्यात्मिक या दोन्ही उत्साहांना मागें टाकणारा असा केवळ ऐहिक सुबत्तेचा म्हणून एक उत्साह अमेरिकेंत लवकरच एवढा उसळला कीं, अमेरिका हा कायमचा लक्ष्मीपूजकांचा देश म्हणूनच ठरतो कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. आजच्या अमेरिकेसंबंधींहि जगांत तीन सूर ऐकूं येतील. कोणी अमेरिकेच्या अफाट साधनसंपत्तीबद्दल आणि अफाट वार्षिक मिळकतीबद्दल बोलतील; कोणी अमेरिकेच्या आजच्या आन्तरराष्ट्रीय ध्येयवादाबद्दल धन्योद्गार काढतील; तर कोणी अमेरिका हा एक पोरकट, चैनी आणि संयमहीन द्रव्यलोभ्यांचा मुलुख आहे असें म्हणतील!

आज जागतिक राजकारणांत अभूतपूर्व स्थान घेऊन बसलेल्या या महान् राष्ट्राच्या आध्यात्मिक भवितव्याचा विचार करणारा राष्ट्रीय कवि म्हणून वॉल्ट् व्हिट्मन् याचें स्थान अपूर्व आहे; पण त्याला अमेरिकेचा राष्ट्रीय कवि म्हणण्यापेक्षां अमेरिकन लोकशाहीचा कवि म्हणणेंच अधिक युक्त होईल. अमेरिकेच्या भवितव्याचें रहस्य 'लोकशाही' या एकाच शब्दांत आहे, अशी त्याची श्रद्धा होती. पण 'लोकशाही' हें व्हिट्मन्चें 'राजकारण' नसून तो त्याचा 'धर्म' होता. एक प्रकारें तो स्वतःला अमेरिकन लोकशाहीचा प्रेषितच मानी असें म्हटलें तरी चालेल. प्रख्यात अमेरिकन महर्षि थोरो जेव्हां व्हिट्मन् याची भेट घेण्याकरितां ब्रुकलिन येथें गेला तेव्हां त्यानें त्याला पाहून "Probably the greatest democrat that ever lived" असे उद्गार काढले.

अमेरिकन लोकशाहीनें व्हिट्मन्सारख्या असाधारण ध्येयपूजक कवीला स्फूर्ति दिली, हें तिचें इतिहासांत श्रेष्ठत्व म्हणून खासच गणलें जाईल. पण एखाद्या लोकशाहीचा शाहीर म्हणजे तिचा भाट नव्हे, हेंहि व्हिट्मन् याच्या वाङ्मयावरून लक्षांत आल्याखेरीज राहत नाहीं. किंबहुना एखाद्या राज्यपद्धतीच्या अगर एखाद्या राष्ट्राच्या भक्ताला त्या राष्ट्राच्या उणीवा जितक्या तीव्रतेनें जाणवतात, तितक्या इतरांना जाणवणें शक्य नसतें.

व्हिट्मन् याच्या प्रख्यात 'तृणपर्णें' ('Leaves of Grass') या काव्यसंग्रहांत अमेरिकन राज्य, अमेरिकेचे अध्यक्ष व अमेरिकेचे सर्वसामान्य रहिवासी यांचे पवाडे जागजागीं गायिलेले आढळतात. पण तत्कालीन अमेरिकन समाज व वाङ्मय हीं त्याला किती अपूर्ण व उणीं वाटत होतीं हें पाहावयाचें असेल, तर 'Democratic Vistas' ('लोकशाहीचीं भावी दृश्यें') हा त्याचा प्रमुख गद्य प्रबंध पाहावा.

**आध्यात्मिक क्रांतीकरितां तळमळ**

लोकशाहीची प्रतिष्ठापना एखाद्या परदेशी पार्लमेंटच्या 'ॲक्ट'नें तर होणें शक्यच नाहीं. पण स्वदेशांतील सशस्त्र क्रांतीनें अगर घटनासमितीनेंहि ती होणें शक्य नसतें. या साधनांनीं राजकीय लोकशाहीची स्थापना होईल; व फार तर खऱ्या लोकशाहीचा रस्ता साफ केला जाईल. खरी लोकशाही म्हणजे आध्यात्मिक लोकशाही होय. व्हिट्मन्नें बाह्य क्रांति आणि अन्तःक्रांति (Physical Revolution आणि Inner Revolution) असा स्पष्ट फरक केलेला आढळेल. अमेरिकेच्या राजकीय इतिहासांत ज्या विजयांना आणि क्रान्त्यांना










अनुक्रमणिका

मोठें महत्त्व आहे त्यांना तो केवळ बाह्य क्रांत्यांत जमा करतो आणि आध्यात्मिक क्रांतीकरितां तळमळतो : " जगाची अर्थातच अशी कल्पना आहे आणि आमचीहि कल्पना अशी आहे कीं, समान मताधिकार, निवडून दिलेलें सरकार, कामगार-वर्गाला प्रतिष्ठा लाभवून देणें आणि कसबी कामगारांचें आज्ञाधारक, शिस्तबद्ध, सुखवस्तु राष्ट्र बनणें, एवढेंच युनायटेड स्टेट्सचें ध्येय आहे. होय, अमेरिकेपुढील कार्याचे हे भाग आहेत, यांत शंकाच नाहीं. पण तेवढ्यानें त्या कार्याची रूपरेखा संपते असें नाहीं...कारण जोंपर्यंत अंतरंग बदललें नाहीं तोंपर्यंत बहिरंगांत कोणताहि फेरफार झाला तरी त्याचा उपयोग नाहीं."

व्हिट्मन् आध्यात्मिक लोकशाहीचीं स्वप्नें रचीत होता, त्या काळीं अमेरिकेनें राष्ट्रनिर्मितींतील आणि लोकराज्यनिर्मितींतील दोन महत्त्वाचे टप्पे आधींच ओलांडले होते. पण अमेरिकेनें आपली राजकीय बैठक पक्की केली होती म्हणूनच व्हिट्मन् त्या पुढच्या टप्प्यांकरितां अधीर झाला होता. राजकारण झालें; आतां धर्मविधि, समाजव्यवस्था, वाङ्मय, शिक्षण, पोषाख या सर्वांची नवी रचना व्हावयाला हवी. त्याकरितां अमेरिकन जीवनाच्या विविध अंगांचें संकलित चित्र ('Ensemble') न्याहाळलें पाहिजे. तो अमेरिकन् राष्ट्राला विचारतो : " कारण आपण आज आहोंत, तसे विस्कळित आणि विभागलेले असे कसे काय राहूं शकूं ! ( " For how can we remain, divided, contradicting ourselves this way ? I say, we can only attain harmony and stability by consulting *ensemble* and the ethic purports... " -( Vistas p. 343 )

पण ऐक्याची त्याची कल्पना म्हणजे केवळ एखाद्या पक्षाचे, नेत्याचे अगर राजकीय 'इझम्'चे हुकूम सर्वांनीं सारखे पाळणें किंवा एका राजकीय कार्यक्रमांत बिनविरोध सामील होणें, एवढीच नव्हती. तत्कालीन अमेरिकन जीवनांत त्याला अन्तर्विरोध ('contradicting ourselves') दिसत होता. राजकीय स्वातंत्र्य प्रस्थापित झालें होतें; परंतु वाङ्मय, विचार आणि आचार यांच्या क्षेत्रांत अमेरिकेचें पराधीनत्व संपलें नव्हतें. अमेरिकन साहित्यिक म्हणजे जुन्या युरोपियन साहित्यिकांची एक नक्कल, अमेरिकन मनुष्य म्हणजेहि युरोपियन माणसाची नक्कल, ही स्थिति त्याला नको होती. आपण जुनें राज्य संपुष्टांत आणलें, जुन्या संस्था आणि परंपरा विसर्जून टाकल्या—मग नवा मनुष्य अद्याप जन्माला कां येत नाहीं, अशी त्याला टोंचणी लागली होती.

### लोकशाही रुजेल कशी, ही चिंता

" 'अमेरिका' आणि 'लोकशाही' हे दोन समानार्थी शब्द होत " असें म्हणण्यापर्यंत व्हिटमन् याची मजल गेली होती. पण त्याचें सर्वांगीण लोकशाहीचें स्वप्न मात्र राज्यशास्त्रवेत्त्याचें नसून साहित्यिकाचें होतें. आणि म्हणूनच तें अधिक सजीव, सखोल आणि एकजीव होतें. " देशांत सार्वत्रिक मतदान असेल, सार्वत्रिक शिक्षण असेल आणि तरी, माझ्या प्रिय आस्थेवाईक वाचकांनो ! ज्या मुख्य गोष्टी त्यांचीच अजीबात वाण असेल ! " ( Vistas-p. 304 ) असें तो एके जागीं मोठ्या काकुळतीचे उद्‌गार काढतो. दुसऱ्या एका ठिकाणीं तो म्हणतो :

"I will not gloss over the appalling dangers of universal suffrage in the United States. In fact, it is to admit and face these dangers I am writing."

त्या बरोबरच तो आपल्या वाचकांना असें स्पष्ट बजावतो कीं, लोकशाहीवरील आपला हा प्रबंध म्हणजे अर्थशास्त्रपठनाचें फळ नाहीं, तर शांततेच्या काळांत आणि यादवीच्या काळांत देशभर फिरून, सर्वसामान्य लोकांत मिसळून, समाजाचें अवलोकन करून जें मिळवलें त्याचें हें फळ होय. कायदेकानूंच्या रूपानें अवतीर्ण होणाऱ्या तांत्रिक लोकशाहीहून अधिक सजीव लोकशाहीचें स्वप्न त्याच्या डोळ्यांपुढें तरळत होतें. पण जगांत कोठेंच त्याला तीं प्रत्यक्ष दिसत नव्हती ! राजकीय संस्थांचा परिपाक सामाजिक व्यवहारांत उतरला पाहिजे सामाजिक व्यवहाराचा परिपाक व्यक्तिनागरिकाच्या बदललेल्या ढंगांत दिसला पाहिजे आ



अनुक्रमणिका






या बदललेल्या नागरिकाचा अन्तरात्मा काव्यांत, कथा-वाङ्मयांत, संगीतांत, शिल्पकलेंत दिसला पाहिजे. तसा तो दिसत नाहीं, तोंपर्यंत कोणतीहि नवी '-शाही ' खरीखुरी रुजली असें म्हणण्यास व्हिट्मन् तयार नव्हता. तो चिडून म्हणतो :

" The United States are destined to surmount the gorgeous history of feudalism or else prove the most tremendous failure of time."-(Vistas)

सरंजामशाहीची झगझगीत राजवट झटकून मागें टाकणें सोपें आहे; पण समाज-मनांत सरंजामशाहीइतकें खोलवर जाऊन रुजणें मात्र सोपें नाहीं !– याची कल्पना राजकीय नेत्यांहून व्हिमट्मन्च्या कविमनाला अधिक होती. युरोपमधील ज्या क्षात्रधर्मप्रधान कालखंडा( Age of Chivalry )-चा प्रभाव व्हिट्मन्च्या कालापर्यंत प्रायः जसाच्या तसा होता, त्याचीं पाळेंमुळें समाजबंधनांत, धार्मिक समजुतींत, व्यक्तींच्या अन्तःप्रेरणांत, हाडामासांत, जातकुळींत, शेंकडों वर्षें किती खोलवर गेलीं होतीं, याची त्यास जाणीव होती. त्या मानानें लोकशाहीचे संस्कार आणि लोकशाहींतून लोकसमूहाला मिळणारी स्फूर्ति किती अल्प आणि किती उथळ होती ! सरंजामशाहींतील, म्हणजेच दाक्षिण्यप्रधान क्षात्रयुगांतील शिल्पकला, शिष्टाचार, राजधर्म, लोकधर्म, कुलाचार, काव्यसंगीतादि कला, किती खोलवर पोहोंचल्या होत्या ! लोकशाहीचा शिष्टाचार, लोकशाहीची ' अदब ', लोकशाहीचीं गाणीं, लोकशाहीचीं मंदिरें कोठें आहेत ? कीं कायदे-कानूंपुरती लोकशाही आणि अंतरंगांत मात्र पिढ्यान् पिढ्या मुरलेली सरंजामशाही !

व्हिट्मन्च्या कविमनाला सतावून सोडणारा हा प्रश्न अद्यापहि सुटला आहे असें मला वाटत नाहीं. युरोपियन सरंजामशाहीची दरबारी ' अदब ' स्वतंत्र अमेरिकेंत अद्यापहि खितपत आहे म्हणून व्हिट्मन्ला वाईट वाटे. पण ती पुरती मारून काढणेंहि अशक्य नाहीं. आणि तेवढेंच व्हिट्मन्ला हवें असतें, तर आजच्या कांहीं लोकशाही देशांत व्हिट्मन् सुखानें नांदला असता. पण सरंजामशाहीची ' अदब ' मारणें जितकें सोपें आहे तितकें नवीन ' अदब ' निर्माण करणें सोपें नाहीं. कारण स्वामिनिष्ठाप्रधान राज्य, उपचार, आचार, परंपरा आणि कला हीं नाहींशीं केल्यावर, बाजारीपणा, दुकानदारी, नफेबाजी आणि संभावित लुटारूपणा यांनाच एकदम ऊत आला ! जुन्या जमान्यांतील साम्राज्यें, सामंत-मंडळें आणि देवस्थानें हीं जनतेला लुटीत असलीं, तरी त्यांना आपण ' लोकाधार ' असल्याची जी श्रद्धा व जबाबदारी वाटत होती, ती नव्या युगांतील नफेबाज लुटारूंत कां निर्माण होत नाहीं ? सारांश, मागसलेली स्वामिनिष्ठा आणि पुढारलेली ' नफा-निष्ठा ' यांच्याव्यतिरिक्त एखादी नवी ' निष्ठा ' निर्माण करतां येईल काय, हा लोकशाही युगाचा मुख्य प्रश्न आहे.

## ' वाङ्मय हाच तो राष्ट्रीय आत्मा '

व्हिट्मन्चें या प्रश्नाला पुढीलप्रमाणें उत्तर आहे :

" Viewed today, from a point of view sufficiently overarching, the problem of humanity, all over the civilized world, is social and religious, and is to be finally met and treated by literature. The priest departs and the divine literatus comes. "—( Vistas, p. 304 )

प्रसिद्ध इंग्लिश टीकाकार मॅथ्यू ऑर्नोल्ड यानेंहि भावी काळांत धर्माची जागा काव्य आपल्याकडे घेईल असें भाकीत केलें होतें. व्हिट्मन् यास आधुनिक मानवतेचा प्रश्न हा राजकीय प्रश्न नसून धार्मिक प्रश्न आहे असें वाटत असून, तो सोडविणारा नेता साहित्यिक हा होय, अशी त्याची श्रद्धा दिसून येईल. काव्य आणि कला हीं मानवी उद्धाराचीं प्रमुख साधनें मानणारांची कलेसंबंधींची कल्पनाहि, लोकशाहीसंबंधींच्या कल्पनेप्रमाणेंच सामान्यांहून वेगळी असणार हें उघड आहे. व्हिट्मन्च्या ' लोकशाही श्रद्धे 'ची सोपानपरंपरा पुढीलप्रमाणें सांगतां येईल : एकोणिसावें शतक संपून विसावें शतक सुरू होण्याच्या सुमारास राष्ट्राराष्ट्रांत विजेच्या सहाय्यानें नित्य आणि निकट संबंध ठेवतां येईल; पॅसिफिक आणि










अट्लांटिक हे दोन महत्त्वाचे महासागर आमचे ( अमेरिकनांचे ) झालेले असतील; आणि कोणा तरी एकाच राष्ट्राकडे जगाचें नेतृत्व आलेलें असेल. ( आणि व्हिट्मन्च्या मतें जगाच्या इतिहासांत प्रत्येक कालखंडांत कोणा तरी एकाच राष्ट्राचें व्यक्तिमत्व प्रभावी ठरत असतें. ) आणि हें पुढारी राष्ट्र अमेरिका हेंच असणार हें उघड आहे. पण लक्षांत ठेवा, ( -व्हिट्मन् बजावतो- ) खरें, तेजस्वी जागतिक नेतृत्व संपत्ति, व्यापार अगर आरमार यांच्या जोरावर होत नसून कोणाचें बौद्धिक दास्य न पत्करणाऱ्या, खंबीर, स्वतंत्र राष्ट्रीय व्यक्तिमत्त्वाच्या जोरावरच होतें. या सिद्धान्तमालिकेच्या पुढचा व्हिट्मन्चा सिद्धान्त म्हणजे, 'वाङ्मय हाच तो राष्ट्रीय आत्मा होय. ( This soul, its other name in these 'Vistas' is literature ).' व्हिट्मन् म्हणतो, प्राचीन यहुदी राष्ट्र अगर ग्रीक राष्ट्र यांच्या जीवनांतील आजहि अमर असा भाग म्हणजे त्यांचीं काव्येंच होत.

हिंदुस्थानच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन त्याच्या रामायण-महाभारतांत घडतें; ग्रीस आणि ज्यूडा यांच्या अंतरंगाचें दर्शनहि त्यांच्या काव्यांतच घडतें. इंग्लंडच्या आत्म्याचें दर्शनहि त्याच्या वाङ्मयांतच घडतें. पण अमेरिकेचा आत्मा कोणता ? कारखाने, शेती आणि लाखों लोकांनीं गजबजलेलीं शहरें, हाच एखाद्या राष्ट्राचा आत्मा म्हणतां येईल काय ? आणि याच आत्म्याच्या शक्तीवर तो देश जगाचें नेतृत्व करूं शकेल काय ?

### रमणीय 'नागरिकमैत्री'

माणसांमाणसांतील उत्कट आणि प्रेममय सख्य हाच अमेरिकेचा आत्मा होय; आणि तोच आत्मा अमेरिकेच्या वाङ्मयांत आणि रीतिरिवाजांत व्यक्त झाला पाहिजे, असें व्हिट्मनचें म्हणणें होतें. पण नूतन काव्यांची आणि शिष्टाचारांची व्हिट्मन् याची मागणी आणि प्रचारवादी लोकांची नव-वाङ्मयाची मागणी यांतील मूलभूत भेद ओळखला पाहिजे. व्हिट्मन्च्या डोळ्यांपुढें एक 'सद्भावना' मूर्तिमंत उभी होती आणि ती काव्याचा विषय होण्यासारखी म्हणजेच प्रेममय आणि सुंदर होती. दोन नागरिकांतील साधा शेजारधर्मच इतका उत्कट आणि रमणीय झाला पाहिजे कीं, त्यानें निदानपक्षीं आज ललित वाङ्मयांत आद्य रसाची जागा घेऊन बसलेल्या स्त्री-पुरुषांतील शृंगारिक आकर्षणांशीं टक्कर दिली पाहिजे, असा व्हिट्मन्चा आग्रह होता. तो म्हणे, त्याखेरीज आजच्या अमेरिकन लोकशाहींतील जडवादित्वाबद्दल आणि ग्राम्यतेबद्दल भरपाई होणार नाहीं आणि त्याखेरीज तिचें 'अध्यात्मीकरणहि' होणार नाहीं.

'Spiritualization of Politics' हा शब्दप्रयोग आपल्याकडे प्रथम ना. गोखले यांनीं केला आणि नंतर गांधीजींनीं तर त्याच्या प्रत्यक्ष प्रयोगाकरितांच जन्म खर्चीं घातला. व्हिट्मन् यानें Spiritualization of Democracy असा शब्दप्रयोग केला आहे. आणि माणसामाणसांत अत्यंत रमणीय नागरिक-मैत्री निर्माण होणें म्हणजेच आध्यात्मिक लोकशाही निर्माण होणें होय, असा त्याचा सिद्धान्त आहे.

### मानवपूजन

सर्वसामान्य मनुष्य, 'Average Man' हा लोकशाहीचा आद्यघटक होय. या 'सर्वसामान्य' माणसावरच व्हिट्मन्चा भर होता. परंतु आंकडेशास्त्रांतील गणिती 'ॲव्हरेज्' आणि व्हिट्मन्सारख्या कवीच्या दृष्टीला दिसलेलें 'ॲव्हरेज्' यांत फरक आहे, हें पुष्कळदां लक्षांत घेतलें जात नाहीं. सुप्रसिद्ध व्यक्तिवादी व आचारस्वातंत्र्यवादी लेखक डी. एच्. लॉरेन्स् यानें व्हिट्मन् याच्या 'सामान्य' माणसाच्या पूजनावर कडाडून टीका केली आहे (-Selected Essays : 'Democracy' पाहा. ). मानवी समता, मानवी हक्क वगैरेसंबंधींच्या घोषणा, 'सामान्य माणूस' हा प्राथमिक घटक समजूनच, करण्यांत आलेल्या आहेत. डी. एच्. लॉरेन्स म्हणतो : "All these sweet abstractions rest upon the fatal little hypothesis of the Average.... What is the Average? As we are all aware, there is no such animal. It is a pure abstraction." या काल्पनिक मानवी प्राण्याचा उपयोग फार तर फूटपट्टीप्रमाणें 'माप' म्हणून करतां येईल.








पण आपण असे आचरट जंगली लोक आहोंत कीं, त्या फूटपट्टीचीच ( म्हणजे 'man in the street' चीच ) आपण पूजा करूं लागलों ! 'आहार-निद्रा-भय-मैथुन' एवढ्यापुरतें सामान्य मनुष्याचें माप ठरवितां येईल. पण याच्या पुढच्या गोष्टींचा-गूढ आध्यात्मिक आकांक्षांचा–प्रान्त सुरू झाला कीं, प्रत्येक मनुष्याचें माप स्वतंत्र आहे. आणि म्हणून मानवी समानता ही एक मूर्खपणाची कल्पना आहे, असें लॉरेन्स म्हणतो.

लॉरेन्ससारख्या प्रकृतिपूजकांची ही टीका राजकीय नियोजनांत गृहीत धरलेल्या 'सामान्य माणसा'ला लागू पडली, तरी व्हिट्मन्च्या मानव-पूजनाला लागू पडेलसें वाटत नाहीं. 'तृणपर्णें' या त्याच्या आद्यग्रंथाचें आद्यसूक्त पुढील पंक्तींनीं सुरू होतें :

" One's self I sing, a simple
separate person
Yet utter the word Democratic
the word En-Masse

आणि त्या सूक्ताचा शेवट,

'The modern man I sing'

असा आहे. व्हिट्मन्च्या स्तोत्राचा विषय झालेला 'मानव' म्हणजे खानेसुमारीच्या सरासरींतील 'सामान्य' मानवहि नव्हे, कीं नीत्शेचा 'असामान्य' मानवहि नव्हे. तो सामुदायिक (En-Masse) मानव होता. पण अशा सामुदायिक प्रेमसिंचनाचीहि व्यक्तिवाद्यांनीं अनेकदां भरपूर थट्टा उडविली आहे. आधुनिक समाजशास्त्राचा जनक फ्रेंच तत्त्ववेत्ता आगुस्त कोम्ते याच्या मानवतापूजनाचा उल्लेख करून पुण्याच्या प्रसिद्ध डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल बेन थट्टा करीत : " Humanity ! what a poor substitute for a God ! " कोम्ते किंवा त्याचाच वैचारिक वारस जॉन् स्टुअर्ट मिल्ल, याचें 'मानवतापूजन' नीरस आणि दरिद्री असेलहि. आणि तरी व्हिट्मन्च्या मानवता-पूजनाचा अर्थ समजावून घेणें अगत्याचें आहे. कारण तें भिन्न आहे.

'मानवता', 'समूहात्मक मानव' हा काव्याचा विषय झाला पाहिजे हा व्हिट्मन्चा आग्रह असला, तरी तो आजवर काव्यविषय कां झाला नाहीं याचेंहि कारण व्हिट्मन् यास चांगलें अवगत आहे. अब्राहाम लिंकन याचें " The Government of the people, by the people, for the people " हें प्रख्यात सूत्र राजकारणी पुढारी एकाद्या चुणचुणीत उखाण्या-प्रमाणें वापरतात. पण त्यांतील 'People' शब्दानें लिंकनसारख्याच्या अंतःकरणांत उभें राहणारें चित्र त्याच्या काळीं तरी फारच थोड्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहत असेल ! आणि राजकारणांत मतें मिळविण्याकरितां अगर वाङ्मयांत 'आधुनिक' ठरण्याकरितां तो महामंत्र डोळे मिटून वापरणारांचीच संख्या अधिक ! डोळे उघडून होणाऱ्या व्यवहारांत, राजे, राण्या, शेठ, सावकार यांच्यासारख्या गर्भश्रीमंतांच्या सहवासांत जें माधुर्य अनुभवास येतें तें ग्राम्य निर्धनांच्या सहवासांत कोठून येणार ? व्हिट्मन् म्हणतो : राजेरजवाड्यांच्या पापाचरणांत आणि हलकटपणांतहि एक प्रकारची रोशनाई असते ! एक प्रकारचें Glamour असतें ! पण बिचाऱ्या बहुजनसमाजाचें माल वाक्यरचनेपासून तें केशरचनेपर्यंत सर्वच अशुद्ध आणि घाणेरडें !

सर्वसामान्य सुशिक्षिताची भावना ही वरील प्रकारची असते. पण म्हणून सामान्य जनसमूहाचें म्हणून एक वेगळें सौंदर्य नाहीं, असें कसें होईल ? मात्र तें पाहण्यास " कलावन्ताचें दुर्लभ विश्वसंचारी आणि अनन्तानें उजळलेलें " असें मनच हवें असतें. (" The people ! Like our huge earth itself, which, to the ordinary scansion, is full of vulgar contradictions and offence, man, viewed in the lump, displeases, and is a constant puzzle and affront to the merely educated classes. The rare cosmical, artist-mind, lit with the Infinite, alone confronts his manifold and oceanic qualities—"
— 'Vistas, p. 314)

## आदर्श नागरिकाचें उत्स्फूर्त स्तोत्र

आपल्याला व्हिट्मन्चें लोकशाहीचें स्वप्न समजावून घ्यायचें असेल, तर व्हिट्मन् हा मुळांत

काय होता तें समजावून घेतलें पाहिजे. व्हिट्मन् ‘ राष्ट्रवादी ’ होता कीं आंतरराष्ट्रीयतावादी होता, लोकशाहीवादी होता कीं अध्यात्मवादी होता ? व्हिट्मन् याच्या गद्यलिखाणांत, ‘ डेमॉक्रॅटिक व्हिस्टाज् ’ या प्रबंधास जेवढें महत्त्व आहे तेवढेंच ‘ लीव्हज् ऑफ ग्रास् ’ या काव्यग्रंथाच्या सुविख्यात व सुविस्तृत प्रस्तावनेस आहे. ही प्रस्तावना म्हणजे जणूं एखाद्या अर्वाचीन ऋषीनें एका बैठकींत, अखंड वाणीनें गायिलेलें आधुनिक उपनिषदच आहे, असें म्हटलें तरी चालेल ! व्हिट्मन्च्या मुक्तछंदात्मक काव्यांत अनेक जागीं रटाळ गद्यप्राय भाग आढळतो. त्या मानानें उलट त्याच्या काव्यसंग्रहाची प्रस्तावनाच अधिक काव्यमय आहे, असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. अर्वाचीन पाश्चात्य गद्यांत नीत्शे आणि इमर्सन् या दोघांच्या गद्याइतकें उत्स्फूर्त गद्य अन्य कोणाचें दाखविणें कठिण असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. पण ‘ लीव्हज् ऑफ् ग्रास् ’ या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत व्हिट्मन् यानें निर्मळ उत्स्फूर्ततेच्या बाबतींत या दोघां आधुनिक ऋषींनाहि मागें टाकलें आहे ! या प्रस्तावनेंत व्हिट्मन्नें रेखाटलेलें अमेरिकन मनुष्याचें चित्र आजच्या राष्ट्रीय हेव्यादाव्याच्या युगांत जर कोणीं उद्धृत केलें, तर तो अमेरिकेचा पक्षपातीच काय, पण आश्रिताहि गणला जाण्याचा संभव आहे ! पण ज्याला, ‘ एका राष्ट्रासंबंधींचें प्रेम म्हणजे दुसऱ्या राष्ट्रासंबंधींचा द्वेष ’ हें आधुनिक राजकीय समीकरण अन्तिम सत्य वाटत नसेल त्यानें व्हिट्मन्कृत अमेरिका-प्रशस्ति जरूर वाचावी ! आजच्या अमेरिकन नागरिकांचें वर्णन म्हणून रुचत नसेल तर निदान लोकशाहीच्या युगांतील आदर्श राष्ट्राचें आणि आदर्श नागरिकाचें स्तोत्र म्हणून तरी हें काव्यमय गद्य वाचण्यासारखें आहे :

“ Here is not merely a nation but a teeming nation of nations... The freshness and candour of their physiognomy–the picturesque looseness of their carriage–the fierceness of their roused resentment—their curiosity and welcome of novelty—the air they have of persons who never knew how it felt to stand in the presence of superiors–the terrible significance of their elections–These, too, are unrhymed poetry ... The United States themselves are essentially the greatest poems... ”[१]

व्हिट्मन्ची ही स्वजनप्रशस्ति वाचतांना तो केवळ राष्ट्रवादी नव्हता, तर विश्वबंधुत्ववादी आणि अध्यात्मवादी होता, हें लक्षांत घेतलें पाहिजे. त्याची जाणीव व्यापक आणि सर्वसंग्राहक झालेली असल्यानें त्याला ( ब्रिटिश ज्ञानकोशानें म्हटल्याप्रमाणें ) विसंगत विधानांची भीति वाटेनाशी झाली होती ! ( “ Such large perception freed him from the dread of inconsistency”–Encyclo.Britannica). जो व्हिट्मन् स्वजातिबांधवांचें एवढें काव्यमय स्तवन करतो, तोच ‘ डेमॉक्रॅटिक् व्हिस्टाज् ’ मध्यें समकालीन समाजाच्या नैतिक आणि सांस्कृतिक अवनतीचेंहि चित्र पुढीलप्रमाणें काढतो : “आणि आज तरी, सभोंवारचा कल्पनातीत थिल्लरपणा, पक्षोपपक्षांतील जळफळाट, बेइमानी, पहिल्या दर्जाच्या नेत्यांचें आत्यंतिक दुर्भिक्ष आणि या सर्वांच्या भरीला सामान्य लोकसमूहांत आढळणारा बेसुमार क्षुद्रपणा आणि ग्राम्यपणा आणि त्याच्याहि भरीला प्रतिवर्षीं अधिकाधिक भीषण होणारा मजुरांचा प्रश्न, या सर्व आपत्तिचक्रांतून अमेरिका बाहेर पडणार तरी कशी ? ” (Vistas—p. 355. गोषवारा )

**नवमानवाचा ‘ मानदंड ’**

विश्वाच्या बुडाशीं असलेल्या अन्तिम सत्यावर,

---

१ येथें मूळांतील काव्यमयतेचा नव्हे, तर व्हिट्मन्च्या अमेरिकन् स्वभावासंबंधींच्या कल्पनेचा नमुना देण्याचा उद्देश असल्यानें, अवतरण तुटक घेतलें आहे. शेवटचें वाक्य तर क्रम सोडून मागचें पुढें घेतलें आहे.

सौंदर्यावर, शहाणपणावर आणि निरामयतेवर व्हिट्मन्‌चा दृढ विश्वास होता ! आधुनिक विज्ञानानें तो विश्वास डळमळीत होण्याऐवजीं दृढमूल व्हायला हवा असा त्याचा आग्रह होता. आजच्या जगांतील राहणी अत्यंत कृत्रिम आणि जडवादी आहे. आजचा मानवी विकास म्हणजे केवळ मेंदूचा केलेला विकास होय. आज दारिद्र्यामुळेंहि मनुष्याची अवनति होत आहे आणि संपत्तीनेंहि अवनतीलाच हातभार लागत आहे. आज मानवी सद्गुणांचे उच्च आदर्शच नाहींत. अशा शेंकडों कुप्रवृत्ती आहेत कीं ज्या सहज मारून टाकतां येतील, पण ज्या आज मात्र जणूं एक सांचाच्या ओतीव लोखंडी पिल्या निर्माण करीत आहेत ! या सर्व केवळ बुद्धिवादी आणि केवळ देहवादी प्रवृत्तींना जर तितक्याच प्रबळ अध्यात्मवादी प्रवृत्तींनीं टक्कर दिली नाहीं, तर आधुनिक संस्कृति नाश पावेल, असा त्यानें स्पष्ट इशारा दिला आहे ( Vistas-p. 357. गोषवारा).

आज नव्या पौरुषाचा नमुना हवा आहे, नवा मानव हवा आहे, नवा पुरुष, नवी स्त्री हवी आहे, असा त्याचा आक्रोश होता. केवळ अमेरिकन मानवच नव्हे, तर सर्व जगतांतील आधुनिक मानव लोकशाहीच्या मार्गानें विकासाची आणि पूर्णत्वाची वाट चालत आहे, असा त्याचा विश्वास होता. हा नवमानव होत आहे तरी कोणत्या स्वरूपाचा ? " अभिमानी, उद्धत, न्यायप्रिय, सहिष्णु, स्नेहाळु, स्त्रीला समान योग्यतेची मानणारा, प्रगतिप्रिय असूनहि भौतिक प्रगति म्हणजेच अन्तिम ध्येय मानणाऱ्या विचारसरणीचा धिक्कार करणारा " असा मानव आज निर्माण होत आहे, हा व्हिट्मन् याचा विश्वास होता.

हा मानव अमेरिकेंत वावरत आहे असें त्याला श्रद्धेच्या आणि प्रसन्नतेच्या क्षणीं दिसे ! तर उलट निराशेच्या क्षणीं त्याला अमेरिकेचें भवितव्य तरी काय, असाहि प्रश्न पडे ! अमेरिकेंत व्हिट्मन्‌च्या कसोटीला उतरण्यासारखीं माणसें किती आहेत, या प्रश्नापेक्षांहि, माझ्या मतें, अमेरिकेसारख्या बालराष्ट्रानें नवमानवाचा एक ' मानदंड ' निर्माण केला, या गोष्टीला अधिक महत्त्व आहे. अमेरिकेंत तरी खऱ्या ' अमेरिकनां 'ची संख्या किती आहे हा मनोरंजक प्रश्नहि कांहीं अमेरिकाभिमान्यांनीं चर्चिला आहे आणि अस्सल अमेरिकन म्हणवून घेणें किती कठिण आहे, तें मोठ्या अभिमानानें कथन केलें आहे. " The Democracy of Mark Twain " या मथळ्याखालीं मार्क ट्वेनसंबंधीं लिहिणाऱ्या एका टीकाकारानें या बाबतींतील अमेरिकन अभिमान पुढीलप्रमाणें व्यक्त केला आहे: (लेखनकाल १९१०)-

" अमेरिकेंतील दहा कोटि लोकांना आम्ही ' अमेरिकन ' गणतों, अशी कोणाची कल्पना असेल तर ती चूक आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, आमच्यांतील ( अस्सल ) अमेरिकनांची संख्या आम्ही हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच मानतों ! नुसता कायदेशीर अमेरिकन नागरिक होण्याला काय ?–अमेरिकेंत जन्म घेतला म्हणजे बस् ! परंतु खरा ' अमेरिकन् ' होण्याला कांहीं वेगळेच गुण लागतात ! " असें म्हणून पुढें लेखकानें प्रत्यक्ष अमेरिकन् राष्ट्राचा जनक वॉशिंग्टन् हाहि या कसोटीला उतरत नाहीं कारण " He lacked a certain indispensable tang ![२] " असें म्हटलें आहे !

### धुंद, कलंदर वृत्ति

व्हिट्मन्‌च्या मानवी आदर्शांच्या वर्णनांतहि धाडसीपणा, बेफिकीरपणा, बेदरकारपणा या गुणांना जणूं आध्यात्मिक महत्त्व प्राप्त झालेलें दिसेल. आपल्या विख्यात प्रस्तावनेंत तो लिहितो : ".... to speak in literature with the perfect insouciance[३] of the movement of animals...is the flawless triumph of art ". तसेंच " लीव्हज् ऑफ ग्रास " मधील एका धुंद कलंदरवृत्तीच्या कवितेंत तो म्हणतो :

---

२ Tang म्हणजे झणझणीतपणा, खणखणीतपणा.

३ Insouciance या फ्रेंच शब्दाचा अर्थ carelessness, thoughtlessness असा आहे.

" One hour to madness and joy !
O furious ! O confine me not.
. . .
O to speed, where there is space
enough and air enough at last !
. . .
To find a new non-chalance with
the best of Nature !
To have the gag removed from one's
mouth !
To have the feeling, to-day or any
day.
—I am sufficient as I am "४
. . .

### आधुनिक मानवाचा शाहीर

आजच्या जगांत लोकशाही आणि कम्यूनिझम असे दोन तट पडले आहेत आणि या दोन तटांतील कोणत्या तटाकडे जावें, असा प्रश्न जगांतील दुय्यम राष्ट्रांपुढें उभा आहे. तात्पुरती राजकीय सोय म्हणून अमेरिकेशीं अगर रशियाशीं घरोबा करणें वेगळें; पण या दोन बलाढ्य राष्ट्रांपैकीं कोणतें राष्ट्र आज उच्चतर ध्येय साध्य करीत आहे, असा स्वतःच्या मनाशीं विचार करतांना, आपलीं स्वतःचीं मूल्यें निश्चित हवींत. कोणताहि धर्म, अगर कोणतेंहि राज्य बरें कीं वाईट, हें ठरविण्याची अखेर कसोटी म्हणजे त्या राज्यांत अगर धर्मांत कोणत्या नमुन्याचा मनुष्य तयार होतो हीच आहे. आणि त्याच्याहि आधींची कसोटी म्हणजे कोणत्या नमुन्याचा मानव त्या राज्याच्या प्रवर्तकांनीं डोळ्यासमोर ' आदर्श ' म्हणून ठेवला आहे, ही होय. यंत्रयुगांतील कार्यक्षमता संपादल्यानंतरहि, ज्यानें सात्त्विकता, सौजन्य, प्रसन्नता, आस्तिक्यबुद्धि यासारखे दैवी गुण गमावले नाहींत, असा मनुष्य व्हिट्मन्ला हवा होता, हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून थोडेंफार स्पष्ट झालें असेल अशी समजूत आहे. व्हिट्मन् हा ' आधुनिक मानवा 'चा शाहीर आहे, सामान्य आणि सामुदायिक मानवाचा शाहीर आहे. आणि तो मानव निर्भय, सरळ, प्रेमळ, ' आधुनिक ' दृष्टीचा आणि तरी सश्रद्ध असा पाहिजे, असा त्याचा संदेश आहे. उत्पादन, यंत्र-साहित्य आणि शास्त्रीय ज्ञान यांतील निव्वळ ' प्र-गति ', अंधपणें पुढें जाणें, हें त्याला पुरेसें वाटत नाहीं. तो केवळ प्रगतीचा भोक्ता नाहीं, तर मुक्ततेचा, श्रद्धेचा आणि मानवी सौहार्दाचा भोक्ता आहे. पण हीं सात्त्विक मूल्यें कायदेबाजी, घटनाबाजी आणि संस्थाबाजी (' mere institutionalism ') यांतून निष्पन्न होणें शक्य नाहीं, हा त्याचा आणखी एक महत्त्वाचा सिद्धान्त आहे. साध्यासुध्या माणसांतील ईश्वरदत्त चांगुलपणा आणि ईश्वरी योजनेंतील मांगल्य यांचा घरोघर, रानोरान, पानोपान, निःशंक अनुभव घेणारें आणि तो प्रामाणिकपणें जसाच्या तसा रंगवणारें ' वास्तववादी ' काव्य—यांच्याच द्वारें नव्या मानवाचा आणि आध्यात्मिक लोकशाहीचा उदय होईल अशी त्याची दुर्दम्य श्रद्धा होती.

या आधुनिक पण आध्यात्मिक अशा मानवतेचें आणि लोकशाहीचें पोषण, व्हिट्मन्ची अमेरिका करणार, कीं लेनिन्चा रशिया करणार, कीं गांधींचा हिंदुस्थान करणार—या प्रश्नाचें उत्तर राजकारणी लोकच देऊं शकतील ! तें प्रस्तुत लेखाच्या कक्षेबाहेर आहे. आदर्श ठरविणें हें मुख्य आहे; त्या आदर्शप्राप्तीकरितां, कोणत्या राजकीय गोटांत शिरावयाचें हा प्रश्न गौण आहे !

लोकशाहीचा व मानवतेचा एक स्फूर्तिदायक आदर्श आधुनिक जगापुढें ठेवण्याचें कार्य व्हिट्मन् यानें केलें आहे. आणि त्याला ती स्फूर्ति पुरविण्याचें कार्य ' युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका ' या अर्वाचीन इतिहासांतील विख्यात लोकशाहीनें केलें आहे, एवढें मात्र खरें.

---

४ या कवितेंतील बंधनातीत होण्याच्या ऊर्मींची तुलना माधव ज्यूलियन् यांच्या " तेथें चल राणी " मधील ऊर्मींशी करावीशी वाटेल. पण माधव ज्यूलियन् यांस समाजाचे तर राहोतच, पण पद्यरचनेचेहि कृत्रिम बंध तोडवत नसल्यानें त्यांची कविता व्हिट्मन्च्या या बेबंद ऊर्मींच्या मानानें दुर्बल वाटते.

प्रा. स. वा. कोगेकर

# लोकशाहींतील राज्यकारभार

## धोरण आणि त्याची अंमलबजावणी

भारतीय राज्यघटनेनें स्वीकारलेल्या लोकशाही पद्धतीच्या राज्यव्यवस्थेंत, सरकारचें धोरण ठरविण्याचें काम जनतेच्या प्रतिनिधींच्या सल्ल्यानें व्हावें, पण धोरणाची अंमलबजावणी करण्याचें काम सरकारी नोकरवर्गाकडून व्हावी, अशी तरतूद आहे. ब्रिटिश राज्यपद्धतींतहि अशीच व्यवस्था आहे. धोरण व त्याची अंमलबजावणी यांची फारकत करण्यामागें अशी विचारसरणी आहे कीं, जनतेच्या आशा-आकांक्षा आणि शक्ति यांच्या आधारावर धोरणाची उभारणी करावयाची असेल तर जनतेशीं समरस झालेल्या व जनतेचा विश्वास असलेल्या लोकप्रतिनिधींनाच तें कार्य योग्य प्रकारें पार पाडतां येईल. उलट, धोरणांची अंमलबजावणी करण्याचें कार्य राज्यकारभारांत मुरलेल्या व त्याचें तंत्र माहीत असलेल्या नोकरवर्गावर सोंपविल्यास तें कार्यक्षमतेनें पार पाडतां येईल. घर बांधतांना त्यांत खोल्या किती पाहिजेत, सोयी कोणत्या पाहिजेत, त्यासाठीं पैसा किती खर्च करण्याची तयारी आहे या गोष्टी मालकानें सांगावयाच्या असतात. पण त्यांना अनुसरून प्रत्यक्ष घर बांधण्याचें कार्य तज्ज्ञ कारागिरांवर सोंपवावें लागतें. अर्थात् कारागिरांच्या कसबावरहि विश्वास असावा लागतो आणि तो उत्पन्न व्हावा म्हणून त्यांच्या शिक्षणाची, चांचणीची वगैरे व्यवस्था केली जाते. कामाच्या प्रत्यक्ष अनुभवानेंच हा विश्वास बसत जातो. अनुभवानें कारागिरासहि आपल्या कामांत सुधारणा करतां येतात. कामाच्या निरनिराळ्या प्रकारांपैकीं कोणता प्रकार स्वीकारल्यास खर्च कमी होईल, कोणत्यामुळें कामांत सुबकपणा येईल इत्यादींची माहिती होते आणि मालकाच्या अपेक्षेप्रमाणें काम करून देणें सोंपें जातें. तोच प्रकार राज्यकारभारांतहि आहे.

राज्यकारभारांतील अंमलबजावणीचें कार्य त्याचें तंत्र आत्मसात् केलेल्या कायम नोकरवर्गाच्या हातीं ठेवण्याची कल्पना आपणांसहि मान्य असली, तरी प्रचलित परिस्थितींत या नोकरवर्गाविषयीं आपणांस पुरेसा विश्वास मात्र वाटत नाहीं. तसेंच हें कार्य करीत असतांना त्यांत ढवळाढवळ करून राज्यकारभारांतील निर्णय हे देखील त्यांतील तज्ज्ञांच्या हातीं न ठेवतां आपल्या सोयीनुसार फिरवून घेण्याचा प्रयत्न निरनिराळ्या व्यक्ती अगर संस्थांकडून होत असतो. या दोन्ही कारणांमुळें सरकारनें लोकप्रतिनिधींच्या सल्ल्यानुसार आंखलेल्या धोरणाची अंमलबजावणी योग्य प्रकारें होईलच अशी आपणांस खात्री वाटत नाहीं. कुंपणानें शेत खाऊन टाकावें त्याप्रमाणें एखाद्या नवीन धोरणाची अंमलबजावणी होतांना केवळ सरकारी नोकरवर्गांत वाढ होते, परंतु धोरणाप्रमाणें प्रत्यक्ष कार्य होत नाहीं, असा अनुभव येतो. घर बांधूं इच्छिणाऱ्या मालकाचा सारा पैसा कागदावर घराचे नकाशे काढण्यांतच खर्च व्हावा तसाच हा प्रकार वाटतो! त्यामुळें अर्थातच सरकारकडून करावयाच्या अपेक्षा फोल ठरतात आणि जनतेंत असंतोष माजतो. या असंतोषाचें खापर कित्येक वेळां लोकशाही राज्यपद्धतीवर फोडलें जातें आणि उद्वेगानें 'या पद्धतीपेक्षां एकतंत्री हुकुमशाही परवडली' असें लोक म्हणूं लागतात. परंतु हुकुम-

शाही आली म्हणजे जादूची कांडी फिरून एकदम नालायक लोक लायक, स्वार्थी लोक निःस्वार्थी, हलगर्जी नोकर कार्यक्षम असे थोडेच होणार आहेत! तेव्हां राज्ययंत्र सुधारण्यासाठीं अन्य मार्ग शोधून काढले पाहिजेत म्हणजे लोकशाही पद्धतीच्या चौकटींतहि कार्यक्षमतेनें कारभार चालू शकेल.

## ब्रिटिश अमदानींतील विचारसरणी

आपल्या देशांतील राज्ययंत्राबद्दल विचार करतांना ब्रिटिश अंमलाखालीं तयार करण्यांत आलेल्या नोकरशाहीचा वारसा आपणांकडे आलेला आहे, ही गोष्ट दृष्टीआड करतां येत नाहीं. त्या वेळच्या राज्यपद्धतीला 'नोकरशाही' या नांवानें ओळखीत असत ही गोष्ट देखील लक्षांत घेण्यासारखी आहे. लोकशाहींत ज्याप्रमाणें लोकांच्या हातीं राज्यसत्ता असते त्याप्रमाणेंच ब्रिटिश अमदानींत सरकारी नोकरांच्या हातीं राज्यसत्ता होती असें म्हटलें तरी चालेल. म्हणजेच आज जो सरकारी धोरण आणि धोरणाची अंमलबजावणी असा फरक आपण करतों आणि त्यांची जबाबदारी अनुक्रमें लोकप्रतिनिधी आणि नोकरवर्ग यांवर आहे असें म्हणतों, तसा फरक त्या वेळीं करण्याचें कारण नव्हतें. धोरण ठरविण्याचें कार्यहि सरकारी नोकरांवरच होतें. कारण लोकांच्या प्रातिनिधिक संस्थांना तो अधिकार नव्हता. नांवाला नोकर, पण प्रत्यक्षांत मालक अशी त्यांची स्थिति होती. जोंपर्यंत वरच्या अधिकाऱ्याची अवकृपा होत नाहीं तोंपर्यंत प्रत्येक नोकराला सारें रान मोकळें होतें. नोकराची कार्यक्षमता तो वरच्या अधिकाऱ्याला कितपत खूष ठेवतो यावरच अवलंबून होती. जनतेच्या हिताच्या दृष्टीनें त्याच्या कामाचें मोजमाप होत नसे; आणि जरी झालें तरी वरच्या अधिकाऱ्यानें ठरविलेलें तें जनतेचें हित, जनतेच्या प्रतिनिधींनीं ठरविलेलें जनतेचें हित नव्हे, ही गोष्ट निर्विवाद होती.

तसेंच, पूर्वीच्या अमदानींत आणखीहि एक गोष्ट महत्त्वाची होती. ती म्हणजे सरकारी धोरणाची दिशा. आज सरकारकडून ज्या लोककल्याणाच्या अपेक्षा करण्यांत येतात त्यांच्या एक शतांशानें देखील पूर्वीच्या 'मायबाप' सरकारकडून केल्या जात नसत. कारण उघड आहे. ब्रिटिश राज्यव्यवस्थेचा मुख्य रोख देशांत शांतता राखणें, तत्संबंधीं कायद्यांची अंमलबजावणी करणें व सरकारचा करभार वसूल करणें, एवढ्यावरच होता. आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत ढवळाढवळ न करण्याचें व्रतच सरकारनें घेतलें होतें. आणि राजकीय क्षेत्रांत सरकारविरोधी घटनांवर आणि व्यक्तींवर कठोरपणें शस्त्र चालवून त्यांच्या हालचालींना आळा घालण्याचें सत्र चालू होतें. त्यामुळें नोकरवर्गाकडून या सरकारी धोरणाचा पाठपुरावा झाला म्हणजे काम झालें अशी विचारसरणी रूढ होती.

## नोकरवर्गाच्या पुनर्घटनेची जरूरी

अशा जमान्यांत वाढलेला नोकरवर्ग स्वराज्याच्या बाल्यावस्थेंत आपल्याला लाभल्यामुळें राज्यकारभारांत एक प्रकारचें शैथिल्य आढळून आल्यास नवल नाहीं. कारण ब्रिटिश अमदानींत ज्या 'गुणां'ना धन्यवाद मिळत ते गुण नव्या लोकशाही जमान्यांत दुर्गुणांत जमा झाले! तसेंच, कामाचा बोजा एकदम वाढला आणि त्या कामाचें स्वरूप इतकें विविध झालें कीं, पूर्वीच्या जमान्यांत नांवारूपाला आलेले अधिकारीहि नव्या जबाबदाऱ्या पेलण्यास असमर्थ ठरूं लागले. लोकशाही पद्धतींत धोरण आणि अंमलबजावणी यांतील करावयाची फारकतहि अंगवळणीं पडलेली नसल्यामुळें, नव्या परिस्थितीशीं मानसिक जुळवणी करणें त्यांस कठिण झालें. त्यांतच नव्या राज्यकर्त्यांच्या अननुभवाची भर पडली. धोरण ठरविण्याच्या क्षेत्राबाहेर अंमलबजावणीच्या कामांतहि हस्तक्षेप करण्याच्या मोहाला बळी पडून राज्यकर्त्यांनीं नोकरवर्गांतील अंतर्गत शिस्त व पद्धतशीरपणा यांना एक प्रकारें सुरुंग लावला. मंत्र्यापासून तों थेट तालुका कॉंग्रेस कमिटीच्या सभासदापर्यंत सर्वचजण स्वतःला राज्यकर्ते समजून नोकरवर्गावर हुकमत चालवूं पाहावयास लागले. त्यामुळें सारें राज्ययंत्रच खिळखिळें झालें. त्यांत सरकारी धोरणांतील धरसोडीमुळें अधिकच गोंधळ निर्माण झाला. शिवाय युद्धजन्य हालाखीच्या पण आर्थिक तेजीच्या काळांतील काळाबाजार, लांचलुचपत वगैरे वाढत्या समाजद्रोही प्रवृत्तींची छाप इतरां-

प्रमाणेंच सरकारी नोकरवर्गावरहि पडली असल्यास नवल नाहीं. या सर्व कारणांमुळें आपल्या राज्यकारभाराची पुनर्घटना करून नव्या परिस्थिती । जुळेल असा नोकरवर्ग निर्माण करण्याची आवश्यकत। विचारवंतांस पटूं लागली आहे.

## मूलभूत मूल्यांवर मतैक्य पाहिजे

लोकहिताचें कोणतेंहि धोरण प्रभावी व्हावयाचें म्हणजे त्याकरितां राज्यकर्ते, जनता आणि नोकरवर्ग या सर्वांचें सहकार्य आवश्यक असतें. स्वराज्यांत ही गोष्ट साध्य होणें पूर्वीइतकें कठिण नाहीं हें जरी खरें असलें, तरी ही केवळ गृहीत गोष्ट धरूनहि चालणार नाहीं. ज्या वेळीं सरकारी धोरणाविषयीं जनतेंत तीव्र मतभेद असतील व ते तात्पुरतेहि बाजूस ठेवणें अशक्य असेल, त्या वेळीं जनतेचें किंवा जनतेपैकीं एका गटाचें तरी सहकार्य मिळविणें सरकारला अशक्य होईल. हे मतभेद फारच तीव्र असतील व सरकारविरोधी गटांत वजनदार पुढारी व संघटनेचा जोर असेल, तर सरकारशीं प्रत्यक्ष असहकार पुकारून, विवाद्य धोरणाचा पाठपुरावा पुढें चालू ठेवूं नये असे प्रयत्न होतील. या परिस्थितींत सरकारी नोकरांचा सरकारी धोरणावर कितपत विश्वास आहे हा प्रश्नहि महत्त्वाचा ठरतो. कारण तो जर नसेल, तर सरकारी धोरण अत्यंत शिथिलपणें अंमलांत आणण्यांत येऊन त्याची धार किंवा परिणाम अपेक्षेप्रमाणें टिकणार नाहीं. सरकारी नोकरांनीं केवळ हुकुमांची अंमलबजावणी करावयाची, त्यांवर टीका किंवा चर्चा करावयाची नाहीं, ही गोष्ट बोलणें सोपें असलें तरी लोकशाहीच्या काळांत कितपत व्यवहार्य ठरेल हा प्रश्नच आहे. सरकारी नोकरांनाहि मतदानाचा हक्क असतो व त्यांच्याहि कांहीं राजकीय सहानुभूती असणारच. ब्रिटिश अमदानींत वरिष्ठ नोकरवर्गांत गोऱ्या लोकांचा भरणा बराच होता व धोरण ठरविण्याची जबाबदारी त्यांच्यावरच मुख्यतः असल्यामुळें हा प्रश्न विशेष महत्त्वाचा ठरला नाहीं. परंतु आतां त्या प्रश्नाला बरेंच महत्त्व आहे. किंबहुना आतां असें म्हणतां येईल कीं, समाजांतील सर्वच क्षेत्रांत कार्य करणाऱ्या लोकांत कांहीं मूलभूत मूल्यांवर जर एकमत नसेल, तर राज्यकारभार हें समाजकल्याणाचें परिणामकारक असें साधन होऊंच शकणार नाहीं. विशेषतः आपल्यासारख्या देशांत, कीं जेथें सामाजिक प्रगतीचा मुख्य भार सरकारी यंत्रणेनें उचलण्याची गरज आहे, तेथें सरकारी धोरणाशीं जनता व नोकरवर्ग जितके अधिक समरस होतील तितकें त्यांचें सहकार्य अधिक मिळून, धोरणाचीं उद्दिष्टें साध्य होण्यास मदत होईल. रशिया, चीन वगैरे कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालील देशांत सर्वेकच अशा एकाच सामाजिक तत्त्वज्ञानाचा पगडा सर्वत्र बसल्यामुळें व तें तत्त्वज्ञान प्रत्येक क्षेत्रांत आचरणांत आणण्याची जबाबदारी सर्वव्यापी अशा कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनीं उचलल्यामुळें हें सहकार्य हमखास मिळूं शकतें. तीच गोष्ट लोकशाही पद्धतींत उपलब्ध व्हावयाची म्हणजे विरोधी पक्षीयांची वृत्ति देखील 'अधिकारारूढ पक्षाला जनतेनें आपला विश्वासाचा कौल दिला असल्यामुळें, आपलें धोरण अंमलांत आणण्याचा त्याला रास्त अधिकार आहे व त्या धोरणास तात्त्विक विरोध असला तरी प्रत्यक्षांत त्यांत अडथळा आणणें उचित नाहीं' अशा विचाराची असली पाहिजे. तशी परिस्थिति नसतां मूलभूत मूल्यांबद्दलच जेव्हां तीव्र मतभेद अस्तित्वांत असतील तेव्हां सरकारी धोरणामुळें कोणताहि प्रभावी कार्यक्रम यशस्वी होईल, अशी आशा करतां यावयाची नाहीं. भाऊबंदकीच्या वातावरणांत दिसणारी बेदिली देशाच्या राजकारणांत व कारभारांत उत्पन्न होऊन सर्वत्र विकलतेची छाया व आत्यंतिक विचारसरणी पसरण्यास मदत मात्र होईल. ब्रिटिश लोकशाहींत अशा तऱ्हेनें मूलभूत मतभेद विकोपास गेले आहेत असा देखावा अलीकडच्या काळांत दिसला नाहीं. त्यामुळें विशिष्ट सरकारी धोरण त्या त्या वेळीं प्रभावीपणें अंमलांत आणलें गेलें व त्याच सरकारी नोकरांनीं परस्परविरोधी धोरणांचा त्या त्या वेळीं पाठपुरावा केला. नाहीं म्हणावयास मजूर-सरकार पहिल्यानें जेव्हां अधिकारावर आलें तेव्हां जुन्या नोकरवर्गाचीं मूल्यें आणि नव्या राज्यकर्त्यांचीं मूल्यें यांतील फरक स्पष्टपणें दिसून आला व मजूर सरकारच्या धोरणास नोकरवर्गाकडून साहाय्य मिळण्याऐवजीं त्याच्या मार्गांत अडथळेच आणले

गेले. वरिष्ठ नोकरवर्गाची निवड समाजांतील विवक्षित थरांतूनच केली जाईल अशी प्रचलित व्यवस्था बदलून, निवडीचें क्षेत्र विस्तृत करण्याचा इलाज अंमलांत आणल्यानंतर ही स्थिति पालटली.

### राजकीय जीवनांतील अस्थिरता

आपल्या देशांत आज समाजाला स्थैर्य प्राप्त झालेलें नाहीं. विशिष्ट मूल्यांबद्दल सार्वत्रिक ऐकमत्य प्रस्थापित झालेलें नाहीं. लोकशाही पद्धतींतील ' बहुमतावरील विश्वास ' आपल्याकडे अजून निर्माण झाला नाहीं. अशा परिस्थितींत सरकारी धोरणाची परिणामकारकता केवळ नोकरवर्गाच्या सहकार्यावर व कार्यक्षमतेवरच अवलंबून आहे असें म्हणतां येत नाहीं. ज्या संयमानें ब्रिटिश राजकारणांतील सरकारविरोधी पक्ष व संस्था कार्य करीत असतात, उद्यां आपल्यावर सरकारची जबाबदारी घेण्याची पाळी येईल त्या वेळीं आपल्या आजच्या वक्तव्यांचा व कृत्यांचा आपल्याच विरुद्ध उपयोग केला जाऊं नये म्हणून जी ते काळजी घेतात, ती काळजी व तसा संयम आपल्याकडील सरकारविरोधकांत आज दिसून येत नाहीं. त्यामुळें विशिष्ट सरकारी धोरणाबद्दलच्या नापसंतीचें रूपान्तर सरकारच्या सर्वच कार्याविषयीं असंतोष निर्माण करण्यांत होतें. जुन्या ब्रिटिश सरकारविरुद्ध अशा प्रकारें असंतोष निर्माण करणें ही सर्वमान्य प्रवृत्ति होती. पण तीच गोष्ट आजहि चालू राहिल्यामुळें आपलें राजकीय जीवन पुष्कळच अस्थिर झालेलें आहे. ब्रिटिश अमदानींत दडपून राहिलेल्या प्रवृत्ती आतां कोठें तोंड वर काढूं लागल्या आहेत व त्यामुळें अशा तऱ्हेची अस्थिरता क्रमप्राप्तच आहे असें तिचें समर्थन करतां आलें, तरी या परिस्थितींत राज्यकारभारावर अनिष्ट परिणाम होणेंहि अपरिहार्य आहे, ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाहीं. म्हणूनच राज्यकारभाराचा विचार करतांना केवळ नोकरवर्गावर लक्ष केंद्रित करून भागणार नाहीं, सभोंवतालच्या परिस्थितीचेंहि परिशीलन केलें पाहिजे, असें म्हणणें योग्य ठरतें.

हळूहळू हें वातावरण निवळून राज्याला स्थैर्य प्राप्त होईल असें गृहीत धरून नोकर-वर्गाच्या कार्याविषयीं अधिक विचार करतां येईल. सरकारचें धोरण स्पष्ट झालें, जनतेच्या सहकार्याची खात्री असली म्हणजे तशा परिस्थितींत तें धोरण प्रत्यक्ष अंमलांत आणण्याची जबाबदारी नोकरवर्गावर पडणार हें उघड आहे. ही जबाबदारी पार पाडण्यासाठीं नोकरवर्गाला आपल्या कार्याबद्दल विश्वास वाटला पाहिजे. सरकारी धोरणाचें लोण प्रत्यक्ष परिणामाच्या स्वरूपांत जनतेपर्यंत पोंचविण्याचें हें कार्य आहे. त्यांत कार्यक्षमता, काटकसर, न्यायतत्परता इत्यादि गुणांची आवश्यकता असते. तसेंच, लाखों लोकांच्या जीवनावर परिणाम करणारें हें कार्य असल्यामुळें तें करतांना जनतेच्या हिताची पायमल्ली करून स्वतःचा बडेजाव वाढविण्याकडे प्रवृत्ति नसली पाहिजे. अशा तऱ्हेचे कर्तव्यदक्ष अधिकारी नोकरवर्गांत असतील तरच जनतेच्या पैशाचा व पाठिंब्याचा मोबदला मिळूं शकेल.

### नोकरवर्ग जनतेचाहि हस्तक

ब्रिटिश राजवटीनें जो वारसा आपल्याकडे दिला आहे त्यांत मुलकी राज्यकारभाराची धुरा मुख्यतः जिल्हाधिकाऱ्याकडे दिलेली दिसते. जिल्हानिहाय राज्यकारभार हा येथील शासनपद्धतीचा मध्यबिंदु आहे. पूर्वीच्या जमान्यांत सरकारचा प्रतिनिधि व जनतेचा सरकारशीं संबंध आणणारा दुवा अशा दोन्ही स्वरूपांत जिल्हाधिकारी म्हणजे एक जबरदस्त अधिकाराचा व प्रतिष्ठेचा अधिकारी असे. जमिनीचा सारा वसूल : करणें व तीवरील हक्क-वहिवाट यांची व्यवस्था पाहणें, तसेंच राज्याचा बंदोबस्त करून शांतता राखणें हीं दोन मुख्य कामें या अधिकाऱ्याकडे दिलेलीं होतीं. ब्रिटिश सरकारच्या येथील धोरणांत या कामांना सर्वांत अधिक महत्त्व असल्यामुळें तें करणाऱ्या अधिकाऱ्याचें महत्त्वहि अर्थात् पुष्कळच होतें. जिल्ह्यांतील इतर सर्व खात्यांच्या अधिकाऱ्यांपेक्षां त्याची सत्ता व दर्जा हीं अधिक मानलीं जात व इतर खात्यांत चाललेल्या कामाची माहिती त्याला वारंवार देण्यांत येई. तसेंच इतर खात्याच्या कामासंबंधीं सूचना करण्याचा अधिकारहि जिल्हाधिकाऱ्यास असे. हे जिल्हाधिकारी व त्यांच्यावरील मुलकी अधिकारी ब्रिटिश सरकारची पोलादी चौकट म्हणून समजल्या जाणाऱ्या

आय्. सी. एस्.मधील अधिकारी असत. त्यांत गोऱ्या लोकांचा भरणा बराच असे. जे हिंदी लोक या नोकरवर्गात समाविष्ट केले जात त्यांचें नोकरीपूर्व शिक्षणहि ब्रिटिश विद्यापीठांतून कमी-अधिक काल होत असे. सर्वतोपरी साहेबासारखें वागण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असे व त्यांजकडून अपेक्षाहि तशीच केली जाई. ब्रिटिश सरकारचें मुलकी राज्ययंत्र चालविण्याची जबाबदारी आय्. सी. एस्. मधील वरिष्ठ नोकरवर्गावर होती व ब्रिटिश अमदानींत त्यांनीं ती सरकारच्या इच्छेप्रमाणें पारहि पाडली. या नोकरवर्गात हुषार, कार्यक्षम आणि कर्तृत्ववान् अधिकाऱ्यांची एक परंपरा निर्माण होऊन कोठलेंहि राज्यविषयक काम त्यांजकडून करून घेतां येईल अशी सरकारला खात्री वाटत होती. अर्थात् अगदीं थोडे अपवाद सोडल्यास या अधिकाऱ्यांचा जनतेशीं येणारा संबंध केवळ अधिकारी म्हणून येत असे व परकीय सरकारचे ते अधिकारी असल्यामुळें त्यांच्याबद्दल जनतेंत एक प्रकारची भीति निर्माण झाली होती. सामाजिक दृष्ट्या ते हिंदी जनतेपासून नेहमीच चार पावलें दूर राहिले. अर्थात् जनतेच्या आशा-आकांक्षांशीं समरस होण्याचें तर नांव नको! ही वृत्ति त्यांच्या हाताखालच्या सरकारी नोकरांतहि पसरली व जनता आणि सरकार यांत वेळोवेळीं होणाऱ्या झगड्यांमुळें त्यांच्याबद्दल सामान्य जनतेस कधींच आत्मीयता वाटूं शकली नाहीं. पण ब्रिटिश राजवट जनतेच्या दृष्टीनें जुलमी व नकारात्मक असल्यामुळें, या विरोधाचा परिणाम प्रत्यक्ष राज्यकारभारावर फारसा होऊं शकला नाहीं.

परंतु आजच्या बदललेल्या परिस्थितींत सरकार हें जनतेचें हस्तक झाल्यानें व नोकरशाहीऐवजीं जनतेच्या प्रतिनिधींच्या हातीं राज्याची सत्ता आल्यानें सरकारी राज्ययंत्र हें जनतेच्या कल्याणाचें एक साधन झालेलें आहे. त्यामुळेंच जनतेच्या आशा-आकांक्षांशीं समरस झाल्याशिवाय राज्यकारभाराची जबाबदारी वाहणाऱ्या नोकरवर्गास आपलें कार्य यशस्वी रीतीनें करतां येणार नाहीं. जबाबदारी वाहण्यास प्रचलित नोकरवर्ग कितपत समर्थ आहे असा प्रश्न साहजिकच पुढें येतो.

कारभाराविषयक मूल्यांचा विचार केल्यास पूर्वींच्या जमान्यांतील जनतेशीं फटकून वागण्याच्या कल्पना या नव्या काळांत खचितच उपयोगी पडणार नाहींत याची नोकरवर्गाला जाणीव पाहिजे. धोरण ठरविण्याची, त्याचप्रमाणें सरकार-दरबारीं जनतेचीं गाऱ्हाणीं पुढें मांडण्याचीं कामें आतां नोकरवर्गाकडे राहिलीं नसून लोकप्रतिनिधींकडे आलेलीं आहेत, ही गोष्टहि त्यांना समजली पाहिजे. त्याचप्रमाणें सरकारी कामकाजाचें नकारात्मक स्वरूप जाऊन त्याची जागा विधायक जनहितोपयोगी कार्यांनीं घेतलेली आहे ही गोष्टहि विसरतां कामा नये. या कार्यांत जनतेच्या सहकार्याची अत्यंत आवश्यकता असल्यामुळें तें सहकार्य मिळविण्यासाठीं जनतेशीं अधिकाऱ्यांचा अधिक जवळचा संबंध प्रस्थापित झाला पाहिजे हेंहि तितकेंच आवश्यक आहे. हीं नवीं मूल्यें नोकरवर्गाच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. विशेषतः नवीन कामावर घेतलेल्या नोकरांस त्यांच्या शिकाऊ कालांत या मूल्यांची महती पटेल अशी व्यवस्था केली पाहिजे.

## अनिष्ट प्रवृत्तींवर मूलगामी उपाय

पण त्याचबरोबर 'सरकारी नोकर हे आमचे गुलाम झाले' या भावनेनें जनतेच्या नेत्यांनीं आपल्या राजकीय सामर्थ्याचा उपयोग त्यांच्या दैनंदिन कामांत ढवळाढवळ करण्यांत करतां कामा नये. तसें झाल्यास अंमलबजावणींत ढिलाई व वशिलेबाजी निर्माण होते व शेवटीं जनतेची कुचंबणा होते. लोकशाहीच्या कालांतहि राज्ययंत्राच्या निःपक्षपातीपणाबद्दल जनतेंत विश्वास असणें आवश्यक आहे ही गोष्ट लोकप्रतिनिधींनीं ध्यानांत ठेवली पाहिजे. परंतु सरकारी नोकरवर्गात ज्याप्रमाणें पूर्वींचीं टाकाऊ मूल्यें अजूनहि वास करीत असलेलीं दिसतात, त्याचप्रमाणें नव्यानें अधिकारपदावर आलेल्या लोकनेत्यांना सरकारी नोकरांवर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें दडपण आणून आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करण्याचा मोह आवरत नाहीं असेंहि दिसून येतें. या दोन्ही प्रवृत्ती ज्या प्रमाणांत नियंत्रित केल्या जातील त्या प्रमाणांत लोकशाही यशस्वी होण्याची शक्यता वाढणार आहे.

सरकारी नोकरांवर राजकारणी पुरुषांकडून जसें



अनुक्रमणिका






दडपण येतें तसेंच लांचलुचपतीच्या प्रकारानेंहि राज्यकारभाराला अनिष्ट वळण लागल्याच्या तक्रारी सर्वत्र ऐकूं येतात. हा प्रश्न फारच व्यापक असून त्याचीं पाळेंमुळें आपल्या आजच्या समाजव्यवस्थेंत व नैतिक प्रकृतींत खोलवर सांपडतील. व्यक्तिगत अर्थव्यवस्थेची पकड आपल्या नैतिक मूल्यांवर इतक्या विकृत रीतीनें बसलेली दिसते कीं, स्वतःच्या फायद्यासाठीं कोणताहि बरावाईट मार्ग अवलंबिला तरी त्याची क्षिति नाहीं, अशी आपली वृत्ति बनलेली आहे. त्यांत कोणीं कोणाला दोष लावावा अशी अवस्था आहे! व्यक्तिगत मूल्यांची जागा सामाजिक मूल्यांनीं घेतल्याशिवाय ही अवस्था बदलेल असें दिसत नाहीं. कांहीं अंशीं कडक शासन हा लांचलुचपतीवर उपाय होऊं शकेल. परंतु या रोगाचें पूर्ण निर्मूलन करावयाचें तर व्यक्तिगत अर्थव्यवस्थेवर व तिच्या मूल्यांवर प्रहार करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण त्या दिशेनें प्रयत्न करावयाचा म्हणजे प्रथम सामाजिक मूल्यांबद्दल जनतेंत शिक्षणाच्या द्वारा प्रसार झाला पाहिजे. आर्थिक दृष्ट्या निकृष्ट असलेल्या समाजांत, व्यक्तिवादी अर्थव्यवस्थेच्या चौकटींत लांचलुचपत न झाली तरच नवल! त्यांतून आपल्या समाजांतील अंतर्गत विस्कळितपणामुळें लहानसहान फायद्यासाठीं इतरांवर होणाऱ्या परिणामाचा विचार न करतां अधिकाराचा उपयोग करण्याकडे कल अधिक दिसून येतो. समाजांतील वेगवेगळे गट एकाच सामाजिक ध्येयानें प्रेरित होऊन जेव्हां कार्यप्रवण होतील, त्या वेळीं लांचलुचपतीचा धोका खचितच कमी होईल. प्राप्त परिस्थितींत मात्र या रोगावर तत्काळ लागू पडणारा रामबाण उपाय असा कोणताच दिसत नाहीं.

## परप्रदेशांतला अधिकारी?

लांचलुचपतीला आळा बसेल म्हणून नव्हे, तर सरकारी अधिकाऱ्यांत निःपक्षपाती वृत्ति यावी यासाठीं वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या नेमणुका करतांना धोरण म्हणून एका प्रदेशांतला माणूस दुसऱ्या प्रांतांत नेमल्यास बरें अशी एक सूचना करण्यांत येते. पण तिचा जरा खोलांत जाऊन विचार केल्यास तींत दोन प्रमुख दोष दिसून येतील. समजा, बंगाली अधिकारी महाराष्ट्रांत नेमला गेला, तर भाषाभिन्नत्व, परंपरा व चालीरीती यांच्या वैचित्र्यामुळें जनतेशीं समरस होऊन काम करणें त्यास कितपत शक्य होईल याचा विचार करावा लागेल. परकेपणामुळें त्याच्याबद्दल जनतेलाहि पूर्णपणें विश्वास वाटेल असें नाहीं. पूर्वींच्या जमान्यांत जनतेशीं घनिष्ठ संबंध असणें हें एक अवगुणाचें सदर ठरत असल्यामुळें ही गोष्ट तितकीशी जड जात नसे. पण आतां हें कितपत जमेल? दुसरें असें कीं, आपआपल्या प्रांतांतील अधिकारी निश्चितपणें पक्षपाती वृत्तीनें वागतील आणि परप्रांतांतील मात्र वागणार नाहींत असें कशावरून म्हणतां येईल? राज्यकारभारांतून जनतेचें कांहीं भलें होणार अशी ज्याची श्रद्धा आहे व हें भलें करण्याच्या संधीचा पुरेपुर उपयोग करून घेऊन कीर्ति संपादन करण्याची ज्याला उमेद आहे, तो आपल्या समाजांतील कार्य अधिक आत्मीयतेनें आणि अभिमानानें करील. या गुणांचा फायदा सरकारनें कां घेऊं नये? तेव्हां अशा तऱ्हेनें सरसकट एका प्रांतांतल्या अधिकाऱ्यांची अन्य प्रांतांत नेमणुक करण्याची पद्धति इष्ट आहे असें वाटत नाहीं.

पण या प्रकारचे मुद्दे केवळ तपशिलाचे आहेत. मूलभूत मुद्दा समाजाच्या स्थैर्याचा आहे आणि तें स्थैर्य जोंपर्यंत लाभत नाहीं तोंपर्यंत केवळ राज्यकारभारांत सुधारणा करून आपल्यापुढील प्रश्न सुटणार नाहींत. याला असें उत्तर देतां येईल कीं, समाजाला स्थैर्य आणण्यासाठीं ज्या जनहितोपयोगी गोष्टी करणें इष्ट आहे त्यासाठींच राज्यकारभारांत सुधारणा होणें आवश्यक आहे. पण जनतेच्या पाठिंब्याशिवाय कोणतेंहि राज्ययंत्र सुरळितपणें व कार्यक्षमतेनें चालणें शक्य नसल्यामुळें व तसा उत्साह आजच्या राज्यकर्त्यांनीं आंखलेल्या धोरणाबद्दल फारसा दिसत नसल्यामुळें आजची अस्थिरता निर्माण झाली असें दिसतें; व तसें असेल तर या अस्थिरतेंतून मार्ग काढण्याच्या कार्यालाच अग्रस्थान दिलें पाहिजे.

श्री. मानवेन्द्रनाथ रॉय

# भारतांतील लोकशाहीचें भवितव्य

राजकीय स्वातंत्र्याप्रीत्यर्थ दीर्घकालीन लढ्यानंतर आपल्या देशांत एक स्वतंत्र आणि प्रभुत्व-संपन्न गणराज्य प्रस्थापित झालें आहे. आपल्या प्रजासत्ताक राज्याची घटना ही दिसायला तरी लोकशाही घटना म्हणजे प्रातिनिधिक 'पार्लमेंटरी' राज्यघटना आहे. कोणतीहि राज्यघटना पूर्ण निर्दोष अशी नसतेच. कांहीं विचक्षण लोकांना आपल्या या राज्यघटनेंत कांहीं दोष दिसतात, तर इतर कांहीं विशिष्ट प्रवृत्तीचे लोक राज्यघटनेंतील कांहीं ढोबळ दोषांकडेहि डोळेझांक करून 'आपली राज्यघटना उत्कृष्ट आहे' असें म्हणतात. तें कांहींहि असो. आतां आपली राज्यघटना देशांत 'प्रस्थापित कायदा' म्हणून झालेली, सिद्ध अशी घटना असून, तिच्यांत बदल होऊन ती अधिक चांगली होणें हें नजीकच्या भविष्यकालांत तरी शक्य दिसत नाहीं. म्हणून आहे ती राज्यघटना गृहीत धरूनच, खऱ्या लोकशाहींत अभिप्रेत असलेलें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यास ती आपणांस सहायभूत होणार आहे कीं नाहीं, हाच निकष लावून पाहण्याचा प्रस्तुत लेखांत प्रयत्न केला आहे.

## कागदावरील घटना व प्रत्यक्ष व्यवहार

चांगली राज्यघटना कागदावर लिहून काढणें केव्हांहि सोंपेंच असतें. कांहीं थोडे कायदे-पंडित –ज्यांना राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांतील मूलभूत ध्येयें मान्य आहेत–एकत्र बसून राज्यघटनायंत्राची एक उत्कृष्ट कागदी करकरीत योजना ( Blue-print ) तेव्हांच तयार करूं शकतात. पण राज्यघटना प्रत्यक्ष व्यवहारांत आणून दाखविणेंच फार दुष्कर असतें. कारण त्याला इतर गोष्टींची आवश्यकता असते. राज्यघटनेबाबत अत्यंत सोपा असा जो भाग–म्हणजे चांगली योजना कशी असते ती लिहून दाखविणें–तो आपल्या घटनेच्या बाबतींत पूर्ण झाला आहे. दिसायला चांगली अशी घटना कागदावर लिहिली गेली असून ती रीतसर मंजूरहि झाली आहे. आतां त्यापुढील जो अत्यंत कठिण भाग–म्हणजे तिची अंमलबजावणी करणें–तो अजून पार पडावयाचा आहे. पण तो पार पाडण्याच्या बाबतींत मात्र शक्य तेवढी कसोशी टाळायची, अडचणींना बगल द्यायची प्रवृत्ति दिसून येत आहे.

राज्यघटनेच्या बाबतींत असा एक सर्वसाधारण समज दिसून येतो कीं, एक सरकारी राज्ययंत्र तयार केलें आणि लोकशाही राज्याचे परंपरागत गणले गेलेले असे कांहीं तांत्रिक संकेत वा धोरणें पाळलीं कीं राज्यघटनेविषयींचें आपलें कर्तव्य संपलें ! आपल्या भारतीय प्रजासत्ताकाच्या घटनेंत हें सरकारी यंत्र तयार करण्यावर बराच भर दिलेला आहे. राज्यघटनाशास्त्राच्या दृष्टीनें पाहतां हा आपल्या घटनेचा एक दोष आहे. राज्यघटना म्हणजे देशाचा मूलभूत कायदा होय. त्यांत, राज्यांत कायदे कसे असावेत, सरकारवर नियंत्रण कसें ठेवावें या बाबतींत कांहीं तत्त्वें ग्रथित केलेलीं असतात. भारतीय राज्यघटनेंत कांहीं मूलभूत तत्त्वें–आणि कांहीं ठिकाणीं संदिग्ध अशीं–ग्रथित

---

'नवभारतां'करितां लेखकानें मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे—का. सं.

केलीं असलीं, तरी त्यांतून कांहीं आक्षेपार्ह गोष्टी—विशेषतः नागरिकस्वातंत्र्याबाबत—आढळून येतात. आपली राज्यघटना पृष्ठसंख्येनें जगांतील राज्यघटनांत सर्वांत मोठी आहे. पण त्यांतील मूलभूत हक्कांसंबंधींचें प्रकरण अगदींच लहान आहे ! शिवाय, त्या प्रकरणांतहि कायद्याची कीस काढणारी अशी कांहीं किचकट परिभाषा ( jargon ) वापरली आहे कीं, सामान्य नागरिकाला त्यांतून कांहीं बोध होणेंच शक्य नाहीं ! राज्यघटनेंतील कायद्याच्या किचकट पारिभाषिक शब्दांच्या रानांत मूलभूत हक्क आणि इतर मौलिक तत्त्वें लोपून जातात.

घटनेंत दिलेल्या सत्तेचा दुरुपयोग होऊं नये म्हणून घटनाशास्त्र-पंडितांची नेहमींची युक्ति म्हणजे घटनेमध्यें अशीं कांहीं परस्पर शह देणारीं कलमें ( checks and balances ) घालून ठेवावयाचीं कीं, ज्या योगानें सत्ता नियंत्रित व समतोल राहील अशी तरतूद व्हावी. अशी तरतूद करतांना, घटनापंडितांनीं ही घटना लोकशाही पद्धतीनें अंमलांत न येतां त्या घटनेंतील सत्तेचा दुरुपयोग होणार, असा एक प्रकारें घटना राबविणाऱ्यांच्या प्रामाणिकपणाविषयींचा संशय गृहीतच धरलेला असतो. घटनेमध्यें सूचित होणाऱ्या या संशयाकुल भावनेंतच लोकशाहीच्या भवितव्याला गर्भित धोका आहे.

## जनता हें पक्षाच्या हातांतील बाहुलें !

' लोकांची जशी लायकी असेल तसें त्यांना सरकार मिळत असतें ' अशी जी एक म्हण आहे तींत बरेंच तथ्य आहे. पार्लमेंटरी लोकशाही पद्धतीप्रमाणें, घटनेनुसार जें सरकार प्रस्थापित होतें त्याच्यावर सत्तारूढ पक्षाचें नियंत्रण असतें. त्या सत्तारूढ पक्षावर जर लोकांची शेवटीं खरी सत्ता असेल तरच लोकशाही राज्यघटना खरीखुरी अंमलांत येऊं शकते. परंतु आज अशी वस्तुस्थिति आहे कीं, जो सत्तारूढ पक्ष आज ' जनतेचे आपण प्रतिनिधि आहोंत ' असा दावा करीत आहे, त्या पक्षाला आपल्या काबूंत ठेवावयाची कुवत बहुसंख्य जनतेंत बिल्कुल नाहीं. खरी लोकशाही किंवा लोकराज्य म्हणजे लोकांनीं आपल्या प्रतिनिधींकरवीं (government of the people and by the people ) चालविलेलें राज्य, ही लोकशाहीची व्याख्या जर खरी करावयाची असेल, तर केवळ कितीहि कार्यक्षम राज्ययंत्रानें किंवा नुसता लोकशाहीचा जप तोंडानें जपणाऱ्या सत्तारूढ पक्षामुळें खरी लोकशाही प्रस्थापित होण्याची शाश्वती नाहीं.

## लोकशाहीचें वैचारिक अधिष्ठान

राजकीय लोकशाही प्रस्थापित होणें आणि समाज विचारस्वातंत्र्यसंपन्न असणें हें शेवटीं त्या त्या लोकांच्या मनोवृत्तीवर अवलंबून असतें. लोकांची मनोवृत्तीहि त्या त्या विशिष्ट काळच्या सांस्कृतिक परंपरांनीं बनविलेली असते. लोकशाहीच्या राजकीय आणि सामाजिक तत्त्वांचें मूळ स्फूर्तिस्थान मानवतावाद ( Humanism ) या तत्त्वज्ञानांत आहे. जगांतील घटना आणि मानवाचें भवितव्य यांवर परमेश्वरी नियति किंवा दैवी सत्ता यांचें अधिराज्य आहे या जुन्या परंपरागत विचारसरणीला सुरुंग लावून ती जमीनदोस्त करण्याचें कार्य मानवतावादानें केलें आहे. मनुष्य आपल्या भाग्याचा स्वतःच विधाता आहे, मानवी जीवन हाच एक सर्वोच्च परात्पर पुरुषार्थ आहे, सर्व गोष्टींचा मानदण्ड शेवटीं मानवच असून जगांतील सर्व मूल्यांचा निकष मानवताच होय, असें मानवतावादाचें प्रतिपादन आहे. जगांत अगदीं अनादिकालापासून सर्व जुन्या समाजांतून अशी समजूत किंवा श्रद्धा होती कीं, मानवी जीवन हें अतिमानवी शक्तीनें किंवा ईश्वरी इच्छेनें नियंत्रित आहे. अर्थात् अशी लोकांची श्रद्धा बनण्यास त्या वेळची परिस्थितीहि कारणीभूत होती. या अतिमानवी शक्तिविषयक श्रद्धेचा मानवी इतिहासावर इतका पगडा बसला कीं, त्या योगानें जगांतील प्रत्येक गोष्ट मानवी बुद्धीच्या पलीकडे असलेल्या एका गूढ शक्तीनें प्रेरित आहे असें मानलें जाऊन, मानवाचें जीवन म्हणजे कायमची गुलामगिरी होऊन बसली ! या मानवाच्या गुलामगिरीचा अध्यात्मवाद्यांकडून इतका उदोउदो झाला कीं, ही गुलामगिरी मरणोत्तर मोक्षाची आवश्यक पूर्वावस्था गणली गेली ! या परंपरागत मानसिक गुलामगिरीविरुद्ध मानवतावादानें बंड उभारलें व त्यांतूनच लोकशाही जीवनदृष्टीचा जन्म झाला.

मानव हाच सर्वश्रेष्ठ साध्य होय, त्याला कोणत्याहि अतिमानवी वा अतिभौतिक साध्याचें साधन बनविणें म्हणजे त्याला त्याच्या उच्च पदावरून खालीं ओढणें होय. मानवाला श्रेष्ठत्व अर्पिणारा हा विचार लोकशाहीचें खरें अधिष्ठान आहे.

याच मानवतावादापासून मानवाचें स्वातंत्र्य मान्य करणाऱ्या राजकीय आणि सामाजिक शास्त्रीय उपपत्ती जन्माला आल्या. मानवी प्रगतीचा उगम मानवाच्या बुद्धींतून झाला असल्यामुळें जगांतील प्रत्येक वस्तु मानवनिर्मित आहे, या सिद्धान्ताला साहजिकच प्रामुख्य आलें. या सिद्धांतापासून असा एक उपसिद्धान्त सिद्ध झाला कीं, जर कोणत्या राजकीय वा सामाजिक संस्था वा रूढी मानवाला उपकारक नसतील, तर त्या बदलण्याचा मानवाला हक्क आहे आणि त्या बदलण्याचें त्याच्या ठिकाणीं कर्तृत्वहि आहे. कांहीं मूठभर राजकारणीच नव्हेत, तर बहुसंख्य जनता जितक्या जितक्या प्रमाणांत मानवतावादी विचारसरणी स्वीकारील तितक्या तितक्या प्रमाणांत त्या देशाचें सांस्कृतिक वातावरण लोकशाहीच्या वाढीला अनुकूल होईल.

## भारतीय जनतेची मनोवृत्ति

दुर्दैवानें मानवतावादाला पोषक अशी मानसिक क्रांति हिंदुस्थानांत अजून घडून आलेली नाहीं. नाहीं म्हणायला कांहीं थोड्या व्यक्ती अंशतः वा संपूर्णपणें जुन्या चाकोरींतून बाहेर पडलेल्या आढळतील. पण सर्वसामान्यपणें आपल्या देशाची सांस्कृतिक परंपरा हुकुमशाहीला अनुकूल ( authoritarian ) आहे. भारतीय जनतेची अतिमानुष दैवी शक्तीवर श्रद्धा असून त्याचा साहजिकच तर्कशुद्ध परिणाम म्हणूनच कीं काय, इहलोकीं देखील हुकुमशहा मानण्याची प्रवृत्ति जनतेंत आढळून येते. राजकीय चळवळे कांहींहि म्हणोत, भारतीय इतिहासाचा निःपक्षपातीपणानें अभ्यास ज्यांनीं केला आहे अशांच्या मतें तरी, भारतीयांची मनोवृत्ति आहे अशीच राहिली तर, भारतांतील लोकशाहीचें भवितव्य उज्ज्वल नाहीं. राजकीय पुढारी आणि राजकीय पक्ष यांच्याकडून तर आपल्या भूतकालीन सांस्कृतिक वारश्याचे विलक्षण देव्हारे माजविले जातात. 'आमची ही संस्कृति म्हणजे आम्हां भारतीयांच्या आध्यात्मिक प्रतिभेचें साक्षात् दर्शन आहे' असें उद्घोषिलें जातें. परंतु खरी वस्तुस्थिति वर दिग्दर्शित केल्याप्रमाणें निराळीच आहे. ज्या लोकांची मनोवृत्ति ईश्वरप्रामाण्यवादी किंवा नियतिवादी आहे, ज्यांना मानवाचें स्वातंत्र्य आणि मानवाची सृजनशीलता यांची कल्पनाहि करवत नाहीं, त्यांना लोकशाही कधींच प्रस्थापित करतां येणार नाहीं. लोकशाहीच्या अपयशाचें कारण ह्या वस्तुनिष्ठ परिस्थितींत–लोकांच्या हुकुमशाहीप्रिय मनोवृत्तींत आहे. लोकशाही यशस्वी व्हायची तर ह्या लोकांच्या मनोवृत्तींत आमूलाग्र बदल झाला पाहिजे.

## पार्लमेंटरी लोकशाही

पाश्चात्य लोकशाहीच्या अनुभवावरून लोकशाहीला विघातक ठरलेली आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे. पाश्चात्यांनीं लोकशाहीच्या बाह्य तंत्रा-( form )ला प्राधान्य देऊन लोकशाहीला बाह्य तंत्राच्या ( formalization of democracy ) चौकटींत बंदिस्त करून टाकली. खरें म्हणजे, लोकशाहीमागील मूळ तात्त्विक प्रेरणा मानवी व्यक्ति ही स्वतंत्र आणि सर्वश्रेष्ठ वस्तु आहे अशी होती. पण पुढें कालौघांत निघालेल्या व प्रसृत झालेल्या राज्यशास्त्रविषयक उपपत्तींतून ही तत्त्वप्रेरणा केवळ कल्पनामात्र, अर्थवाद ( legal fiction ) राहिली आणि तत्त्वतः सर्वश्रेष्ठ मानल्या गेलेल्या व्यक्ती समाजयंत्राचे केवळ क्षुद्र अणुरूप घटक बनल्या ! पाश्चात्य तंत्रप्रधान लोकशाहीनें व्यक्तिविकासाला वाव उरूं दिला नाहीं. ज्याकरितां लोकशाही अस्तित्वांत आली तो तिचा मूळ हेतुच मागें पडून लोकशाही पराभूत झाली !

लोकशाहीला जें तांत्रिक स्वरूप ( formalization ) दिलें गेलें, त्यांतूनच पार्लमेंटरी लोकशाहीचा उदय झाला. पार्लमेंटरी लोकशाहीनें प्रातिनिधिक सत्ता स्थापन करून लोकशाहीला एक पर्याय निर्माण केला खरा; पण त्याबरोबर लोकशाहीला शहहि मिळाला ! पार्लमेंटरी प्रातिनिधिक सत्ता आणि लोकशाही या एकच होत अशी गल्लत राज्यशास्त्रविषयक प्रबंधांतून दिसत असली तरी ह्या दोन्ही

एक नव्हत, हें थोडयाहि विचाराअन्तीं समजून येईल. प्रातिनिधिक सत्ता म्हणजे लोकशाही नव्हे. लोकशाही विचाराला जी मूळ प्रेरणा मिळाली, ती युरोपमध्यें प्राचीन ग्रीसमधील नगरराज्यांच्या परंपरेंतून मिळाली. प्राचीन ग्रीसमधील नगरांतून समाज लहान असल्यामुळें 'प्रत्यक्ष लोकशाही' त्या वेळीं तेथें शक्य झाली. परंतु आधुनिक काळीं लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांना अगदीं भिन्न परिस्थितीला तोंड द्यावें लागलें आहे. प्राचीन छोट्या ग्रीक नगरराज्यांऐवजीं मोठमोठ्या लोकसंख्येचीं अति-विस्तीर्ण राज्यें स्थापन झालीं. त्यांतून 'प्रत्यक्ष लोकशाही' अव्यवहार्य, अपयशी ठरली. पण ही अव्यवहार्यता आणि अपयश अपरिहार्यच होतीं असें मात्र म्हणतां येत नाहीं. आधुनिक राज्यांतूनहि लोकशाही व्यवहार्य करून यशस्वी करतां आली असती; परंतु आधुनिक काळचे राजकीय लोकशाहीचे पुरस्कर्ते राज्यकारभाराच्या व्यावहारिक प्रश्नांनींच इतके पछाडले गेले कीं, ते आपल्या मूळ तात्त्विक भूमिकेपासून च्युत झाले. मूळ मानवी व्यक्ति ही स्वतंत्र आणि सर्वश्रेष्ठ (sovereign) आहे ह्या मूळ कल्पनेचा त्यांना विसर पडला आणि शेवटी त्यांनीं काल्पनिक समष्टीच्या अस्मितेचें तत्त्वज्ञान निर्माण करून व्यक्तीच्या अस्मितेला त्यांत अगदीं गौण स्थान दिलें !

प्राचीन काळीं सर्व नागरिकच बाजारपेठेंत चव्हाठ्यावर जमून सार्वजनिक गोष्टींवर विचारविनिमय करून कांहीं निर्णय घेत असत आणि म्हणून प्रत्यक्ष लोकशाही त्या वेळीं शक्य होती. पण ही गोष्ट आधुनिक काळीं शक्य नव्हती. या अशक्यतेंतूनच प्रतिनिधींना सत्तासंक्रमण (delegation) करण्याचें तत्त्व उदयास आलें. लोकांनीं आपले प्रतिनिधी निवडून द्यावयाचे व त्यांच्या हातीं आपल्या हातांतील सत्ता सुपूर्द करावयाची व त्या प्रतिनिधींनीं लोकांतर्फे म्हणून राज्य करावयाचें—या तत्त्वाच्या आधारावर म्हणजे मूळची प्रभावी जनसत्ता कांहीं प्रतिनिधींच्या हातीं संक्रमित करून पार्लमेंटरी पद्धति अस्तित्वांत आली. परंतु यामुळें लोकशाहीवर विपरीत परिणाम झाला. जी जनता खरें सत्तेचें मूळ आणि खरी सत्तासंपन्न तीच संपूर्णपणें असहाय आणि पंगु बनली. आपले प्रतिनिधी केव्हां तरी एकदां निवडून देणें एवढ्यापुरतीच सत्ता जनतेच्या हातांत उरली. पुन्हां निवडणूक होईपर्यंत या जनतारूपी नामधारी बादशहाला कोणीच विचारीनासें झालें. प्रतिनिधीच खरे सत्ताधीश बादशहा बनले ! अशा रीतीनें लोकांकरितां दुसऱ्या कोणी तरी प्रतिनिधि म्हणून राज्य करणें यालाच जर लोकशाही म्हणावयाचें असेल, तर इतिहासांतील कोणत्याहि कालखंडांतील कोणत्याहि प्रकारच्या सरकारला लोकशाही सरकार म्हणावें लागेल ! सगळेच राज्यकर्ते—मग ते कोणत्याहि काळांतील असोत वा कितीहि मोठे हुकुमशहा असोत—असाच दावा करीत आले आहेत कीं, आम्ही लोकांतर्फेच, लोकांच्याच हितासाठीं राज्य करीत आहोंत ! पार्लमेंटरी सरकार हें जर प्रत्यक्ष लोकांच्या ऐवजीं त्यांच्या प्रतिनिधींचें सरकार असेल, तर इतर प्रकारच्या शासनसंस्था आणि पार्लमेंटरी सरकार यांत फरक तो काय राहिला ?

## पक्षीय राजकारणाचा आखाडा

पार्लमेंटरी पद्धतीच्या प्रातिनिधिक सत्तासंक्रमणामुळें जनतेंतील प्रत्येक व्यक्ति अशा रीतीनें दुबळी व पंगु बनते. यांतूनच पुढें लोकांमध्यें कांहीं गट निर्माण होतात. हे गट स्वतःला राजकीय पक्ष म्हणवितात आणि सत्तेचें राजकारण लढूं लागतात. सत्तेकरितां चाललेल्या झोंबाझोंबीमुळें देशाचें राजकीय जीवन भ्रष्ट होऊन जातें. राजकीय पक्षपद्धति म्हणजे लोकशाहीचा गाभा समजण्याची वहिवाट आहे; पण लोकशाहीचें जर जास्तींत जास्त अनहित कोणीं केलें असेल तर तें पक्षपद्धतीनेंच ! या पक्षपद्धतीमुळेंच 'लोकशाही' म्हणजे 'लोकांना (थापा मारून) बनविणाऱ्यांची शाही' (democracy is reduced to demagogy) असें समीकरण झालें आहे. लोकांच्याच भावनांना आवाहन करून त्यांना चेतविणारा चळवळ्या वक्ता (demagogue) म्हणजे लोकशाहीचा मोठा पुरस्कर्ता (democrat) समजला जाऊं लागला ! 'आम्ही जर सत्तारूढ झालों तर

आमच्या कार्यक्रमानें सुधारणा किंवा क्रांति करून दाखवूं ' असें सर्वच पक्ष प्रतिपादन करतात. म्हणजे प्रत्येक पक्षाचें मुख्य उद्दिष्ट सत्ता काबीज करणें हें आहे. त्यामुळें पक्षीय राजकारण म्हणजे सत्ताबाजांचा आखाडा झाला आहे. पक्षाच्या कार्यक्रमावर विश्वास ठेवून जे लोक एखाद्या पक्षांत शिरतात त्यांच्या सद्हेतूंविषयीं शंका नाहीं. त्यांना खरोखरीं चांगलेंच करावयाची इच्छा असते. पण सत्तेच्या राजकारणाचा खेळ खेळतांना त्या खेळाचे नियम त्यांना पाळावेच लागतात ! आपल्या देशांतील सध्यांच्या वातावरणांत सत्तेकरितां चालू असलेल्या झगड्यामुळें आपली लोकशाही इतर देशांच्या मानानेंहि खालच्या पातळीवर जाणार हें नक्की. ' दर डोई मत ' या नियमाप्रमाणें डोकीं मोजण्याच्या खटाटोपाच्या भरीस पडलेली लोकशाही त्या मतदाराच्या डोक्यांत काय आहे, याची फिकीर करीत नाहीं, इतकी तिची अवनति झाली आहे ! जेथें मूळ डोकींच रिकामीं, तेथें जास्तींत जास्त मतें मिळालेल्या पक्षाजवळ जास्तींत जास्त अज्ञानाचेंच भांडवल असणार !

नुकताच आपणांस सार्वत्रिक निवडणुकींतील प्रौढमतदानाचा अनुभव येऊन गेला आहे. पुष्कळ ठिकाणीं तर मतें द्यायला निघालेले लोक जणूं देवळांत जायच्या तयारीनें निघाले होते ! त्यांनीं मतदानपेट्यांना मतपत्रिकेबरोबर अक्षता आणि फुलें वाहिलीं ! त्यांना असें पढवून ठेवलें होतें कीं, काँग्रेसला मत म्हणजे महात्म्याला मत ! साहजिकच चळवळ्या नेते मंडळींना लोकांच्या भोळ्या समजुती आणि धार्मिक अंधश्रद्धा यांना आवाहन करून सत्ता काबीज करायची संधि मिळाली.

काँग्रेस-पक्षाला तोंड देण्याकरितां एका पक्षापेक्षां अधिक पक्षांनीं प्रबळ संघटना कराव्यांत असा एक पर्याय सुचविला जातो. पण त्या योगानें परिस्थिति सुधारण्यासारखी नाहीं. उलट चळवळ्या पुढाऱ्यांचें त्यामुळें आयतेंच फावेल ! काँग्रेसला पराभूत करायचें तर काँग्रेस जशी जनतेच्या अंधश्रद्धा आणि अज्ञान आपल्या कामीं वापरण्याचा खेळ खेळते, त्याच खेळांत तिच्यावर मात करायची विरोधी पक्षांची तयारी पाहिजे. शिवाय, जोंपर्यंत बहुसंख्य जनतेची मनोवृत्ति वरून आलेला हुकूम मानण्याकडे झुकणारी म्हणजेच परप्रत्ययनेय आहे, तोंपर्यंत विरोधी पक्षहि कांहीं करूं शकणार नाहींत.

## तत्त्वज्ञानविषयक क्रांति आवश्यक

हिंदुस्थानांतील लोकशाहीचें भवितव्य निराशाजनक आहे. याची कारणमीमांसा करतांना येथील राजकारणी मुत्सद्दी दुष्ट प्रवृत्तीचे आहेत असें आम्हांला म्हणावयाचें नाहीं. निराशाजनक भवितव्याचें खरें कारण राजकीय पक्षपद्धतींत आहे, लोकशाही हें जें नुसतें एक बाह्य तंत्र झालें आहे त्यांत आहे. म्हणून ज्याला ज्याला लोकशाहीच्या भवितव्याची चिंता वाटते त्यानें त्यानें सुखासीनपणें दुसऱ्याला दोष द्यावयाची संवय टाकून दिली पाहिजे. लोकांच्या मनोवृत्तींत क्रांति घडवून आणण्याचें जें मूलभूत कार्य त्याला प्रत्येकानें निष्ठेनें वाहून घेतलें पाहिजे. ' आमच्या भवितव्याचे विधाते आम्हीच आहोंत ' अशी निष्ठा जेव्हां लोकांत निर्माण होऊन स्थिर होईल, तेव्हांच खऱ्या लोकशाहीचा भक्कम पाया उभारला जाईल. समाजाच्या राजकीय आणि सामाजिक जीवनांत जर बदल घडवून आणावयाचा असेल, तर त्याआधीं त्या समाजांतील व्यक्तींच्या तत्त्वज्ञानांत क्रांति ( philosophical revolution ) घडवून आणली पाहिजे. सर्व समाजाची मनोवृत्ति बदलायची म्हणजे ती एकदम उद्यांच बदलतां येत नाहीं, हें खरें. परंतु त्या दिशेनें प्रारंभ केव्हां तरी केलाच पाहिजे. ' अंधेनैव नीयमाना यथांधाः ' या कोंडींतून एकदां बाहेर पडलें पाहिजे ! हिंदुस्थानांतील बहुसंख्य जनतेभोंवतालचें वातावरण अंधश्रद्धा आणि भोळ्या निर्बुद्ध समजुती यांनीं भारलेलें आहे; कांहीं जण तर आधुनिक शिक्षणाच्या साहाय्यानें जुन्या धर्मभोळ्या श्रद्धांना बुद्धिवादी बैठक देण्याचाहि ( to rationalise ) प्रयत्न करीत आहेत. परंतु हें दूषित वातावरण शुद्ध करायचें असेल तर अधिकाधिक लोकांनीं अंधश्रद्धेची आणि विभूतिपूजेची परंपरा झुगारून देऊन सत्यसंशोधन, स्वावलंबन आणि स्वातंत्र्य यांची कांस धरली पाहिजे. खरा लोकशाही समाज

जर प्रस्थापित व्हावयाचा असेल, तर त्याकरितां मनुष्यानें आधीं आपल्या स्वतःवरील विश्वास निर्माण करून तो स्थिर केला पाहिजे.

अत्यंत प्रगत अशा युरोपीय देशांमधून वर वर्णन केलेली तत्त्वज्ञानविषयक क्रांति झाली असली, तरी तेथेंहि एका निराळ्याच कारणामुळें लोकशाही अंशतः तरी अपयशी ठरली आहे. तें कारण म्हणजे त्या देशांतून माणसांपेक्षां संस्थांना श्रेष्ठत्व आलें. संस्थाहि शेवटीं माणसानेंच निर्माण केल्या आहेत, याचा तेथें विसर पडला. जेथें माणसांनाच चांगलें राहतां येत नाहीं तेथें संस्था तरी यशस्वी कशा होणार ? 'आम्ही जन्मतःच स्वतंत्र नसलों तरी स्वतंत्र होण्याकरितां आम्ही जन्मलों आहोंत' अशा जाणिवेनें, स्वातंत्र्याच्या प्रेरणेनें जसजसे अधिकाधिक लोक प्रेरित होतील तसतशी लोकशाही यशस्वी होत जाईल. समाज विवेकशील असेल तरच लोकशाही नीट चालूं शकते. आणि विवेकवादाचें वातावरण निर्माण करायचें तर त्याकरितां अंधश्रद्धा टाकून देऊन सामाजिक आणि जीवनविषयक प्रश्नांचा विचार विवेकवादी भूमिकेवरून झाला पाहिजे.

भारतीय जनतेचा परंपरागत जीवनविषयक दृष्टिकोन नियतिवादी, कर्मवादी आहे. दैवी शक्तीवर तिचा विश्वास आहे. जुन्या अध्यात्मवादी विचारसरणीनें माणसाला पारलौकिक सुखाचें विलोभन दाखवून त्याच्या मनाला ऐहिक जीवनांतील नरकतुल्य असह्य परिस्थिति निमूटपणें सहन करावयाचें वळण लावलें. या विचारसरणीमुळें परलोकालाच प्राधान्य मिळालें, इहलोक त्यापुढें गौण ठरला ! साहजिकच, या विचारसरणीचा पगडा जोंपर्यंत माणसावर आहे तोंपर्यंत आपलें भवितव्य आपण स्वतः बनवावें हा विचार त्याच्या मनांत येणें शक्य नाहीं. ही मनोवृत्ति लोकशाहीला अत्यंत प्रतिकूल असून ती शक्य तितक्या लवकर बदलून टाकण्याचा लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांनीं चंग बांधला पाहिजे.

## जर्मनी आणि पाश्चात्त्य युरोप : वृत्तींतील फरक

जेथें जनतेची मूळ प्रवृत्ति हुकूमशाहीकडे झुकणारी असते, तेथें तांत्रिक ( formal ) लोकशाहीचें सर्वाधिकारी हुकूमशाहीमध्यें रूपान्तर होण्यास अनायासेंच सवड मिळते. समकालीन युरोपमध्यें अशा प्रकारचें प्रत्यक्ष उदाहरण आपल्या डोळ्यांसमोर घडून आलेलें आहे. जर्मन लोकांसारखे एवढे बुद्धिमान् सुशिक्षित लोक—पण ते सर्वाधिकारी हुकूमशाहीच्या तालावर मोठ्या हिरीरीनें कवायती पावलें टाकूं लागले ( fell into goose-step )! याउलट सर्वाधिकारशाहीच्या मोहिनीची इंग्लंडला भुरळ पडली नाहीं. हिट्लरनें पश्चिम युरोपवर आपला सर्वाधिकारी कबजा बसविण्याकरितां जंग जंग पछाडले, पण त्याला यश आलें नाहीं. हा जो विस्मयजनक फरक दिसून आला त्याचें कारण त्या त्या लोकांच्या मूळ मनोवृत्तींत आहे. जर्मनांची सर्वसाधारण बुद्धि व त्यांचें शिक्षणाचें प्रमाण जरी बऱ्याच वरच्या दर्जाचें असलें तरी त्यांची जी हुकूमशाहीला पोषक अशी 'जी-हुजूर' मध्ययुगीन मनोवृत्ति ती तशीच कायम राहिली. आपल्या राज्यसंस्थेबद्दल पराकाष्ठेचा पूज्यभाव जर्मनांच्या मनांत जो पहिल्यापासून बाणवला गेला त्यांतून ही मनोवृत्ति मूळ निर्माण झाली. याउलट, पश्चिम व उत्तर युरोपमधील देशांत जी तत्त्वज्ञानविषयक क्रान्ति घडून आली तिच्या योगानें तेथील लोकांची मध्ययुगीन मनोवृत्ति नष्ट होऊन त्यांच्यामध्यें वैयक्तिक स्वातंत्र्याची लालसा आणि लोकशाही जीवनसरणीबद्दल ओढ हीं उत्पन्न झालीं. सर्वसाधारण जर्मन नागरिकासमोर जर मोठ्यांत मोठें कोणतें ध्येय असेल तर तें सैन्यांतील शिपाई किंवा सरकारी अधिकारी होऊन त्यांतील लष्करी यांत्रिक शिस्ती-( regimentation )चा सूचक असा गणवेष घालणें हें होय. याउलट, पाश्चात्त्य युरोपमधील देशांतुन उदारमतवादानें आपल्या उदार व स्वतंत्र विचारसरणीनें राज्यसंस्थेच्या आवश्यकतेबद्दलच अविश्वास उत्पन्न केला व असें प्रतिपादन केलें कीं, ज्या शासनसंस्थेला कमींत कमी शासन करावें लागतें, तीच शासनसंस्था उत्तम होय. सर्वाधिकारशाहीला अनुकूल असलेल्या मनोवृत्तीच्या लोकांना साहजिकपणेंच असें वाटत असतें कीं, आपलें सर्व कांहीं करायला एखादा दयाळू परमेश्वर, एखादा सत्प्रवृत्त राज्यकर्ता किंवा एखादा प्रभावशाली सर्वाधिकारी असावा. अशा लोकांच्या नशिबीं स्वाभाविकपणेंच




अनुक्रमणिका






त्यांच्या पात्रतेप्रमाणेंच हुकूमशाही शासनसंस्था येत असते. म्हणूनच सर्वाधिकारी हुकुमशाहीला अनुकूल अशी जी मानसिक व सांस्कृतिक परिस्थिति, ती समूळ बदलल्याशिवाय लोकशाहीला तरणोपाय नाहीं. तोंपर्यंत सर्वाधिकारशाहीविरुद्ध कितीहि ओरड केली तरी तिचा कांहींहि उपयोग नाहीं. उलट, अशी ओरड करणारेच, संधि मिळाल्यावर, स्वतः हुकूमशहा बनतील. कारण त्यांना ज्या वातावरणांत काम करावयाचें तें हुकूमशाहीला पोषकच आहे.

### दुर्गम चढणीचा पण एकमेव मार्ग

राजकारणाच्या नित्य व्यवहारांत पडलेल्या राजकीय मुत्सद्द्यांना दूरदृष्टि नसते. मूलगामी विचारांचें त्यांना वावडें असतें. ते इतके अधीर असतात कीं, त्यांना आपलें ध्येय झटपट गांठावयाला अत्यंत जवळची वाट (short-cut) पाहिजे असते. सत्ता काबीज करायला जवळची वाट म्हणजे निवडणुकींच्या द्वारें मतदारांना बारेमाप आश्वासनें—तीं अंमलांत आणायचें मनांत नसतांनाहि—देत सुटणें ही होय. म्हणूनच आपल्या देशांतील लोकशाहीचें भवितव्य या राजकारणी लोकांवर सोंपवून चालणार नाहीं. जे राजकारणक्षेत्राच्या आज बाहेर आहेत किंवा ज्यांना राजकारणक्षेत्रांतून बाहेर पडायची दृष्टि आणि धैर्य आहे, अशा लोकांवर लोकशाहीच्या भवितव्याची जबाबदारी आहे. अशा राजकारणाच्या बाहेर काम करणाऱ्या लोकांचा मार्ग दुर्गम व चढणीचा आहे, एवढें मात्र खरें. पण व्यक्तिस्वातंत्र्यानें प्रेरित झालेल्या अशा पथिकांच्याच धैर्यावर, चिकाटीवर आणि निष्ठेवर लोकशाहीचें भवितव्य अवलंबून आहे.

राजकारणी लोक नाना घोषणा करतात. पण त्यांचाच त्या घोषणांवर विश्वास नसतो. निष्ठेच्या अभावीं त्यांच्या वांट्यास अपयश येणें हें अटळच आहे. 'आमच्या हातीं सत्ता असल्याशिवाय आम्ही तरी काय करणार?' असा बौद्धिक युक्तिवाद करून ते आपल्या निष्ठेच्या अभावाचें समर्थन करीत असतात. म्हणून राजकारणी लोकांचें नांवच सोडून दिलें पाहिजे. आपण जरी एकटें असलों, तरी स्वतंत्रपणेंच लोकशाहीला योग्य असें स्वातंत्र्यपूर्ण वातावरण तयार करण्याच्या कामाला निष्ठेनें लागलें पाहिजे. अर्थात् एकटा मनुष्य कोट्यवधि देशबांधवांना स्वतंत्र आणि विवेकशील कसा करूं शकणार? परंतु तो आपणां स्वतःला तरी मुक्त करून आपल्या भोंवतालच्या मित्रमंडळींना स्वतंत्र आणि विवेकी बनवूं शकेल. ही मित्रमंडळी त्यांच्या भोंवतालच्या लोकांनाहि तसेंच करूं शकतील. असेच एकाचे दहा, दहाचे शंभर, शंभराचे पांचशें-हजार होतील. स्वातंत्र्य आणि विवेक यांचें हें आंदोलन वाऱ्याप्रमाणें वेगानें पसरून समाजाला नवीन चैतन्य देईल. अशा ध्येयनिष्ठेनें जे काम करतील त्यांना लोकशाहीचा मार्ग खडकाळ व दुर्गम वाटणार नाहीं. आतांपर्यंत राजकारणी लोकांनीं लोकशाही-कडे जाणारे पुष्कळ 'जवळचे मार्ग' शोधून काढण्याचा प्रयत्न केला. पण ते मार्ग पुढें बंद तरी आहेत किंवा विनाशाकडेच नेणारे आहेत असें आढळून आलें आहे. नव-मानवतावादाचे विचार प्रसृत करून योग्य वातावरण निर्माण करणें हाच नवा एकमेव मार्ग आहे. आणि एकमेव मार्गच शेवटीं जवळचा मार्ग ठरतो.

---

## प्रवास

मला मुंबईहून टिंबक्टूला जावयाचें होतें. मीं त्याला सोपासा मार्ग विचारला, तेव्हां तो म्हणाला :

'मित्रा, तुला लंडनहून निघावयाचें असतें तर एक सरळ रस्ता मी सांगूं शकलों असतों; वॉशिंग्टन-हूनहि थोडासा दूरचा परंतु रुळत आलेला असा मार्ग मला माहीत आहे; मास्कोहूनहि भूमिगत सुयाराचा एक मार्ग खणलेला आहे, असें म्हणतात— '

परंतु मला तर मुंबईहूनच निघणें अपरिहार्य होतें. वरील कोणत्याहि मार्गानें जाण्याइतका वेळ मजजवळ नव्हता; तितकी माझी शिदोरीहि नव्हती—

आणि माझा मार्ग तो मला आंखून देऊं शकला नाहीं!

—देवदत्त दाभोलकर

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भारतीय समाजरचना व लोकशाही

### सामाजिक क्रांतीची आवश्यकता

वर्तमान हिंदी समाजरचना ज्या परंपरेवर उभारलेली आहे, ती परंपरा उच्चनीचभावाच्या तत्त्वावर व चालीरीतींच्या प्रामाण्यावर आधारलेली असल्यामुळें, स्वातंत्र्य व समता या तत्त्वांवर आधारलेल्या लोकशाहीचा ती आधार होऊं शकत नाहीं, असेंच कोणताहि लोकशाहीवर निष्ठा असलेला राज्यशास्त्रज्ञ म्हणेल. उच्चनीचभावाला जन्मसिद्ध स्वरूप आहे असें गृहीत धरणारी जातिभेदाची व्यवस्था हा या समाजसंस्थेचा मुख्य आकार आहे; त्यामुळें कोणताहि व्यवसाय बदलण्याचें व स्वीकारण्याचें व्यक्तिस्वातंत्र्य त्यांत आजपर्यंत नव्हतें. जातिभेदावर विश्वास असलेली प्रत्येक पृथक् जमात, परंपरेच्या बंधनांत व्यक्तीला जखडून ठेवणें, हा आजपर्यंत धर्म मानीत होती. राजसत्ता या देशांत हजारों वर्षें दृढमूल असल्यामुळें आज्ञाधारकता व स्वामिनिष्ठा या सद्‌गुणांस महत्त्व देण्याची प्रवृत्ति येथें प्राधान्यानें राहिली आहे. जन्मसिद्ध उच्चनीचभाव, आज्ञाधारकता आणि चालीरीतींचें किंवा रूढींचें प्रामाण्य यांचा मानसिक संस्कृतीच्या मूल्यांवर सर्वांगीण परिणाम झाला आहे. महाकाव्यें, नाटकें, धर्मश्रद्धा, विश्वरचनेचें तत्त्वज्ञान आणि इतर ललित कला यांच्यांत स्वतंत्र व्यक्तित्वाऐवजीं समर्पित व्यक्तित्व बनविणारींच मूल्यें अधिक भरभराटीस आलीं आहेत. कुटुंबांत पतिव्रताधर्म, व्यवहारांत स्वामिनिष्ठा, धर्मांत ईश्वरशरणता, तत्त्वज्ञानांत श्रद्धा, साहित्यांत वीरपूजा व स्थापत्यांत देवमंदिर यांची मुख्य प्रतिष्ठा मानली आहे. तात्पर्य, हिंदी समाजसंस्थेची सर्वांगीण घडण आतांपर्यंत ज्या तत्त्वांवर व मूल्यांवर झाली आहे, तीं तत्त्वें व मूल्यें लोकशाहीचीं मूलभूत तत्त्वें व मूल्यें नव्हत. म्हणून जुन्या परंपरेवर आधारलेली वर्तमान हिंदी समाजसंस्था आणि लोकशाही यांच्यांत सुसंगति असणें शक्य नाहीं. लोकशाहीच्या वाढीस अनुकूल अशा सामाजिक संस्था घडविण्याकरितां स्वातंत्र्य व समता या तत्त्वांना प्रामुख्य देणारी नवीच समाजरचना घडविणें हें लोकशाही ध्येयवाद्यांचें आद्यकर्तव्य ठरतें. लोकशाही ही केवळ राजकीय संस्था समजून समाजसंस्थेच्या इतर घटकांचें स्वरूप कसलेंहि असलें तरी चालेल, असें म्हणतां येणार नाहीं. राजकारणाशीं इतर सामाजिक जीवनक्रमाचा घनिष्ठ संबंध असतो. म्हणून नवें राजकारण ज्या तत्त्वांचें असतें त्याच तत्त्वांची प्रेरणा इतरहि सामाजिक संस्थांमध्यें भरलेली असणें अत्यन्त आवश्यक ठरतें. याकरितां लोकशाही राजकारणास भरभराट येण्याकरितां भारतांत सामाजिक क्रांतीची आवश्यकता मान्य करावी लागते. नाहीं तर लोकशाही राजकारणास पोषक अशा जीवनशक्तींचा पुरवठा कमी कमी होत जाऊन हिंदी लोकशाहीचें हें अशक्त व कोंवळें रोपटें खुरटून जाण्याची भीति यथार्थ ठरण्याचा संभव आहे.

भारतांत सामाजिक क्रांतीची आवश्यकता आहे, ही गोष्ट हिंदी राजकारणाचें मुख्य सूत्र म्हणून अंगीकारून परंपरागत हिंदी समाजरचनेची मीमांसा करतांना प्रथम ही गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे कीं, लोकशाहीस अनुकूल समाजक्रांति घडविणारी शक्ति भारतांत आहे काय? असल्यास ती शक्ति कोणती? याचें उत्तर एकच निघेल व तें म्हणजे अशी शक्ति भारतांत आहे व ती शक्ति म्हणजे स्वतः लोकच! कारण लोकशाहीची स्थापना आणि लोकशाही हक्कांची वाढ व जोपासना ही आत्मनिष्ठच असते; लोकशाहीच्या इतिहासाचें हेंच रहस्य आहे. मग यानंतर असा प्रश्न उपस्थित होतो कीं, उच्चनीचभाव, अंधश्रद्धा, आज्ञाधारकता, शब्दप्रामाण्य इत्यादि लोकस्वातंत्र्याशीं विरोधी







असलेल्या भावनांनाच जर येथील लोक वश आहेत, तर स्वतःच्या खोल भिनलेल्या भावनांचे बंध तोडून मूलगामी लोकशाहीस अनुकूल असें नवें सामाजिक जग ते कसें घडवूं शकतील ? लोकशाहीस आवश्यक असलेली सामाजिक क्रांति घडविणारी शक्ति लोकच होत, याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाहीं. परंतु लोक आपल्या अभिजात संस्कारांना डावलून नवी स्फूर्ति कशी धारण करूं शकतील ? याचें उत्तर मानवी स्वभावाची तात्विक समालोचनाच देऊं शकेल; अशा समालोचनेवर अधिष्ठित असलेलें इतिहासाचें तत्त्वज्ञानच या प्रश्नाचा उलगडा करूं शकेल. मानवस्वभावाची तात्त्विक समालोचना आणि इतिहासाचें तत्त्वज्ञान गृहीत धरून वर्तमान हिंदी समाजाच्या पूर्वपरंपरेचा अर्थ लक्षांत घेतला पाहिजे. स्वातंत्र्य व समता यांचा आधार या पूर्वपरंपरेंत जर सांपडला नाहीं किंवा हिंदी माणसाच्या ऐतिहासिक वृत्तामध्यें जर मानवी स्वातंत्र्याच्या मूलभूत प्रेरणेचा अभावच आहे असें ठरलें, तर हिंदी माणूस कधींच लोकशाहीस अनुकूल असलेली सामाजिक क्रांति करूं शकणार नाहीं ! सर्व सामाजिक प्रश्नांचा उलगडा मानवी स्वभावाच्या आधारानेंच करतां येतो आणि मानवी स्वभावाचा अर्थ इतिहासाच्या रूपानेंच व्यक्त होत असतो. हिंदी सामाजिक इतिहास यासंबंधीं काय निर्णय देतो, हें पाहिलें पाहिजे.

### स्वातंत्र्याची साधना हाच प्रगतीचा निकष

मानवी इतिहासाचेंच हिंदी इतिहास हें एक प्रत्यन्तर होय. मानवी इतिहासाचें गतिशास्त्र हिंदी इतिहासासहि लागू आहे. मानवी इतिहासाचें गतिशास्त्र असें सांगतें कीं, नैसर्गिक बंधनांतून मुक्त होण्याचा सतत प्रयत्न करणें हें मनुष्याचें जीवितकार्य आहे. व्यक्तींच्या ठायीं असलेल्या व्यक्तित्वाला उन्नत व प्रगल्भ करणाऱ्या शक्तींना बंधनमुक्तीची स्वाभाविक गरज आहे. व्यक्तित्वाचा अनंत विकास हेंच मानव्याचें वास्तविक स्वरूप व सार आहे. म्हणून स्वातंत्र्याची अव्याहत मागणी मानव्य करीत असतें. कितीहि पुरवठा केला तरी ही मागणी कधींहि संपणारी नाहीं. ही अग्नीची भूक आहे, हा वैश्वानर आहे. स्वातंत्र्यप्रेम व स्वातंत्र्याची साधना ह्या मानवी इतिहास घडविणाऱ्या प्रवृत्ती आहेत. इतिहास म्हणजे स्वातंत्र्यसाधनेच्या साफल्य-वैफल्याची वीररसानें वा करुणरसानें भरलेली विचित्र व बृहत् कथा होय !

सर्व सामाजिक संस्था व सामाजिक प्रथा या स्वातंत्र्यसाधनेचे मूर्तिमंत आविष्कार होत. गुलामगिरीची संस्था, राजसंस्था, बादशाही, हुकुमशाही इत्यादि संस्थासुद्धां स्वातंत्र्यसाधनेचींच प्रतीकें होत ! बंधन घालणाऱ्या नैसर्गिक शक्तींना पराभूत करण्यांत अपयश मिळविलेलें हें स्वातंत्र्य होय ! स्वातंत्र्याच्या साधनेंत विपर्यस्त साधनासुद्धां अंतर्भूत होते. स्वातंत्र्याची साधना करतां करतांच मनुष्य आपलीं बंधनेंहि घडवितो. तडजोड म्हणून हीं बंधनें तो घडवितो किंवा पतकरतो. अगोदर पदरांत पडलेला स्वातंत्र्याचा अंश राखण्याकरितां शरणागतीचें मूल्य माणसाला द्यावें लागलें आहे. गुलामहि तात्विक अर्थानें स्वतंत्रच असतो; कारण तो गुलामी नष्ट करूं शकतो. गुलामी नकोशी वाटल्यास आत्मयज्ञ करून तो ती नष्ट करूं शकतो. निदान आत्महत्येचें स्वातंत्र्य त्याच्यापासून हिरावून घेण्यास कोण समर्थ आहे ? मनुष्यास निवडीचें स्वातंत्र्य आहे.

याच तात्विक निकषावर मानवी समाजाचा इतिहास तपासतां येतो. निरनिराळीं राष्ट्रें सामाजिक दृष्ट्या प्रगत किंवा अप्रगत आहेत हें ठरविण्याचा हा निकष आहे. ज्या मानवी गटांना स्वातंत्र्याची साधना अधिक सफल झालेली दाखवितां येते ते अधिक प्रगत होत व कमी सफल झाली असें दिसतें ते अप्रगत होत, असें म्हणतां येतें. सामाजिक संघटना कोणतीहि व कोणत्याहि काळांतील असो, त्यांतील मानव्य आपलीं बंधनें छेदण्यांत गुंतलेलें सांपडतें. नैसर्गिक बंधनें तोडतांना घडलेल्या प्रमादांनीं नवीं बंधनें घडलीं जातात अथवा बंधनें तोडण्यांत यश येऊन स्वातंत्र्याचे आविष्कार असलेल्या संस्था निर्माण होतात; याचा तारतम्यपूर्ण आढावा घेणें हें शास्त्रीय इतिहासाचें कर्तव्य असतें. याच दृष्टीनें हिंदी समाजसंस्थेचा इतिहास सामाजिक क्रांतीकरितां तपासणें जरूर आहे.

हिंदी समाजाचा इतिहास या दृष्टीनें तपासला

असतां, मानवनिर्मित बंधनांच्या निदर्शक संस्थांच्या अंतरंगांत व आवर्तीभोंवतीं मानवी स्वातंत्र्याची साधना ही संथपणें व बिनबोभाट युगानुयुगें सुरू होती असें प्रतीत होतें. जातिभेदाची जन्मसिद्ध उच्चनीचता व राजसत्ता यांनाहि स्वातंत्र्याच्या आराधनेपुढें प्रणाम करूनच आपलें बस्तान ठेवतां आलें. श्रमविभागाचें तत्त्व आणि कलेची व विद्येची परंपरागत पिढीजाद सुरक्षितता यांच्या निमित्तानें जातिभेद स्थिरावला. समाजधारणेस आवश्यक असलेल्या मानमान्यतेच्या तारतम्याच्या मिषानें उच्चनीचभावाला जन्मसिद्ध मान्यता मिळवितां आली. समाजकंटकांचा बंदोबस्त आणि बेबंदशाहीचें निवारण या उद्देशाच्या देखाव्याखालीं राजसत्ता व बादशाही टिकाव धरूं शकली.

## ग्रामसंस्था हीच येथील राजकीय संस्था होती

राजसत्ता ही, येथील समाजसंस्थेंत, जोमदारपणानें समाजरचनेचें प्राणभूत अंग म्हणून वा प्रधान अवयव म्हणून कधींच नांदली नाहीं. राजसत्तेला निरंकुश हस्तक्षेप करण्याइतकी शक्ति व मान्यता हिंदी समाजानें केव्हांहि दिली नाहीं. येथील अधिक मूलभूत महत्त्वाची राजकीय संस्था एकच होती. ती म्हणजे स्वायत्त व स्वयंपूर्ण ग्रामसंस्था. येथें अनेक राजांकडून जेव्हां जेव्हां रणकंदनें होत, तेव्हां तेव्हां येथील ग्रामसंस्था केवळ प्रेक्षकांचें काम करीत. त्या राजांचे विजय व पराभव हे, ग्रामसंस्थांचे देवतोत्सव व यात्रा यांच्यामध्यें गावयाच्या रमणीय आख्यानांचा सरस विषय म्हणून बनत. परंतु ते विजय व पराभव लोकांचे विजय व पराभव मानले जात नसत. ही गोष्ट केवळ पेशवाईसच लागू नाहीं. कांहीं अपवाद सोडल्यास, सर्व भारतीय इतिहासाची हीच गोष्ट आहे. लोकांची दुसरी राजकीय संस्था अतिप्राचीन काळीं गणराज्य ही होती. गणराज्यें राजसत्तांनीं मोडलीं. नंतर ग्रामसंस्था हीच जनतेची खरीखुरी राजकीय संस्था राहिली. राजसत्तेशीं जनता एकजीव किंवा एकरूप असल्याचा इतिहास चीनचा आहे, अरबांचा आहे, विशेषतः युरोपचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास आहे. म्हणून लोकशाही राज्याची कदर न बाळगणारा, परंतु 'स्वातंत्र्यतत्त्वाचा इतिहास हाच मानवी इतिहास' असें म्हणणारा हेगेल, जर्मनराज्य हा लोकस्वातंत्र्याचा सर्वश्रेष्ठ अवतार समजतो. परंतु राजसत्तेशीं लोकजीवनाचें झालेलें इतकें समीकरण भारतीय इतिहासांत सांपडणें जवळ जवळ अशक्य आहे. धर्मराज्य आणि राजाचें राज्य एकच होय, असा अनुभव केवळ पौराणिक कल्पनेचाच विषय बनला आहे. 'रामराज्य' ही वस्तुस्थिति होती, असें केवळ अपवादादाखल म्हणतां येतें. बुद्धिवादी इतिहाससमीक्षक वाल्मीकीच्या महाकाव्याचा तो विषय ठरवून पौराणिक कविकल्पनेंतच रामराज्याचें विसर्जन करतात! त्यास प्रत्युत्तर श्रद्धेपाशींच आहे. सप्रमाण ऊहापोहाला तेथें जागा नाहीं.

## राजाला निरंकुश सत्ता नव्हती

भारतांत राजसत्तेला लोकजीवनाशीं तादात्म्य साधतां न आल्यामुळें, भारतीय राजधर्माचें अनुशासन करणाऱ्या धर्मशास्त्रानें राजाला निरंकुश सत्तेचे अधिकार दिले नाहींत. आदर्श राजसत्तेशीं लोकजीवनाची एकरूपता आणणारा ध्येयवाद महाभारतांत वा मनुस्मृतींत वा कौटिलीय अर्थशास्त्रांत आढळतो. परंतु तो ध्येयवाद प्रत्यक्ष ऐतिहासिक घटना म्हणून निर्दिष्ट करतां येत नाहीं. म्हणूनच धर्मशास्त्रांतील राजधर्मांत 'लोकमान्य धर्मशास्त्राचें व लोकसिद्ध रूढीचें अतिक्रमण राजानें करूं नये', असें बारंबार सांगितलें आहे. ग्राम, कुल, गण, श्रेणी इत्यादिकांच्या व्यवहारविषयक वादांचे निर्णय त्यांच्या मुख्यांकडून किंवा त्यांच्याच सामुदायिक सभांकडून करून घ्यावेत; त्यांना तें अशक्य झालें तरच राजा व राजप्रतिनिधि यांनीं लोकरूढीस अनुसरूनच शेवटीं निर्णय द्यावे, असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. 'धर्माची म्हणजे समाजमान्य नियमांची अवहेलना करणारा राजा वध्य आहे' असें धर्मशास्त्र सांगतें : ('असत्पापिष्ठसचिवो वध्यो लोकस्य धर्महा।' —महाभारत, शांतिपर्व ९२।१९ ). 'शुक्रनीतीं'त म्हटलें आहे कीं, अधार्मिक राजा टाकावा, पुरोहितानें राज्यरक्षणार्थ तो राजा बाजूस सारून नवा राजा लोकसंमतीनें स्थापावा : ('गुणनीतिबलद्वेषी कुलभूतोऽप्यधार्मिकः। नृपो यदि भवेत्तं तु त्यजेद्राष्ट्रविनाशकम् ॥ तत्पदे तस्य कुलजं गुणयुक्तं पुरोहितः। प्रकृत्यनुमतिं कृत्वा स्थापयेत् राज्यगुप्तये'

२।२७४,७५ ). राजा हा लोकरूढीचा दास होता. राजसत्तेनें गणराज्यें मोडलीं, परंतु गणराज्यांनीं निर्मिलेली समाजव्यवस्था व मानलेले धर्म ( कायदे ) राजसत्तेला मान्य करावे लागले.

## दासंस्थेचें स्वरूप

राजसत्ता व पुरोहितसत्ता या दोन्ही शक्ती युरोपांत जशा प्रबळ झाल्या व त्यांनीं लोकजीवनाचा जितका ताबा घेतला, तसें भारतांत घडलें नाहीं. याचें कारण प्राचीन गणराज्यांनीं बसविलेली व्यवहाराची घडी ही होय. ही लोकव्यवहाराची घडी स्थिर व शिलाभूत किंवा प्रस्तरप्राय बनून जातिसंस्थेंत तिचें रूपान्तर झालें. गणराज्यांत समता अधिक प्रमाणांत असल्यामुळेंच युरोपच्या व पश्चिम आशियाच्या प्राचीन काळांतील दाससंस्थेची स्थापना भारतांत होऊं शकली नाहीं. स्मृतींच्या धर्मशास्त्रांत दाससंस्था निर्दिष्ट केलेली आढळते; परंतु भारतीय अर्थशास्त्राचा पाया हें स्वरूप दाससंस्थेस कधींच आलें नाहीं. प्लेटो व ॲरिस्टॉटल्चें समाजानुशासन गुलामाच्या अस्तित्वाच्या तत्त्वास महत्त्व देतें, तसें भारतीय धर्मशास्त्रांत व अर्थशास्त्रांत दास्याचें महत्त्व सांपडत नाहीं. दाससंस्था हा भारतीय समाजसंस्थेचा महत्त्वाचा मान्यता पावलेला भाग आहे असें इतिहासाचें प्रमाणहि मिळत नाहीं. भूदाससंस्थेलाहि म्हणजे सरंजामशाहीलाहि शिस्तशीर मान्यता भारतीय समाजसंस्थेनें कधींहि दिली नाहीं, याचें महत्त्वाचें कारण गणराज्यांच्या काळीं अस्तित्वांत आलेली स्वातंत्र्यप्रधान ग्रामसंस्था होय.

## लोकच्छंदानुवर्ती पुरोहितसंस्था

पुरोहितसंस्थाहि हिंदी समाजरचनेचा महत्त्वाचा भाग हजारों वर्षें आहे. परंतु पुरोहितांची युरोपांतील चर्चसारखी संघटित संस्था या देशांत कधींच भरभराटीस आली नाहीं. ग्रामजोशी हा आर्थिक दृष्ट्या अगदीं सामान्य व धर्मदृष्ट्या पूज्य परंतु सत्ताशून्य असा, लोकतंत्राचाच एक भाग म्हणून येथें राहिला. राजसत्तेच्या बळावर शेफारलेली किंवा स्वतंत्रपणें आपलें प्रभुत्व स्थापित करून वरचढ झालेली पुरोहितसंस्था या देशाच्या इतिहासांत सांपडत नाहीं. जी कांहीं सांपडते ती लोकच्छंदानुवर्ती पुरोहितसंस्था सांपडते.

## बंधन-स्वातंत्र्याचे विचित्ररंगी धागे

या देशांत जातिभेद व त्यांतील जन्मसिद्ध उच्चनीचता ही अत्यंत प्रभावी व मूलभूत संस्था अस्तित्वांत असून, ती व्यक्तिस्वातंत्र्य व समता या लोकशाही तत्त्वांचा पराभव करणारी प्रचंड शक्ति आहे. परंतु ही संस्थासुद्धां श्रमविभाग व आर्थिक उत्पादनाची सुरक्षितता याच हेतूनें स्थापन झालेल्या गणराज्याच्या व्यवस्थेचा अधोगतीला गेलेला पर्याय आहे. अतिप्राचीन जगांत माणसाला जीं परिस्थितीचीं नैसर्गिक जाचक बंधनें होतीं व आजपेक्षां फार खोल असें अज्ञान होतें, त्यांमुळें अस्पृश्यता आणि जातिभेदाची विषमता परिणत झाली. विषमतेचें पोषण करणारा व विशिष्ट वर्गाचें वर्चस्व स्थापन करणारा हेतु या समाजव्यवस्थेंत अर्धवटपणेंच सफल झाला. म्हणूनच उत्पादक कला, शेती आणि लढाईचा धंदा ह्या गोष्टी हिंदुसमाजांतील खालच्या वर्गाच्या हातांतून कधींच गेल्या नाहींत. पारमार्थिक व्यवहारांतहि शैव, भागवत व बौद्ध संप्रदायांनीं समता कायम राखली, समाजांतील कोणत्याहि व्यक्तीची पारमार्थिक प्रतिष्ठा समतेच्या पायावर पूर्णपणें अक्षत राहिली व धर्मस्वातंत्र्याचा आदर्श निर्माण झाला. हिंदी समाजाच्या जीवनांत अशा प्रकारें बंधनें व स्वातंत्र्यें यांचे विचित्ररंगी धागे आडवे-उभे विणलेले सांपडतात.

## धर्मस्वातंत्र्याची उदार परंपरा

यापुढें भूतकाळानें दिलेल्या चांगल्या-वाईटाचा वारसा नीट पारखूनच स्वीकारला पाहिजे. त्यांत स्वातंत्र्याचेहि शक्तिकण आहेत, त्यांची नियमाप्रमाणें निवड केली पाहिजे. वर्तमान हिंदी समाजाच्या विचारपद्धतींत कडवा धर्माभिनिवेश नाहीं; संप्रदायस्वातंत्र्याच्या बाबतींत पूर्ण औदार्य आहे. धर्म ही धार्मिक माणसाची अंतिम निष्ठा असते. सर्व जीवितक्रमाची दिशा व गति या निष्ठेनें नियंत्रित असते. धर्मसंप्रदायांच्या स्वातंत्र्याची प्रतिष्ठा म्हणजे हिंदु संस्कृति. लोकशाहीच्या वाढीस आवश्यक अशा विचारस्वातंत्र्याची पार्श्वभूमि ह्या

धर्मस्वातंत्र्याला पूरक असलेल्या श्रद्धेनें खंबीर राहील. विरुद्ध मत-वादांवर त्वेषानें, असहिष्णुतेनें तुटून पडणारा वेडेपणा हिंदु मनुष्यांत मुळींच नाहीं, हें येथील लोकशाहीला एक मोठें वरदान आहे.

जमातीच्या व रूढीच्या बंधनांत व्यक्तीला डांबून टाकणारा जातीचा वरचष्मा आतां गेल्या सव्वाशें वर्षांतल्या परिवर्तनानें नाहींसा झालेला आहे. व्यवसायाबद्दलचें जातिबंधन खांडित झालें आहे. आतां जातिभेदाचें अस्तित्व कुटुंबसंस्थेच्या व्यवहारांत तेवढें जबरदस्तपणें भासत असतें. व्यवसाय-स्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य यांस मानसिक मान्यता लाभली आहे. शैक्षणिक दृष्ट्या मागसलेले व पुढारलेले असे जे भेद आहेत ते जितक्या लवकर बुजतील त्या मानानें जातिभेदानें निरुद्ध केलेली व्यक्ति अधिक मुक्त होत जाईल.

### लोकांचें औदासीन्य !

लोकशाहीस आवश्यक अशा सामाजिक क्रांतीस पोषक असलेल्या शक्तींचा मोठा जुना वारसा हिंदी लोकसंस्थेजवळ आहे. या घटकेस हिंदी लोकसंस्था संक्रमणावस्थेंत आहे. लोकशाहीस विरोधी अशी प्रचंड अडचण एकच आहे. ती म्हणजे मागसलेपण व शैथिल्य ही होय. या ठिकाणीं वरिष्ठ वर्गांची मिरासदारी फारशी प्रबळ नाहीं. भूदासमूलक सरंजामदारी फारशी कधींच प्रभावी नव्हती. भांडवलशाही ही सर्व समाजाच्या प्रपंचाला तोलून धरण्याइतकी वाढली नाहीं. ती खुरटलेली आहे, म्हणून वर्गविग्रहाचा लढाहि विशाल रूप धारण करूं शकत नाहीं. मात्र विधायक शक्ती निद्रित आहेत. म्हणून लोकशाहीला धोका लोकांच्या औदासीन्यामुळें उत्पन्न होईल. लहानसे राजकीय गट आपसांतील सत्तास्पर्धेंत निकरावर येऊन या बाल्यावस्थेंत असलेल्या लोकशाहीला धोक्यांत आणतील. जुनी सामाजिक परंपरा लोकशाहीस आवश्यक असलेल्या सामाजिक क्रांतीला निकरानें विरोध करणारी तर नाहींच; उलट, त्या सामाजिक क्रांतीला आशा व उत्साह उत्पन्न करणारें मानवी वृत्त व मनोगत सांगण्यास ती सज्ज आहे. स्वातंत्र्याची अनंत प्रेरणा हेंच मानव्याचें मनोगत आहे. त्याचा लोकांना साक्षात्कार घडवून देणें, हेंच आजच्या हिंदी लोकशाहीच्या ध्येयवादाचें मुख्य कर्तव्य आहे.

---

## समाजवादापुढील यक्षप्रश्न

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत काय दडून राहिलेलें आहे हें आज कुणालाच सांगतां येणार नाहीं. अणु-युद्ध झालेंच तर काय होईल तें कुणीं सांगावें ? अणु-युध्दापासून जगाला वांचवितां आलें तर रशिया, चीन यांसारख्या राष्ट्रांतहि आज ना उद्यां लोकशाहीचा उदय होईल अशी अंधुकशी आशा मी बाळगून आहे. जमीनदारी, सरंजामशाही, भांडवलशाही यांना उलथून टाकण्यांत ज्या राष्ट्रांनीं यश मिळविलें त्यांना हुकुमशाहीचा अन्त करतां येईल असें आपण कां मानूं नये ? परंतु ही अंधुकशी आशा मी मनांत वागवीत आहे याचा अर्थ आधुनिक साम्यवादाची हुकुमशाही उभारणी मला मान्य आहे असा मात्र नव्हे. लोकशाहीवर श्रद्धा असणाऱ्या दुसऱ्या कोणत्याहि प्रागतिकाइतकाच माझाहि या हुकुमशाहीला विरोध आहे.– पोलादी पडद्यापलीकडील आपल्याला दिसत नसेल; पण त्या पडद्याच्या बाहेर जरी आपण पाहिलें तरी आपल्याला काय दृश्य दिसतें ? प्रतिगामी शक्तींना उचलून धरण्यांतच आज अमेरिकेची सत्ता व संपत्ति यांचा विनियोग होत असलेला आढळून येत नाहीं काय ? आज पाश्चात्य राष्ट्रांतील समाजवादी चळवळींतून पूर्वींचें तेज व उत्साह हीं नाहींशीं झालेलीं आहेत. रशियन पद्धतीचा साम्यवाद व अमेरिकेवर विसंबणारा परधार्जिणेपणा या दोन विरोधी शक्तींमधून आपला मार्ग कसा काढावा हाच समाजवादापुढें असणारा आजचा यक्षप्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर मला माहीत नाहीं. परंतु मला प्रिय असणारीं समाजवादी मूल्यें या दोन चक्रांत सांपडून भरडून निघत आहेत आणि एका असहाय जाणीवेच्या उदास छायेनें माझें अंतःकरण भरून गेलें आहे.

—जी. डी. एच्. कोल, ( Webb Memorial Lecture मधून )



अनुक्रमणिका






# भारताची गेल्या पांच वर्षांतील प्रगति

१५ ऑगस्ट १९५२ रोजीं हिंदी प्रजासत्ताक राज्याची स्थापना झाल्याला पांच वर्षें पुरीं होतील. या पांच वर्षांत हिंदुस्थाननें जनतेच्या हिताच्या दृष्टीनें किती प्रगति केली आहे हें पाहणें उद्बोधक होईल. ही प्रगति सापेक्षतयाच पाहिली पाहिजे. प्रत्येक राष्ट्राला कांहीं परंपरा असतात, कांहीं आर्थिक व सांस्कृतिक बंधनेंहि असतात. आणि हीं सर्व सांभाळून राष्ट्र पुढें जात असतें. एक राज्यसत्ता संपून दुसरी राज्यसत्ता जेव्हां येते, तेव्हां नव्या राज्यसत्तेला प्रतिक्रियेशीं झगडावें लागतें. हिंदुस्थानांत जें स्वातंत्र्य स्थापन झालें तें प्रजासत्ताक स्वातंत्र्य आहे आणि त्याकरितांच आमचा झगडा होता. आमच्या देशांत हिंसात्मक क्रांति झाली नाहीं. तशी क्रांति झाली असती, तर निराळेच प्रश्न उत्पन्न झाले असते व ते प्रश्न निराळ्या रीतीनें सोडविले गेले असते. भावी इतिहासकार कदाचित् म्हणतील कीं, हिंदुस्थानांत क्रांति वगैरे कांहीं झाली नाहीं; फक्त सत्तान्तर झालें. याचा अर्थ राज्याचा सांगाडा होता तसाच राहिला, फक्त तो चालविणारे बदलले. जे नवे राज्यसंचालक आले, ते लोकांचे, लोकांतले व लोकांकरितां कष्ट करणारे आले. त्यांना ध्येयवादाच्या तुताऱ्या फुंकतां आल्या नाहींत. राज्य हातीं घेतलें आणि प्रश्नामागून प्रश्नांनीं राज्यकर्त्यांवर भडिमार केला. ब्रिटिशांनीं राज्य सोडलें तें सुखासुखीं सोडलें नाहीं. त्यांनाहि ती परिस्थिति अनावर झाली होती. अशा या भडकलेल्या अग्नींत प्रवेश करणारे स्वतः खाक न होतां बाहेर पडले हेंच विशेष होय !

## प्रारंभींची संकटपरंपरा

स्वातंत्र्यानंतरची परिस्थिति भयंकरच होती. शेवटीं १९४८ च्या जानेवारींत गांधींचा खून झाला ! ऑगस्टपासून सुमारें पांच-साडेपांच महिनेपर्यंत हिंदुस्थानांत आणि पाकिस्तानांत कांहीं भागांत खून, कत्तली, जाळपोळी, लुटालुटी, बलात्कार, अत्याचार यांनीं थैमान घातलें होतें. माणुसकी जणूं शिल्लकच उरली नव्हती ! पंजाबमध्यें पसरलेली ही आग जर सर्व हिंदुस्थानांत भडकली असती, तर राज्य सांभाळणें कठिण झालें असतें. एक वेळ हे अत्याचार हिंसात्मक साधनांनीं थांबवितां येतात; पण त्या अत्याचारांमुळें भेदरलेली व सैरावैरा पळत सुटणारी जनता आवरतां येत नाहीं. फाळणीमुळें झालेल्या अत्याचारांतुन निर्वासितांचा प्रश्न निर्माण झाला. पाकिस्तानांतून हिंदूंचे लोंढेच्या लोंढे हिंदुस्थानांत येऊं लागले. जे निर्वासित येत ते पाकिस्तानपेक्षां हिंदुस्थानचेच अधिक वैरी बनून येत! त्यांना वाटे, आमच्या सत्यानाशांतून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य जन्माला आलें आहे! त्यांचा त्वेष व उद्रेक समर्थनीय नव्हता, असें कसें म्हणावें ? आमच्या नेत्यांना फाळणीमुळें असल्या राक्षसी प्रवृत्ती निर्माण होतील अशी कल्पना नव्हती. पण तो काळ, जें केलें तें बरोबर केलें का चुकीचें केलें, यासंबंधीं निवाडा देण्याचा नव्हता. पेटलेली आग कशी काबूंत आणतां येईल एवढाच राज्यकर्त्यांपुढें प्रश्न होता. त्यांनीं कालोचित सामर्थ्य दाखविलें व जातीयतेचा वणवा पसरूं नये म्हणून कठोर वृत्ति धारण केली. हिंदुस्थानांतील जातीय वृत्तीचीं वृत्तपत्रें, जातीय वृत्तीच्या पुढाऱ्यांचीं वक्तव्यें व कृत्यें यांना आळा घालण्याचें कठिण काम त्या वेळीं करावें लागलें. निर्वासितांचा प्रश्न कितीहि करुणास्पद असला, तरी राज्याच्या सुरक्षिततेपुढें तो प्रश्न गौण होता. राज्य टिकविणें हेंच त्या वेळीं महत्त्वाचें होतें.

१५ ऑगस्ट १९४७ पासून म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सुमारें दोन महिन्यांच्या आंतच पाकिस्तानी सैनिकांच्या साहाय्यानें आझाद काश्मीर सैनिकांनीं आणि टोळीवाल्यांनीं काश्मीरवर हल्ला चढविला. हिंदुस्थानांतील संस्थानिकांचें भवितव्यहि ठरत होतें. काश्मीरचे महाराज पाकिस्तानांत जात नव्हते किंवा हिंदुस्थानांतहि येत नव्हते. ज्या वेळीं आझाद काश्मीर सैनिक पाकिस्तानी सरहद्दीकडून काश्मीरवर चाल करून गेले आणि गांवामागून गांवें बेचिराख करीत श्रीनगरच्या जवळपास पोहोंचले,

त्या वेळीं महाराज शुद्धीवर आले आणि त्यांनीं हिंदुस्थानांत सामील होण्याचा निर्णय घेतला. त्याच वेळीं तेथील राष्ट्रीय परिषदेचे प्रमुख श्री. शेख अब्दुल्ला यांनींहि महाराजांच्याबरोबर हिंदुस्थानकडे संरक्षणाकरितां सैन्याची मागणी केली. ती मागणी आली तेव्हां शत्रूचें सैन्य श्रीनगरच्या जवळ येऊन धडकलें होतें. हिंदुस्थान-सरकारनें विमानांतून सैन्याची रवानगी केली आणि सतत दोन वर्षेंपर्यंत त्या पहाडी मुलुखांत मुकाबला करून सर्वच्या सर्व काश्मीर पाकिस्तानांत जाण्यापासून वांचविलें. काश्मीरचा झगडा अद्याप संपला नाहीं. तेथें आमचीं सैन्यें अद्याप खडीं आहेत. पण जर त्या वेळीं आमच्या सैनिकांनीं पराक्रम केला नसता, तर कदाचित् जम्मूकडून अमृतसरपर्यंत आणि त्याच्याहि पुढें पाकिस्तानी सैन्य घुसलें असतें! हीं दोन संकटें कशीं निवारण केलीं ह्याचा संक्षेपानें येथें उल्लेख केला आहे.

तिसरें संकट संस्थानिकांचें. हिंदुस्थानांतून ब्रिटिश जे गेले ते येथील संस्थानिकांना स्वतंत्र व सार्वभौम करून गेले. हिंदुस्थानांत जरी लहान-मोठीं ५५० संस्थानें होतीं, तरी त्यांतील दहा-बारा संस्थानेंच मोठीं व उपद्रव देऊं शकलीं असतीं. ब्रिटिशांचा पाठिंबा गेल्यामुळें पोरकीं झालेलीं हीं संस्थानें बंड उभारूं शकलीं असतीं असें नाहीं; पण बंडखोर प्रवृत्तींना आश्रय देण्याइतकी शक्ति त्यांच्यांत खास होती. सरदार वल्लभभाई पटेल यांनीं कांहींना चुचकारून, कांहींना प्रलोभनें दाखवून, कांहींना धाकदपटशा देऊन सामील करून टाकलें. ५ जानेवारी १९४८ रोजीं छत्तीसगड हें पहिलें संस्थान ओरिसामध्यें विलीन झालें. सुमारें दोन वर्षांत शतक-दीडशतकाची ही संस्थानिकांची परंपरा संपुष्टांत आली. आपली प्रजा आपल्या विरुद्ध आहे हें संस्थानिकांना माहीत होतें. तेव्हां त्यांनींहि विशेष गडबड केली नाहीं. सरदारांनीं त्यांचा समूळ उच्छेद न करतां, त्यांनीं उपद्रव देऊं नये म्हणून त्यांना तनखे दिले व इतर सवलती दिल्या. संस्थानिकांचें हें तिसरें संकट दूर करतांना त्रासदायक झालेलें संस्थान एकच होतें. तें म्हणजे हैदराबाद. त्या संस्थानांत कासीम रझवी व त्याचे रझाकार यांनीं अनेक वर्षें धुमाकूळ घातला होता. हिंदु प्रजेवर ते अत्याचार करीत आणि क्वचित् ठिकाणीं मुसलमानहि त्यांच्या त्रासांतून सुटत नसत. हैदराबादमध्यें पाकिस्तानी सैन्य येणार आहे, ब्रिटिशांची त्यांना मदत आहे, वगैरे अनेक अफवा उठत. पण हैदराबादमधील रझाकारांचे अत्याचार आणि निजामाची ताठर वृत्ति सहन करण्यावांचून त्या वेळीं गत्यंतरच नव्हतें. देशांत जातीयतेचा राक्षस मोकाट सुटला होता. काश्मीरमध्यें हिंदी सैन्य गुंतलें होतें. अशा वेळीं हैदराबादवर स्वारी करणें धोक्याचें होतें. पण जेव्हां वरील दोन्ही संकटें आवरण्याच्या स्थितींत आलीं, तेव्हां हैदराबादवर 'पोलिस-चढाई' केली आणि अवघ्या पांचच दिवसांत हैदराबादचा प्रश्न निकालांत निघाला. अशा रीतीनें दक्षिणेस हैदराबाद आणि उत्तरेस काश्मीर अशी दोन्हींकडे पेटलेली आग विझविणाऱ्या सरकारचें अभिनंदन करावयास नको काय?

हीं चार संकटें झालीं. पण पांचवें संकट तितकेंच त्रासदायक होतें. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्याबरोबर कम्युनिस्टांच्या चळवळींना जोर चढला. त्यांना वाटलें, जशी रशियांत केरेन्स्कीच्या हातून लेनिननें सत्ता हिसकावून घेतली, तशी जवाहरलाल यांच्या हातून आपण सत्ता हिसकावून घेऊं. पण त्यांच्या या प्रबंधानें त्यांना एका बाबतींत दगा दिला. केरेन्स्कीच्या वेळीं काय किंवा लेनिनच्या वेळीं काय रशियांत मुलकी व लष्करी कारभार कोसळला होता. हिंदुस्थानांत तसें झालें नाहीं. त्यामुळें त्यांचा प्रबंध चूक ठरला. कम्युनिस्टांनीं रेल्वे-कामगार, गिरणी-कामगार, विद्यार्थी यांच्या साहाय्यानें उपद्रव द्यावयास सुरुवात केली. रेल्वेचा संप घडवून आणला म्हणजे धान्याची वाहतुक बंद होईल आणि ठिकठिकाणीं धान्याचा दुष्काळ पडेल अशी त्यांची कल्पना होती. पण रेल्वे-कामगार संपावर गेले नाहींत. नंतर रेल्वे पाडणें, रूळ उखडणें वगैरे उपद्व्याप त्यांनीं सुरू केले. पण त्यामुळें त्यांना कृत्रिम दुष्काळ पाडतां येईना. नंतर त्यांनीं कलकत्यावर आपली शक्ति केंद्रित केली. कित्येक दिवस तेथें संपाचें व दंगलीचें सत्र सुरू होतें. पोलिसांच्या



बरोबर ते लढत आणि लढतांना शस्त्रास्त्रांचा सर्रास उपयोग करीत. सरदार वल्लभभाई व पं. जवाहरलाल तेथें जाऊन आले. पंडितजींची विराट् सभा चालू असतांच एका विभागांत बॉम्ब उडवले गेले व प्राणहानीहि झाली. तथापि, बऱ्याच दिवसांनंतर कलकत्त्याची दंगल शमली.

याच कम्युनिस्टांनीं तेलंगणांत केलेल्या अत्याचारांचा इतिहास सर्वांना ठाऊक आहे. तेलंगणांत आजसुद्धां बऱ्याच प्रमाणांत कम्युनिस्टांचें वर्चस्व आहे. कम्युनिस्ट त्या वेळीं कामगारांना संपावर जाण्याचा आदेश देत, तो कामगारांची परिस्थिति सुधारावी ह्या हेतूनें देत नसत. कांहींहि करून त्यांना येथें अराजक निर्माण करावयाचें होतें. पण त्यांचा तो प्रयत्न फसला.

अशा प्रकारें (१) जातीय दंगल, (२) काश्मीरवर चढाई, (३) संस्थानिकांचा प्रश्न, (४) हैदराबादचा प्रश्न आणि (५) कम्युनिस्टांचा बंडाचा प्रयत्न ह्या पांच संकटांना सरकारनें यशस्वी रीतीनें तोंड दिलें.

कार्यक्षम अधिकाऱ्यांची उणीव

हिंदुस्थानांतून ब्रिटिश निघून गेले असें आपण अभिमानानें म्हणतों; पण ब्रिटिश निघून गेल्यामुळें काय झालें याचा विचार करीत नाहीं. राज्याचा दैनंदिन कारभार चालण्याकरितां मुलकी सत्ता समर्थ असावी लागते. १५ ऑगस्टला जवळजवळ निम्मे आय्. सी. एस्. व पोलीस अधिकारी येथून निघून गेले. सत्ता रातोरात हातीं आली; पण रातोरात अधिकारी निर्माण करतां आले नाहींत! नवे अधिकारी जे नेमले गेले ते जबाबदारीच्या मानानें कमी प्रतीचे होते. अशा अधिकाऱ्यांच्या अमदानींत लांचलुचपत, काळा बाजार वाढला आणि राज्यकारभार चांगल्या प्रकारें होईनासा झाला. आजसुद्धां जी राज्यकारभाराबद्दल ओरड आहे, त्याला कारण नोकरवर्गाची कमी लायकी हेंच आहे.

लष्करांतूनसुद्धां सर्व ब्रिटिश अधिकारी निघून गेले. एकदम उच्च पदावर चढलेल्या अधिकाऱ्यांच्या हातून लष्करी कारभार कसा चालतो हा प्रश्नच होता. पण नव्या अधिकाऱ्यांनीं काश्मीरमध्यें बिकट परिस्थितींत लढून यश संपादन केल्यामुळें त्यांना सार्थ अभिमान वाटत आहे. हिंदुस्थानच्या राज्यकारभारावर टीका करतांना ही परिस्थिति जर टीकाकार लक्षांत ठेवतील तर ते संयमितच टीका करतील. यंत्रविशारद, शास्त्रज्ञ, वगैरेंच्या बाबतींतहि एकदम पडलेला खड्डा लक्षांत घेतला, तर परिस्थितीचें गांभीर्य लक्षांत येईल.

परराष्ट्रीय धोरण

स्वतंत्र झालेल्या देशाला बाहेरच्या जगाशीं मित्रत्वाचे संबंध ठेवावे लागतात; पण ती मैत्री स्वतःच्या तत्त्वाशीं फारकत करून ठेवतां कामा नये. जपानखेरीजकरून सर्व आशियांतलीं राष्ट्रें कमी-अधिक प्रमाणांत पाश्चात्त्यांचीं अंकित होतीं. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्याबरोबर ह्या राष्ट्रांना आपल्यामागें एक प्रबळ शक्ति निर्माण झाली आहे असा विश्वास वाटूं लागला. हिंदुस्थान त्या विश्वासाला पूर्णपणें उतरला आहे. हिंदुस्थानच्या अंतर्गत आर्थिक अगर राजकीय धोरणाबद्दल मतभेद असूं शकतील; पण पं. जवाहरलाल यांच्या नेतृत्वाखालीं आंखलेलें व अनुसरलेलें परराष्ट्रीय धोरण हें गौरवास्पद व अभिमानास्पद ठरलें आहे. ज्या ज्या वेळीं परकीय सत्तेखालीं असलेल्या राष्ट्रांचा प्रश्न निर्माण झाला, त्या त्या वेळीं हिंदुस्थाननें दलित राष्ट्रांचीच बाजू घेतली. इन्डोनेशिया, चीन, जपान, इराण, इजिप्त, ट्युनिशिया, नेपाळ वगैरे ठिकाणीं निर्माण झालेल्या प्रश्नांच्या वेळीं हिंदुस्थानची सहानुभूति त्या त्या राष्ट्रांकडेच होती. डचांच्या विरुद्ध असो, रशियाच्या विरुद्ध असो किंवा अमेरिकेच्या विरुद्ध असो, हिंदुस्थाननें निर्भयपणें सत्याचा व न्यायाचाच पक्ष घेतला आहे. कोरियाच्या युद्धाच्या वेळीं आगींत तेल ओतून तिसरें महायुद्ध भडकविणें हिंदुस्थानला अगदीं शक्य होतें. पण हिंदुस्थाननें न्यायान्यायाचा निवाडा केला; पण युद्ध पेटविण्याकरितां सैन्याची मदत केली नाहीं. चीनच्या अधिकारारूढ सरकारचा प्रतिनिधि युनोंत घ्यावा, क्युओमिंगटांगचा घेऊं नये असा आग्रह हिंदुस्थाननें धरला. जपानच्या तहामध्यें अमेरिकेचें सैन्य ठेवण्याचें कलम आहे म्हणून त्या तहावर सही

करण्याचें हिंदुस्थाननें नाकारलें. इराण, ईजिप्त, ट्युनिशिया—जेथें कोठेंहि पाश्चात्त्यांची आक्रमक वृत्ति दिसून येते तेथें हिंदुस्थान अन्यायाची प्रतिष्ठा ठेवीत नाहीं.

रशिया व अमेरिका या दोन शक्तिशाली राष्ट्रांचे गट जगांत पडले आहेत. पंडितजी अमेरिकेला गेले, पण त्यांनीं शांततेचा पुरस्कार करून युद्धाकडे नेणाऱ्या या किंवा त्या गटांत जाण्याचें निर्धारपूर्वक नाकारलें. आज अमेरिका हिंदुस्थानला अनेक प्रकारें आर्थिक मदत करीत आहे. पण ही मदत घेतांना हिंदुस्थान त्यांच्या गटांत गेला नाहीं किंवा त्यांच्या धोरणाशीं सहमत झाला नाहीं. परक्या राष्ट्राचें कर्ज घेणें हें राष्ट्रीय पुनर्रचना करणाऱ्या राष्ट्रांना अपरिहार्य होतें. आज अमेरिकाच काय, पण रशियाहि आमच्या अटीवर मदत करीत असेल, तर ती मदत घेण्यास हिंदुस्थान तयार आहे. अशा प्रकारें राजकीय बाबतींत स्वतंत्र धोरण आणि आर्थिक बाबतींत आमच्या अटीवर कर्ज घेणें ही सांप्रतची हिंदुस्थानची परराष्ट्रनीति आहे. या नीतीमुळें एक पाकिस्तान वगळला, तर इस्लामी राष्ट्रांसह आशियांतील अनेक राष्ट्रें आमच्या नेतृत्वाकडे उत्सुकतेनें पाहत आहेत.

## नवी राज्यघटना

घटना-परिषदेतर्फे तयार केलेली घटना आणि पंचवार्षिक नियोजन ह्या आपल्या दोन अभिमानास्पद गोष्टी आहेत. निरनिराळ्या प्रश्नांशीं झगडत असतां भारतीय लोकशाही घटना आम्हीं तयार केली, एवढेंच नव्हे तर जगांत झाला नव्हता एवढा लोकशाहीचा प्रयोग त्या घटनेप्रमाणें निवडणुका करून आम्हीं यशस्वी केला आहे. ( आमच्याबरोबर स्वतंत्र झालेल्या पाकिस्ताननें अद्यापपर्यंत नव्या घटनेच्या लिखाणाला सुरुवातहि केलेली नाहीं. ) अशा प्रकारें गेल्या पांच वर्षांत अंतर्गत शांतता व परराष्ट्रीय धोरणांत स्वतंत्रता राखून आणि राज्यकारभाराकरितां लोकशाही घटना तयार करून हिंदुस्थाननें निश्चितपणें प्रगति केली आहे. ब्रिटिशांच्या राजवटींत हिंदुस्थान एकवटला होता, पण तो सक्तीनें. नव्या राजवटींत ऐक्याचे शत्रू, जातिभेद, प्रांतभेद व वर्गभेद हे आहेत. त्या भेदांच्या विरुद्ध सरकार कठोरपणें धोरण अवलंबीत आहे. ह्यांतील कोणत्याहि भेदाला डोकें वर काढण्यास संधि मिळाली, तर हिंदुस्थानचें भवितव्य खडतर होईल !

## आर्थिक प्रश्न

ब्रिटिश गेले तेव्हां अन्नधान्याचा प्रश्न बिकटच होता. महागाई चौपट झाली होती. १९३९ सालीं २३३ कोटी रुपयांच्या नोटा चलनांत होत्या. १९४७ सालीं त्या १२७५ कोटी झाल्या. ही चलनवाढ ब्रिटिशांनींच, येथून युद्धोपयोगी सामग्री देऊन व त्याच्या मोबदल्यांत नोटा फैलावून केली होती. चलनवाढ कमी केल्याशिवाय महागाई कमी होणें शक्य नव्हतें. जनतेंतील सर्व वर्गाजवळ पैसाच पैसा झाल्यामुळें प्रत्येक पदार्थाचा सांठा करण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत बळावली होती. नियंत्रणें होतीं; पण तीं नाममात्रच होतीं. जेव्हां विकत घेणारा गरजू आणि पैसेवाला असतो आणि विकत देणारा भाववाढीच्या आशेनें दम धरूं शकतो, तेव्हां काळ्या बाजाराला ऊत येतो. हा काळा बाजार स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळीं शिगेला पोहोंचला होता. ज्याच्याजवळ विकण्यासारखें कांहीं होतें—मग तो सामान्य शेतकरी असो किंवा उद्योगपति असो—ते सर्व पैसेच पैसे कमवूं लागले. सरकारी अधिकारी, चहूंकडेच पैशाचे पाट वाहूं लागल्यानंतर आणि काळ्या बाजारासारखा गुन्ह त्यांच्या हातांत सांपडल्यानंतर सोंवळे राहण्याइतके ऋषिमुनी नव्हते ! राजकारणांत जशीं अंतर्गत संकटें होतीं, तशी अर्थकारणांत कायदे मोडण्याची वृत्ति बळावली होती. सरकारला या वृत्तीबरोबर लढाईच पुकारावी लागली. बंडखोरांचीं बंडें मोडणें सोंपें असतें; पण आर्थिक व्यवहारांतील अराजकता काबूंत आणणें कठिण असतें. सरकार गेलीं पांच वर्षें या प्रवृत्तीबरोबर झगडत आहे; पण अद्याप त्याला संपूर्णपणें यश आलेलें नाहीं. नियंत्रणें ठेवणें विशिष्ट परिस्थितींत क्रमप्राप्तच होतें. चलनवाढीचें संकट, वस्तूंची अपुरी पैदास, बाहेरून होणारा मर्यादित पुरवठा आणि क्रयशक्तीची कृत्रिम वाढ या कारणांकरितां नियंत्रणें ठेवणें भाग पडतें. नियंत्रणामुळें काळा बाजार फोंफावतो आणि अशा प्रकारें हें दुष्टचक्र सतत चालूं राहतें. या आपत्तीवर एकच परिणाम-








कारक इलाज आहे आणि तो म्हणजे राष्ट्राचें उत्पादन वाढविणें. उत्पादनवाढीबरोबर सर्वांना सारखा पुरवठा करणें हेंहि अपरिहार्य असतें. या दृष्टीनें सरकारनें स्वातंत्र्यानंतर ताबडतोब जर कोणता प्रश्न हातीं घेतला असेल तर तो उत्पादन वाढविण्याचा.

### अन्नधान्याचा प्रश्न

सर्वांत महत्त्वाचा प्रश्न अन्नधान्याचा. पाकिस्तान निर्माण झालें तेव्हां हिंदुस्थानांत ८२ टक्के आणि पाकिस्तानांत १८ टक्के लोकसंख्या झाली. हिंदुस्थानच्या वांट्याला ६५ टक्के जमीन आली आणि पाकिस्तानकडे ३५ टक्के जमीन गेली. पाकिस्तानकडे गेलेल्या जमिनीपैकीं ३१ टक्के जमीन पाण्याखालची होती. त्याचा परिणाम असा झाला कीं, १९४७ सालींच आमच्याकडे ४० लाख टन धान्याचा तुटवडा पडला! हिंदुस्थानांत १९४७ सालीं ४ कोटी २५ लक्ष, १९४८ सालीं ४ कोटी ३७ लक्ष, १९४९ सालीं ४ कोटी ३३ लक्ष, १९५० सालीं ४ कोटी ६० लक्ष, आणि १९५१ सालीं ४ कोटी १७ लक्ष टन धान्य झालें. (१९५१ चे आंकडे तात्पुरते आहेत; अखेरचे नाहींत.) ही धान्याची तूट भरून काढण्याकरितां परदेशांतुन धान्याची आयात केली.[१]

बाहेरून आणलेलें धान्य कमी किंमतींत देतां यावें म्हणून मध्यवर्ती सरकारनें राज्यांना पुढील प्रमाणें मदत दिली :

१९४७–४८ = १६ कोटी ९२ लक्ष; १९४८–४९ = २५ कोटी ५८ लक्ष; १९४९–५० = १६ कोटी ६१ लक्ष; १९५०–५१ = १५ कोटी १५ लक्ष; १९५१–५२ = १५ कोटी ८१ लक्ष. अशा प्रकारें गेल्या पांच वर्षांत ९० कोटी रुपये मदतीदाखल देण्यांत आले. त्यांपैकीं मुंबई राज्याला जवळ–जवळ ३५ कोटी मिळाले. याशिवाय 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेकरितां व 'फूड बोनस' करतांहि रकमा देण्यांत आल्या.

हिंदुस्थानांत अन्नधान्याचा प्रश्न म्हणजे शहरांतील लोकांचा प्रश्न आहे. सुमारें ४॥ कोटी लोक नियमित रेशनिंगवर व ८ कोटी लोक अनियमित रेशनिंगवर आहेत. हिंदुस्थानला अन्नाचा तुटवडा पडतो हें नाकारतां येत नाहीं. अन्नधान्य वाढविण्याकरितां सरकारनें अनेक प्रकारें प्रयत्न केले : (१) लहान पाटबंधारे (२) विहिरी (३) कास गवताखालीं जमिनीची लागवड (४) पडीक जमिनीची लागवड (५) खतांचा पुरवठा (६) सुधारलेलें बी-बियाणें (७) मोठमोठीं धरणें (८) जमिनीची मशागत (९) जमीनदारीचा शेवट (१०) तगाई वगैरे. या सर्व प्रयत्नांमुळें १४ लाख टन धान्य वाढलें असें सरकार म्हणतें, पण तेवढ्यानें प्रश्न सुटत नाहीं. एकीकडे धान्यवाढीचे प्रयत्न करावेत आणि दुसरीकडे निसर्गानें दगा द्यावा असा गेल्या पांच वर्षांत दोन-तीन वेळां तरी प्रसंग आला. तेव्हां हा अन्नधान्याचा प्रश्न कायमचा सोडविण्याकरितां धरणें व पाटबंधारे बांधणें याशिवाय इलाज नाहीं. त्याची तरतूद १९५० सालीं स्थापन झालेल्या नियोजन समितीनें केली आहे.

अन्नधान्याचा प्रश्न दुसऱ्याहि रीतीनें जाचक होत आहे. ज्या राज्यांत अधिक धान्य होतें, तीं राज्यें इतर राज्यांकरितां त्याग करीत नाहींत. आजची स्थिति अशी आहे कीं, राज्यानें धान्यवसुली करावी आणि तुटवडा पडला म्हणजे मध्यवर्ती सरकारकडे मागणी करावी. निरनिराळ्या राज्यांत धान्यवसुलीचें प्रमाण निराळें आहे. तुटीच्या राज्यांत धान्य-

---

१ परदेशांतून धान्याची आयात

| वर्ष | टन धान्य | किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १९४८ | २८,४१,००० | १२९,७२,००,००० |
| १९४९ | ३७,०६,००० | १४४,६०,००,००० |
| १९५० | २१,२५,००० | ८०,६०,००,००० |
| १९५१ | ४७,२५,००० | २१६,३५,००,००० |

वसुलीचें शेंकडा प्रमाण जास्त असतें व वाढीच्या राज्यांत कमी असतें. मध्यवर्ती सरकार या बाबतींत राज्यावर दडपण आणूं शकत नाहीं. शिवाय प्रत्येक राज्यांत माणशीं धान्य खाण्याचें प्रमाण १३/४ पासून ५॥ मणांपर्यंत आहे. या सर्व आपत्तींतून सुटण्यासाठीं मध्यवर्ती सरकार रेशनिंग उठविण्याच्या मार्गे आहे. मुंबई व बंगालशिवाय रेशनिंग उठविलें, तर कोठेंच आपत्ति येणार नाहीं. कोरियन युद्ध होत नाहीं असें ठरल्यानंतर जगांतील व्यापारी आपले सांठे बाहेर काढूं लागले. सरकारनेंहि चलन कमी व्हावें म्हणून बँकेच्या व्याजाच्या दरांत वाढ केली व कर्जाऊ दिल्या जाणाऱ्या रकमा आंखडत्या घेतल्या. त्याचा परिणाम बऱ्याच वस्तूंच्या किंमती कमी होण्यांत झाला. चलनवाढीची संपलेली भीति; सांठेबाजीपासून अधिक पैसा राहोच, पण कमी पैसा मिळेल ही वाटूं लागलेली भीति; आणि परदेशांतून वाटेल तेवढें मिळणारें धान्य;—या तीन गोष्टींमुळे यापुढे रेशनिंग टिकविणें सरकारला जड जाईल.

तथापि, अन्नाच्या बाबतींत असो किंवा उद्योगधंद्यांच्या बाबतींत असो, हिंदुस्थाननें स्वयंपूर्ण होण्याचें ठरविलें आहे. आज सरकारचें स्वयंपूर्णता हें ध्येय आहे. त्याकरितांच नियोजन आहे. पांच-सहा वर्षांत हीं स्वयंपूर्णता गांठतां येईल, असा सरकारला विश्वास आहे. त्या नियोजनाकरितां जवळजवळ २००० कोटी रुपयांचा संकल्प केला आहे. त्या नियोजनांत शिक्षण, आरोग्य, ग्रामोद्योग, लहान उद्योग, मोठे धंदे, धरणें, विद्युत्-उत्पादन, रस्ते वगैरेंचा समावेश आहे. हे २००० कोटी ६ वर्षांत कोठून आणणार हा प्रश्न आहे. आज सरकारला भांडवल मिळत नाहीं म्हणून त्यांनीं रेव्हेन्यू बजेटाच्या शिलकीवर, राज्यांच्या शिलकीवर व परदेशाच्या मदतीवर विसंबून योजना केली आहे. ती यशस्वी होईल अशी सरकारला खात्री आहे.

सरकारचें हे प्रचंड प्रयत्न चालले असतां जनता मात्र थंडगार आहे! जनतेंत कोणत्याहि प्रकारचा उत्साह दिसत नाहीं. काँग्रेसला जनतेनें मतें दिलीं; पण अंतःकरण दिलें नाहीं. ही उदासीनता केवळ काँग्रेसच्या बाबतींतच आहे असें नाहीं. विनोबांच्या भूदानयज्ञाच्या बाबतींत सुद्धां हीच उदासीनता दिसून येईल. त्याचें कारण शोधून काढणारा मानसशास्त्रज्ञ पुढें आला पाहिजे.

### कापूस, ज्यूट व साखर

हिंदुस्थानला जवळ जवळ ४० लाख गांठी कापूस लागतो. फाळणी झाली तेव्हां आमच्याकडे फक्त १९ लाख गांठी कापूस पिकत होता. पाकिस्तान-बरोबर करार करूनहि कापूस मिळेना. बाहेरून कापूस आणला—तो लांब धाग्याचा व महाग पडूं लागला. ही अडचण दूर करण्याचा सरकारनें प्रयत्न केला. कपाशीची लागवड वाढविली आणि १९ लाखांवरून ३४ लाखांपर्यंत हें पीक गेलें. या-पेक्षां तूर्त तरी वाढ केली जाणार नाहीं. आज हिंदुस्थान कपाशीच्या बाबतींत जवळजवळ स्वयंपूर्ण झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तागाच्या ७५ लाख गांठी आम्हांला लागतात. पाकिस्ताननें त्याहि बाबतींत करारभंग केला. पण ती इष्टापत्तीच ठरली. हिंदुस्थाननें तागाचें उत्पादन ५० लाखांपर्यंत आणून ठेवलें आहे. पुढील वर्ष-दोनवर्षांत तागाच्या बाबतींतहि आपण स्वयंपूर्ण होऊं शकूं.

तिसरा प्रश्न साखरेचा. हिंदुस्थानांत १३ लाख टन साखर तयार व्हावयास पाहिजे, पण गेल्या वर्षी ९॥ लाख टनच उत्पादन झालें. त्या वेळचे अन्न-मंत्री श्री. मुनशी यांनीं साखरकारखानदारांना '९॥ लाख टनांवर जी साखर उत्पन्न कराल ती उघड्या बाजारांत विका' अशी सवलत दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं, काळा बाजार बंद झाला. यंदाच्या वर्षीं साखरेचें उत्पादन १५ लाख टन झालें. इतकें उत्पादन अधिक नफ्याच्या आशेनें कारखान-दारांनीं केलें. पण त्यांना अपेक्षित किंमती मिळाल्या नाहींत आणि साखर नियंत्रित भावापेक्षांहि थोडीशी स्वस्त मिळूं लागली. तेव्हां स्वयंपूर्णतेच्या दृष्टीनें हाहि प्रश्न सुटला. सिमेंट, लोखंड वगैरेंच्या बाबतींतहि बरीच प्रगति झाली असून आपण अल्प काळांत त्याहि बाबतींत स्वयंपूर्ण होऊं शकूं.

### दूरदर्शी योजना

चित्तरंजनचा रेल्वे एंजिनें तयार करण्याचा कारखाना आतां सुरू होऊन एंजिनें बाहेर पडूं लागलीं आहेत. तसाच सिंद्रीचा खताचा कारखानाहि सुरू झाला असून त्यांतून खत निघत आहे. या-

शिवाय बंगळूरचा टेलिफोनचा कारखाना, देहूचा पेनिसिलीनचा व दिल्लीचा डी. डी. टी.चा कारखाना, कांडलाचें मोठें बंदर, विजगापट्टमूचा जहाजें बांधण्याचा कारखाना, अंबरनाथचा मशीन टूल्सचा कारखाना, ब्रायकोअर केब्ल्सचा कारखाना वगैरे योजना मूर्त स्वरूप धारण करूं लागल्या आहेत.

पं. जवाहरलालजींच्या प्रेरणेनें हिंदुस्थानांत १२ शास्त्रीय प्रयोगालयें अगर संशोधन-केंद्रें सुरू झालीं आहेत, त्यांचा नामनिर्देश करणें जरूर आहे: (१) नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी (२) नॅशनल केमिकल लॅबोरेटरी (३) नॅशनल मेटॅलर्जिकल लॅबोरेटरी (४) फ्युएल रिसर्च इन्स्टिटयूट (५) सेंट्रल ग्लास इन्स्टिट्यूट (६) सेंट्रल रोड रिसर्च इन्स्टिटयूट (७) सेंट्रल फूड टेक्नॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिटयूट (८) सेंट्रल ड्रग रिसर्च इन्स्टिटयूट (९) सेंट्रल इलेक्ट्रो-केमिकल रिसर्च इन्स्टिटयूट (१०) सेंट्रल लेदर रिसर्च इन्स्टिटयूट (११) बिल्डिंग रिसर्च इन्स्टिट्यूट (१२) कोल सर्वे स्टेशन्स. या सर्व संशोधन-केंद्रांवर जवळजवळ ६ कोटी रुपये खर्च होणार आहेत. शास्त्रीय संशोधनाशिवाय राष्ट्राची प्रगति, संरक्षण व उत्कर्ष होत नाहीं. सध्यांच्या शास्त्रीय युगांत हिंदुस्थानला मागें पडून कसें चालेल?

### लहानसहान धंदे

लहानसहान धंद्यांच्या बाबतींतहि हिंदुस्थान स्वयंपूर्ण होऊं लागला आहे. ३० पेक्षां अधिक धंदे असे आहेत कीं, जे येथें आतां सुरू झाले आहेत व त्या मालाची आयात बंद झाली आहे. दरवर्षी अधिकाधिक धंदे कसे व्यापतां येतील याचा प्रयत्न सुरू आहे. पण अजून विमानें, मोटारी, यांसारखे मोठाले धंदे संपूर्णपणें येथें झाले नाहींत. त्यांना सुरुवात झाली आहे. वृत्तपत्रीय कागदाचें असेंच आहे. त्या बाबतींत तर आम्ही परावलंबी आहों. पण आतां नेपाचा कारखाना सरकारनें हातांत घेतला आहे. त्यांतून आमची कांहींशी गरज भागेल.

कापड, तागाचें कापड, कोळसा, चहा, तंबाखू, मिरी वगैरेची निर्यात करून हिंदुस्थानला बरेच पैसे मिळतात.

आज जर धान्याची आयात मोठ्या प्रमाणावर करण्याचा प्रसंग आला नसता, तर हिंदुस्थान निराळाच देश दिसला असता. तथापि, आयात पदार्थांच्या बाबतींत सरकार अत्यंत दक्षतेनें वागतें व अनावश्यक आयात करीत नाहीं.

### निरनिराळीं खातीं

ध्वनिक्षेपण, कामगारांचे प्रश्न, आरोग्ययोजना व औषधें, शिक्षण, पोस्ट व तारखातें, रेल्वे, निर्वासितांचें पुनर्वसन, घरें वगैरे बाबतींत केलेली प्रगति मामुली नाहीं. प्रत्येक खात्याचा स्वतंत्रपणें विचार केला, तर प्रगतीचें स्वरूप स्पष्ट दिसून येईल.

मध्यवर्ती सरकार जशी प्रगति करीत आहे, तशी बऱ्याच घटकराज्यांतूनहि प्रगति झालेली आहे. गेलेला काळ फक्त पांचच वर्षांचा आहे हें लक्षांत ठेवलें म्हणजे निराश होण्याचें राहोंच, पण आशावादी होण्याला पुष्कळच वाव आहे, हें लक्षांत येईल.

हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति समाधानकारक आहे. जे २००० कोटी रुपयांच्या योजना आंखूं शकतात ते आर्थिक दृष्ट्या सुप्रतिष्ठित आहेत असें आम्ही तर म्हणतोंच, पण परकीं राष्ट्रेंहि मानतात. गेल्या पांच वर्षांत केलेल्या या प्रगतीला शेंकडों कोटींचें खतपाणी घातलें आहे. हजारों कोटींचें पुढें घातलें जाणार आहे. हिंदुस्थानचें भवितव्य उज्ज्वल आहे; पण त्या उज्ज्वल भवितव्याशीं समरस होण्याला अद्याप हिंदी माणूस तयार होत नाहीं हें दुर्दैव आहे.

वरील समालोचनावरून अर्थात् कोणी समाधानाच्या प्रवाहांत वाहून जाऊं नये! सरकारच्या हातून चुका होतात, अवास्तव खर्च होतो, अंदाज चुकतात, लांचलुचपती थांबत नाहींत आणि जनतेला आपण किनाऱ्याला लागलों आहों असें वाटत नाहीं. ह्या सर्व उणीवा आहेत हें लक्षांत ठेवूनहि 'हें माझें राष्ट्र आहे व त्या राष्ट्राचा मी आहें' अशी उच्च भावना आमच्यांत येईल, तर आजची काळोखी रात्र जाईल आणि उद्यांचा प्रसन्न व आल्हाददायक उषःकाल उदय पावेल.

———

' भारतीय स्वातंत्र्याचे जनक ' म. गांधी यांचे लोकशाहीविषयक कांहीं विचार

# • • • लोकशाहीचा खरा अर्थ

## पाश्चात्त्यांची लोकशाही

हिंदुस्थानांत परकीयांच्या हातून आपल्या हातांत राज्यसत्तेचें संक्रमण होणें हें हिंदी राष्ट्रीय जीवनाला अत्यंत जिव्हाळ्याचें असलें, तरी नुसतें सत्तेचें संक्रमण होऊन माझें समाधान होणार नाहीं. युरोपांतील लोकांना राजकीय सत्ता आहे, पण स्व-राज्य नाहीं ! आशियांतील आणि आफ्रिकेंतील लोकांची युरोपियन लोक आपल्या राज्यकर्त्यांकरवीं पिळणूक करतात आणि स्वतःच आपापल्या देशांत लोकशाहीच्या पवित्र नांवानें तेथील मूठभर अधिकारी वर्गाकडून पिळले जातात ! युरोपीय लोकशाहीचें उघडेंनागडें स्वरूप वर्णन करावयाचें झालें, तर युरोपीय जनता दंडुकेशाहीच्या-हिंसेच्या जोरावर पिळली जात आहे.

पाश्चात्त्य लोकशाहीला हा जो रोग झाला आहे त्याचा खरा नायनाट, जनतेनें प्रतिहिंसा करून करूं म्हटलें तरी होणार नाहीं. हिंसेचा विजय तात्पुरता, क्षणिक असतो असा इतिहासाचा आतांपर्यंतचा अनुभव आहे. हिंसेनें उलट हिंसाच जास्त वाढली आहे. म्हणून मला तरी असें वाटतें कीं, युरोपीय जनतेला खरें स्वराज्य पाहिजे असेल, तर तिला आज ना उद्यां अहिंसेचा अवलंब करावाच लागेल. अर्थात् सबंध समाज एकदम अहिंसेचा अवलंब करील याची आशा नाहीं हें खरें. पण त्यामुळें मी खचून जात नाहीं. आजच्या घटकेला जर निकड कशाची असेल, तर ती अहिंसेच्या प्रत्यक्ष मोठ्या प्रयोगाची इतकी नसून, स्वराज्याचा किंवा दास्य-मुक्तीचा खरा अर्थ काय हें नक्की समजून घेणें ही होय.

—(' यंग इंडिया ' ३-९-२५)

लोकशाही आणि हिंसक साधनें यांचें साहचर्य अशक्य आहे. आजची तथाकथित लोकशाही राष्ट्रें, आडपडदा न ठेवतां बोलावयाचें झाल्यास, हुकुमशाही राष्ट्रेंच होत. त्यांना जर खरी लोकशाही प्रस्थापित करावयाची असेल, तर त्यांनीं धैर्यानें अहिंसेचा अवलंब केला पाहिजे. अहिंसा ही व्यक्तीलाच शक्य आहे आणि व्यक्तींच्या बनलेल्या राष्ट्रांना शक्य नाहीं, असें म्हणणें आपणां मानवांना लांछन आहे.

—(' हरिजन ', १२-११-३८)

## लोकशाही वृत्तीचें संवर्धन

ज्याला जात्याच लोकशाही प्रिय आहे त्याला जात्याच शिस्तहि प्रिय असते. सर्वसाधारणपणें मानवी वा दैवी कायदे पाळण्याची ज्याला संवय आहे, त्याच्या ठिकाणीं लोकशाही वृत्ति आपोआपच उत्पन्न होईल. लोकशाही वृत्ति अंगीं बाणलेल्या माणसानें संपूर्णतया निःस्वार्थी बनलें पाहिजे. त्याचे विचार आणि त्याच्या आकांक्षा स्वतःपुरत्याच किंवा पक्षापुरत्याच संकुचित न राहतां, त्या लोक-शाहीशीं तन्मय झाल्या पाहिजेत. तरच त्याला सविनय कायदेभंग करावयाचा हक्क राहील. निरामय, प्रामाणिक मतभेदांमुळें लोकशाहीचें नुकसान कधींच होणार नाहीं. परंतु संधिसाधुपणा, दंभ आणि जुलुमाचा रामराम म्हणून घडवून आणलेले समेट हे मात्र लोकशाहीला हानिकारकच होतील.

व्यक्तीला स्वातंत्र्य असावें असें मी मानतों. पण त्याबरोबरच हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, मनुष्य हा प्रामुख्यानें सामाजिक आहे. सामाजिक प्रगतीला आवश्यक अशा रीतीनें आपलें व्यक्तित्व विकसित करण्याचा प्रयत्न करीत करीतच मानवानें सध्यांचा दर्जा प्राप्त करून घेतला आहे. अनिर्बंध व्यक्तिवाद म्हणजे जंगलांतील पशूंचा कायदा होय. व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाज-नियंत्रण या दोहोंमधील सुवर्णमध्य साधायला आपण मानवच शिकलों आहोंत. सबंध समाजाच्या कल्याणाकरितां समाजाचें नियंत्रण खुषीनें स्वीकार-ण्यानेंच व्यक्ति आणि ज्याचा ती घटक आहे

---

हे उतारे ' Selections from Gandhi ' by N. K. Bose या पुस्तकांतून साररूपानें अनुवादित करून घेतले आहेत.—का. सं.

तो समाज या दोघांची समुन्नति होत असते.
—('हरिजन', २७-५-३९.)

### व्यक्तिस्वातंत्र्य

जनतेचें स्वराज्य किंवा खरी लोकशाही ही असत्य आणि हिंसामय साधनांनीं केव्हांहि प्रस्थापित होणार नाहीं. त्याचें सरळ कारण असें कीं, असत्य आणि हिंसामय साधनांचा परिणाम प्रतिपक्षाला दडपून टाकून किंवा त्याचा नायनाट करून विरोध उरूं न देण्यांत होईल. मग व्यक्तिस्वातंत्र्य कोठलें शिल्लक उरणार ? संपूर्ण, निर्भेळ अहिंसेच्या वातावरणांतच व्यक्तिस्वातंत्र्याला संपूर्ण वाव मिळणें शक्य आहे.—('हरिजन', २७-५-३९)

### अल्पसंख्याकांचे हक्क

लोकशाहींत बहुसंख्याकांचें राज्य असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत त्याचा अर्थ मर्यादितच आहे. तपशिलाच्या बाबतींत बहुसंख्याकांचें अल्पसंख्याकांनीं मानावें हें ठीक आहे. परंतु बहुसंख्याकांचे निर्णय कसेहि असोत, ते आपण मान्य केलेच पाहिजेत, असें असणें म्हणजे गुलामगिरीच होय. लोकांनीं मुक्या मेंढरांप्रमाणें वागणें म्हणजे लोकशाही नव्हे. लोकशाहीनें व्यक्तीचें मतस्वातंत्र्य आणि कृतिस्वातंत्र्य यांचें रक्षण डोळ्यांत तेल घालून केलें पाहिजे—('यंग इंडिया', २-३-२२).

सदसद्विवेकबुद्धीच्या कक्षेंत येणाऱ्या गोष्टींच्या बाबतींत बहुसंख्याकांचा कायदा लागू नाहीं.
—('यंग इंडिया', ४-८-२०)

आम्हांला असें राज्य पाहिजे आहे कीं, ज्यांत अल्पसंख्याकांचीं मतें दंडुकेशाहीनें नव्हे, तर हृदय-परिवर्तनाच्या मार्गानें मिळविलीं जातात. गोरी लष्करशाही जाऊन त्याऐवजीं काळी लष्करशाही येणें हाच जर लोकशाही राज्याचा अर्थ असेल तर त्याकरितां एवढा आटापिटा तरी कशाला करायचा ?—('यंग इंडिया', १९-१२-२९).

---

स्वातंत्र्यप्रेरणेचे एक महान् निर्माते श्रीअरविंद यांचे विचार

# लोकशाही आणि व्यक्तिस्वातंत्र्य

### आधुनिक लोकशाहीचें स्वरूप

लोकशाहीनें आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण हमखास होऊं शकेलच अशी खात्री नाहीं. उलट पक्षीं, अलीकडील लोकशाही सरकारें वैयक्तिक स्वातंत्र्याचा इतक्या संघटित आणि पद्धतशीर रीतीनें नाश करण्याच्या मार्गावर आहेत कीं, त्यांच्यापुढें जुन्या सरंजामशाह्या किंवा राजेशाह्या कांहींच नव्हत ! अर्थात्, जुन्या राजेशाह्या म्हटल्या म्हणजे आपल्या डोळ्यांपुढें त्यांनीं केलेला अरेरावी, पाशवी जुलूम उभा राहतो. तसा जुलूम उदारमतवादी पद्धतीवर आधारलेल्या या लोकशाही सरकारांकडून होत नाहीं, हें खरें; व त्या दृष्टीनें हा मोठाच फायदा आहे. परंतु लोकशाही व्यक्तिस्वातंत्र्याचें जें अपहरण करतें तें दिसायला अधिक संभावित, सूक्ष्म, कायदेशीर आणि सौम्य प्रकारचें असलें, तरी असें असल्यामुळेंच तें स्वातंत्र्यापहरण परिणामीं सर्वंकष झालें आहे. बहुसंख्याकांचा अल्पसंख्याकांवर जुलूम ही एक आधुनिक लोकशाहीची नित्याचीच गोष्ट होऊन बसली आहे.

लोकशाहीचा जो मूळ उदय झाला त्या वेळीं

---

वरील उतारे श्रीअरविंद यांच्या 'The Ideal of Human Unity' आणि 'The Human Cycle' या दोन ग्रंथांतून सार-रूपानें अनुवादित करून घेतले आहेत. या ग्रंथांतील लेख पहिल्यांदा श्रीअरविंदांच्या 'आर्य' मासिकांतून १९१५ ते १९१८ पर्यंत क्रमशः येऊन गेले.—सुमारें दोन पिढ्यांपूर्वीं प्रकट केलेले त्यांचे विचार आजहि अद्ययावत् वाटण्यासारखे आहेत. त्यावरून श्रीअरविंदांच्या वैचारिक 'दूरदर्शित्वा'ची वाचकांस साक्ष पटेल—का. सं.

# लोकशाही आणि व्यक्तिस्वातंत्र्य

व्यक्तिस्वातंत्र्य हें ध्येय होतें. ग्रीकांच्या लोकशाही-विषयक कल्पनेंत दोन विचार प्रामुख्यानें अंतर्भूत होते : एक म्हणजे शासनसंस्थेमध्यें (म्हणजे कायदे करणें, राज्यकारभार करणें यांमध्यें) प्रत्येक व्यक्तीला भाग घेतां यावा; दुसरा म्हणजे प्रत्येक व्यक्तीला आपापल्या वृत्तीनुरूप विकास करावयास स्वातंत्र्य मिळावें. पण हीं दोन्हींहि वैशिष्ट्यें आधुनिक लोकशाहींत नांदूं शकत नाहींत. मोठमोठ्या लोकशाही राष्ट्रांमधून स्व-राज्याचा खोटा भास उत्पन्न केला जात असून सामान्य नागरिकाला, वेळोवेळीं कांहीं प्रतिनिधी निवडून देण्यापलीकडे, राज्यसंस्थेंत खरा परिणामकारक भाग घेतांच येत नाहीं.

विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य आणि संघटन-स्वातंत्र्य हीं तीन स्वातंत्र्यें लोकशाहीचें वरदान होत, असें मानलें जातें आणि तें योग्यहि आहे. परंतु आधुनिक शासनसंस्थांचा इतिहास पाहतां हीं स्वातंत्र्ये अबाधित राहतील याची शाश्वती नाहीं. या सर्व स्वातंत्र्यांचा संक्षेप करीत करीत सर्वाधिकारी सत्तारूढ सरकारें विचारस्वातंत्र्याचें अपहरण करतील. जीवनाला आकार देणारी विचार ही एक मोठी शक्ति आहे, हें ओळखून शासनसंस्था विशिष्ट विचारसरणीच्याच छापाचें शिक्षण देऊन व्यक्तीच्या विचारांचेंहि नियंत्रण करील !

## अराज्यवादाकडे—!

मानवाची बुद्धि ही संजीवनदायी आणि सृजनशील आहे. मानवी बुद्धितत्त्वाचा जर अप्रतिहत विकास होत गेला तर तो तर्कदृष्ट्या क्रमप्राप्त अशा तीन अवस्थांनीं होईल : पहिली अवस्था व्यक्तिप्रधान लोकशाहीची; या अवस्थेंत व्यक्तिस्वातंत्र्याला प्राधान्य आहे. दुसरी अवस्था समाजवादाची; या अवस्थेंत शासनसंस्थेंत साम्यवादी 'कम्युनिझम्' प्रस्थापित होऊन, शासनसंस्था किंवा सरकार ह्यालाच प्राधान्य राहील. तिसरी अवस्था—जर ती विचारकक्षेंतून प्रत्यक्ष व्यवहारांत येणें शक्य झालें तर—अराज्य-वादाची (anarchistic). या अवस्थेंत सामाजिक सहकार्य हें ऐच्छिक परस्परभ्रातृभावावर आधारलेलें राहील; शासनसंस्थेला यांत प्राधान्य राहणार नाहीं. ही तिसरी अवस्था जेव्हां येईल तेव्हां येवो, पण या तिसऱ्याच अवस्थेंत मानवी बुद्धितत्त्वाच्या सामर्थ्याची कसोटी लागणार आहे. आमच्या स्वभावाला वळण लावण्याचें, आमच्या अहंकारापासून उत्पन्न होणारे संघर्ष टाळून आमचे प्रश्न सोडविण्याचें आणि समाजनियंत्रणाचें निर्दोष तत्त्व प्रस्थापित करण्याचें सामर्थ्य मानवी बुद्धीला आहे कीं तिला कांहीं निराळ्याच—तिच्या पलीकडे असलेल्या—तत्त्वाला शरण जावें लागणार आहे, हें या तिसऱ्या अवस्थेंतच दिसून येणार आहे. मानवी बुद्धितत्त्वाचा तिसऱ्या अवस्थेप्रत विकास होईपर्यंत, 'फोर्स'चेंच—भौतिक बळाचेंच—साम्राज्य राहणार आहे.

## स्वातंत्र्यसंपन्न व्यक्ति

सर्व जगाचें एक समाजवादी सरकार (Socialistic World State) स्थापन होऊन त्यांत विचारस्वातंत्र्याला स्थान राहावयाचें असेल तर त्या शासनसंस्थेचें स्वरूप अराज्यवादाकडे झुकेल; मग तो टाल्स्टॉयसारखा आध्यात्मिक अराज्यवाद असो कीं इतर बौद्धिक अराज्यवाद असो ! या जागतिक शासनसंस्थेला व्यक्तीला आपला विकास करायची संपूर्ण संधि द्यावी लागेल व 'शासनसंस्था' ही एक अनिष्ट गोष्ट आहे असें मानावें लागेल. 'शासनसंस्था किंवा इतर दुसरें कोणतेंहि नियंत्रण यापासून मुक्त अशा ऐच्छिक परस्परसहकार्यावर व बंधुभावनेवर आधारलेला समाज हें आमचें ध्येय आहे' असा त्या जागतिक शासनसंस्थेला पुरस्कार करावा लागेल.—पण असा व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार या जागतिक शासनसंस्थेला झेपेल का ?—व्यक्तिस्वातंत्र्य प्रत्यक्ष व्यवहारांत आलें, तर तें शासनसंस्थेच्या मुळावरच घाव घालील. आणि शासनसंस्था असा आपल्या मुळावरच घाव घालूं देणार नाहीं ! ती व्यक्तिस्वातंत्र्याला वाव देणारच नाहीं ! शेवटीं जागतिक शासनसंस्थेच्या शासनाखालील समाजहि स्थितिशील आणि प्रगतिशून्य राहील. स्वातंत्र्य-संपन्न व्यक्ति हीच खरी प्रगति घडवून आणूं शकते. स्वातंत्र्यसंपन्न व्यक्तीच्या सृजनशील आणि चैतन्य-दायी संस्पर्शानेंच समाज प्रगति करूं शकतो.

---

प्रा. भा. शं. भणगे

# सोविएट लोकशाहीचें स्वरूप

केवळ उण्यापुऱ्या पसतीस वर्षांच्या अनुभवावरून सोव्हिएट राजवटीचें स्वरूप ठरवावें लागतें. जुन्या राजवटीहून आमूलाग्र आणि सर्वथा नव्या राजवटीच्या प्रयोगासाठीं हा काळ अत्यंत तोकडा ठरतो. तशांत ह्यांतील कांहीं वर्षें देशांतील पदभ्रष्ट वर्गाशीं आणि प्रबळ भांडवलशाही राष्ट्रांशीं मुकाबला करण्यांत आणि दुसऱ्या महायुद्धांत गेलीं. शत्रूंना यशस्वी रीतीनें तोंड देतांना नव्या राजवटीच्या प्रवर्तकांना आपल्या कल्पनेंतील कांहीं तत्त्वें आणि कार्यक्रम बाजूला ठेवावे लागले असतील आणि कांहीं वेळा त्यांचा विपर्यास करण्याचीहि पाळी आली असेल. तसेंच, बाहेरचें जग ह्या प्रयोगाकडे साशंकतेनें पाहतें, फाजिल चौकस दृष्टीनें पाहतें, नकळत जुन्या दृष्टींतून पाहतें ! सोविएट राजवटीचें स्वरूप ठरवितांना ह्या सर्व अडचणी आहेत.

सोव्हिएट राजवटीनें अजून अंतिम स्वरूप गांठलें आहे असेंहि दिसत नाहीं. ती अजून उत्क्रांतीच्या स्थितींत आहे. १९१७–२४ च्या राजवटीपेक्षां १९२४–३६ ची राजवट अधिक कायद्याला धरून आणि लोकशाहीची होती आणि १९३६ नंतरची राजवट १९२४-३६ च्या पेक्षां अधिक कायदाबद्ध आणि लोकशाहीची दिसते. गेल्या ३५ वर्षांतील अडचणी दूर झाल्या तर आणि मागील अनुभवावरून पुढील राजवट आणखी लोकशाहीयुक्त होणें शक्य आहे.

## सोव्हिएट राज्यघटना

१९३६ सालची राज्यघटना रशियांत आज चालू आहे. ह्या घटनेप्रमाणें राज्याचा समाजवादी पाया घातला आहे, लोकशाहीची राज्ययंत्रणा घडविली आहे, नागरिकांचे मूलभूत हक्क आणि कर्तव्यें ठरविलीं आहेत आणि एकमेव राजकीय पक्षाचें आणि आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक गटांचें स्थान ठरविलें आहे. उत्पादनसाधनें समाजाच्या मालकीचीं आहेत. तीं सरकारी, सहकारी आणि सामुदायिक शेती ह्या स्वरूपांत आहेत. किसान आणि हस्तव्यावसायिक कामगार ह्यांच्याकडे फक्त स्वतःला काम करण्यासाठीं उपयोगी अशी मालमत्ता राहूं शकते. स्वतःची मिळकत, शिल्लक, राहतीं घरें, घरांतील वापरण्याच्या वस्तू ह्यांवर नागरिकांचा वैयक्तिक मालकी हक्क आहे. वारसा-हक्कसुद्धां आहे. काम करणें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य होय. जो काम करणार नाहीं, त्याला खावयालाहि मिळणार नाहीं. प्रत्येकानें आपल्या कुवतीप्रमाणें काम करावें. कामाप्रमाणें त्याला मोबदला मिळेल.

काम मिळणें हा नागरिकांचा हक्क आहे. सर्वांस काम देण्यासाठीं राष्ट्राचें अर्थनियोजन केलें जातें. कामाप्रमाणें विश्रांतीहि मिळते. दर दिवशीं चार ते आठ तास काम असतें. वर्षाला भरपगारी रजा असते. कामकऱ्यांसाठीं स्वास्थ्यगृहें, विश्रांतिगृहें आणि क्रीडांगणें ठेवलीं आहेत. आजार, अपंगता आणि वृद्धापकाळ ह्या अवस्थेंत सरकार शुश्रूषेची तरतूद करतें. प्राथमिक शिक्षण सर्वांस सक्तीचें आणि मोफत आहे. पुढील शिक्षणाला सरकारी मदत मिळते. शिक्षण देशी भाषेंत दिलें जातें. सर्वत्र स्त्रियांना पुरुषांबरोबरचे हक्क आहेत. त्यांना पुरुषांएवढी मजुरी मिळते. राष्ट्रीयत्व आणि वंश ह्यांवरून भेदभाव करणें कायदाबाह्य होय. देवालयापासून किंवा धर्मापासून राज्य आणि शिक्षण यांची फारकत केली आहे. धर्माप्रमाणें वागण्याचें आणि धर्मविरोधी प्रचार करण्याचें स्वातंत्र्य आहे. कामकरीवर्गाच्या हितास धरून आणि समाजवादी व्यवस्थेस धरून जेवढें देतां येईल तेवढें भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, मिरवणुका काढण्याचें, निदर्शनें करण्याचें आणि संघ बनविण्याचें स्वातंत्र्य, हीं दिलीं जातात. कोणासहि न्यायालयाच्या किंवा न्यायसमीक्षका-( प्रोक्युरेटर )च्या निर्णयावांचून पकडतां कामा नये. पत्रव्यवहाराचा आणि घराचा खाजगीपणा राखला जातो. घटनेप्रमाणें वागणें, सामाजिक मालमत्तेचें संरक्षण

करणें, लष्करी चाकरी करणें आणि देशाशीं इमान राखणें हीं नागरिकांचीं कर्तव्यें आहेत.

रशिया हें कामगार-किसानांचें राज्य आहे. त्यांच्या प्रतिनिधींचीं सोविएट्स (Soviets = स्थानिक मंडळें) हींच राजकीय सत्तेचें अधिष्ठान होत. अशीं सोविएट्स खेडीं, शहरें, जिल्हा अशा थराथरानें सबंध देशभर ठेवण्यांत आलीं आहेत. सोविएटवरील प्रतिनिधी प्रौढ (अठरा किंवा अधिक वर्षें वयाच्या) नागरिकांकडून समान, प्रत्यक्ष आणि खाजगी मतदानपद्धतीनें निवडले जातात. प्रत्येक प्रतिनिधीनें आपल्या कामाचा अहवाल मतदारांस दिला पाहिजे. मतदार बहुसंख्येनें आपल्या प्रतिनिधींना परत बोलावूं शकतात.

रशिया हें अनेक प्रजासत्ताकांचें संघराज्य आहे. प्रत्येक प्रजासत्ताक घटकराज्य सार्वभौम आहे. संघराज्याच्या अधिकारमर्यादा घटनेच्या १४ व्या कलमांत निश्चित करण्यांत आल्या आहेत. प्रत्येक प्रजासत्ताक राज्याची घटना स्वतंत्र असून ती संघराज्याच्या घटनेला धरून आहे. कोणत्याहि प्रजासत्ताकास संघांतून फुटून निघतां येईल. प्रत्येक प्रजासत्ताकाची स्वतःची फौज आहे. प्रजासत्ताकांत सर्वोच्च सोविएट ही कायदे करण्याची संस्था होय. तिला जबाबदार असणारें असें प्रधानमंडळ ही अंमल करणारी संस्था होय. प्रजासत्ताकापेक्षां लहान भागांत (स्थानिक भाग, जिल्हा वगैरे) तेथील सोविएट हीच कायदा करणारी संस्था होय. कार्यकारी खातें म्हणून अध्यक्ष, उपाध्यक्ष, चिटणीस आणि कांहीं सदस्यांचें एक मंडळ निवडलें जातें.

संघराज्यांतील कायदे करणारी सर्वोच्च सोविएट ही संस्था दोन समाधिकारी सोव्हिएट 'गृहां'ची बनली आहे: संघाची सोविएट आणि राष्ट्रकांची सोविएट. संघसोविएटमध्यें तीन लाख प्रजेला एक प्रतिनिधि ह्याप्रमाणें सबंध देशांतून सदस्य निवडले जातात. दुसऱ्या सोविएटमध्यें राष्ट्रकांमधून सदस्य निवडले जातात. एकदां निवडलेल्या सोविएटची मुदत चार वर्षें आहे. दोन्हीं गृहांच्या एकत्र बैठकींत 'प्रेसिडिअम्' निवडली जाते. प्रेसिडिअम्‌मध्यें एक अध्यक्ष, सोळा उपाध्यक्ष, एक चिटणीस आणि पंधरा सभासद असतात. सर्वोच्च सोविएटचें अधिवेशन चालूं नसतांना तिचें काम प्रेसिडिअम्‌कडे असतें. सर्वोच्च सोविएटला जबाबदार असणारें 'कमिसारिअत्' (मंत्रिमंडळ) निवडलें जातें.

न्यायदानासाठीं स्वतंत्र न्यायखातें आहे. संघाचें, प्रजासत्ताकाचें, जिल्ह्यापर्यंतच्या सर्व भागांत सर्वोच्च न्यायालय असतें. तें त्या भागांतील सर्वोच्च सोविएटकडून निवडलें जातें. न्यायालयांतील कामकाज त्या त्या भागांतील भाषेंत चालतें. आरोपीस स्वसंरक्षणाचा अधिकार आहे. खटल्याचें काम सर्वांसमक्ष चालतें. न्यायाधीश स्वतंत्र असतात. ते फक्त कायद्यानें बांधलेले आहेत. लहान-थोर हे सर्व कायदा पाळतात हें पाहण्यासाठीं प्रत्येक भागांत समीक्षक (प्रोक्युरेटर) असतो. जिल्हा आणि इतर कनिष्ठ भागांत जनतेचीं न्यायालयें आहेत. तीं तेथील नागरिकांनीं सार्वत्रिक, प्रत्यक्ष, समान आणि खाजगी मतदानपद्धतीनें निवडलेलीं असतात. ह्या प्रत्येक भागांतहि न्यायसमीक्षक असतात.

ह्यावरून लक्षांत येईल कीं, रशियाची राज्यघटना पाश्चात्त्य देशांसारखी लोकशाहीची आहे. मताधिकार पूर्ण लोकशाहीचा आहे. आरंभीं झारची नातेवाईक मंडळी, धर्मोपासक, जमीनदार आणि नफेबाज भांडवलशहा या सोविएटच्या शत्रूंचा मताधिकार काढून घेतला होता. पण नव्या घटनेंत त्यांनाहि मताधिकार आहे. जनतेचे इतर हक्कहि ह्या देशांत मान्य केले आहेत. भाषणस्वातंत्र्यादि हक्क 'कामकरी जनतेच्या हिताला धरून आणि समाजवादी व्यवस्थेला धरून' असले पाहिजेत असें बंधन आहे खरें. पण अशीं बंधनें भारतासकट इतर देशांच्या घटनेंतहि आहेत. रशियाच्या १९२४ च्या घटनेंत अंमलबजावणी आणि कायदा हीं खातीं एक होतीं. 'क्रांतीचा कायदेशीरपणा' (Revolutionary Legality) असें एक तत्त्व होतें. त्यामुळें बेकायदेशीर वर्तनसुद्धां कायदेशीर ठरत असे. १९३६ च्या घटनेंत इतर लोकशाही देशांतल्याप्रमाणें अंमल आणि कायदा हीं खातीं वेगळीं केलीं आहेत व न्यायखातें स्वतंत्र आहे. संघराज्यांतील सर्वोच्च सोविएटच्या दोनतृतीयांश बहुमतानें घटना बदलतां येते.

पाश्चात्य लोकशाह्यांमध्यें नसणारे लोकशाहीचे अनेक अंश रशियांत आहेत. राष्ट्रीय गटांना आणि वंशांना रशियांत जें स्वातंत्र्य दिलें जातें तें इतर देशांत नाहीं. दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, कानडा, अमेरिका ह्या देशांत ह्या बाबतींत लोकशाही दिसत नाहीं. रशियांत घटक प्रजासत्ताक राज्यांना आणि नागरिकांना जे हक्क दिले आहेत त्यांचा वापर करतां यावा यासाठीं फक्त ह्याच देशांत व्यवस्था करण्यांत आली आहे. स्वायत्त प्रजासत्ताक राज्यांना फुटून निघण्याचा अधिकार बजावतां यावा म्हणून त्याच्या आड संघराज्यानें येऊं नये अशी काळजी घेण्यांत आली आहे. गेलें युद्ध चालूं असतांनाहि प्रजासत्ताकाला स्वतंत्र फौज ठेवण्याचा अधिकार दिला आणि संरक्षण व युद्ध हीं खातीं पूर्वी संघराज्याचीं होतीं त्याऐवजीं संघांतील प्रजासत्ताकांचीं बनविलीं. नागरिकांना कामधंदा मिळावा म्हणून समाजवादी अर्थयोजना केली आहे. माणसानें माणसाची पिळणूक करूं नये म्हणून सामाजिक मालकीचें तत्त्व प्रस्थापित केलें आहे. भाषणस्वातंत्र्य बजावण्यासाठीं गिरण्यांतून, सहकारी संस्थांतून वगैरे मोफत सभागृहें ठेवण्यांत आलीं आहेत. मुद्रणस्वातंत्र्यासाठीं छापखाने आणि कागद पुरविण्यांत येतात. एकदां निवडून दिलेले प्रतिनिधी परत निवडणुका होईपर्यंत बेजबाबदार बनूं नयेत म्हणून त्यांना परत बोलावितां येईल अशी सोय करण्यांत आली आहे.

### भांडवलशाही—विरुद्ध—समाजवाद

पाश्चात्य लोकशाह्या भांडवलशाही आहेत, तर सोविएट लोकशाही समाजसत्तावादी आहे हा महत्त्वाचा फरक होय. पाश्चात्य लोकशाहींत नागरिक राजकीय दृष्ट्या सारखे होत, परंतु आर्थिक बाबतींत ते असमान आहेत. त्यामुळें गरीब नागरिकास मताचा अधिकार आणि इतर स्वातंत्र्यें असूनहि त्यांचा उपयोग त्याला करतां येत नाहीं. इंग्लंडमध्यें ९० टक्के कामगारांस चौदाव्या वर्षानंतर शिक्षण नसतें. श्रीमंतांचीं मुलें ‘ पब्लिक स्कूल’मध्यें जातात आणि महत्त्वाच्या सर्व नोकऱ्या विशेषतः ह्या‘ पब्लिक स्कूल्स’मधून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांना मिळतात. ह्या वर्गांतूनच समाजाचे नेते निर्माण होतात. उलट, कामगारवर्गांतील नेत्यांना सभा घेण्यासाठीं कांहीं सभागृहें मिळूं शकत नाहींत. छापखाने, कागद, रेडिओ धनिकांच्या हातीं आहेत. विधिमंडळें आणि वरिष्ठ अधिकारी भांडवलदारांचे हस्तक बनले आहेत. न्यायखातें भांडवलदारांचें पाठीराखें बनलें आहे. विद्यापीठें भांडवलदारांचीं पीठें बनलीं आहेत. उद्योगधंदे मूठभर मक्तेदारांच्या हातीं आहेत. त्यांना ‘ कर्तुमकर्तुम् ’ अशी सत्ता प्राप्त झाली आहे. राज्यकर्त्यांच्या आणि सबंध समाजाच्या नाड्या आज त्यांच्या हातीं आहेत. त्यांनीं सामाजिक आणि सांस्कृतिक मूल्यांची पूर्ण विकृति करून टाकली आहे. अमेरिकेंत हे दोष विशेषत्वानें दिसतात. तेथें ‘ पासष्ट कुटुंबें ’ किंवा ‘ एक हजार अमेरिकन लोक ’ देशांतील संपत्ति नियंत्रित करीत आहेत. तेच अदृश्य आणि अनभिषिक्त राज्यकर्ते होत. ते रूझवेल्टसारख्या राष्ट्राध्यक्षाला हतबल करूं शकतात. सेंट लॉरेन्स नदीच्या धरणासारखे उपयुक्त कार्यक्रम ते अशक्य करून सोडतात. त्यांनीं पोसलेले गुंड आणि गुन्हेगार प्रवृत्तीचे लोक राजकारण चालवितात. त्यांच्या प्रोत्साहनानें ‘ कु-क्लुक्स-क्लॅन ’ सारखी गुप्त संघटना काळ्यांचे निर्घृण खून पाडते ! तेच कांहीं नेत्यांना, प्राध्यापकांना, कलावंतांना, सज्जनांना आणि नीग्रोंना कम्युनिस्ट म्हणून त्यांच्यावर छाप मारून, कम्युनिस्टांबरोबर त्यांचीं बनावट छायाचित्रें छापून त्यांना आयुष्यांतून उठवतात; रशिया आणि कम्युनिझमची हूल उठवून लष्करी अधिकाऱ्यांना राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून आणण्याचा घाट घालतात. मानवी मूल्यांची विकृति एवढी होते कीं, विद्यापीठांतील विद्यार्थिनींच्या चड्ड्या पळविण्याची ‘मोहीम’ विद्यार्थी काढतात ! आर्थिक असमानतेचा हा मूळ रोग रशियांत नाहीं. तेथें ‘कामाप्रमाणें दाम’ एवढीच असमानता असते. परंतु एवढी जरी असमानता असली, तरी त्या असमानतेमुळें श्रीमंत झालेल्यांनीं गरिबांची पिळणूक करणें, त्या श्रीमंतीवर आधारलेला सामाजिक आदर्श बनविणें, हें अशक्य करण्यांत आलें आहे.

### स्वतंत्रता आणि समता

भांडवलशाही लोकशाहीचा भर स्वातंत्र्यावर आहे, तर समाजवादी लोकशाहीचा भर समतेवर



अनुक्रमणिका






आहे. भांडवलशाही लोकशाहींत स्वातंत्र्यांतून पुढें समता स्थापिली जाईल असें सांगण्यांत येतें. स्वतंत्र माणसें समतेची मागणी करतील आणि समतेची निर्मिति करण्यास तीं स्वतंत्र आहेत, अशी ही विचारसरणी आहे. ह्या भांडवलशाही लोकशाहीचे पुरस्कर्ते समाजवादी लोकशाहीवर असा आक्षेप घेतात कीं, समाजवादी लोकशाहींत समता स्थापन करतांना माणसांचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें जातें. परंतु भांडवलशाही समाजांत तरी समता कोठें स्थापतां येते ? भांडवलशाही आज मक्तेदारीच्या अवस्थेंत आहे. लोकशाहीच्या नांवाखालीं मक्तेदारांची हुकुमशाही चालू आहे आणि स्वातंत्र्य बेगडी ठरत आहे. ही मक्तेदारी, ही भांडवलशाही नष्ट केल्याशिवाय पाश्चात्त्य लोकशाहींत समता येणें अशक्य आहे. उलट पक्षीं, समानता असलेल्या समाजवादी भांडवलशाहींत स्वतंत्रता असणें शक्य आहे. ही स्वतंत्रता अधिक व्यापक अर्थाची होय. स्वतंत्रता म्हणजे व्यक्तित्वाच्या विकासाची संधि. ही संधि समानतानिष्ठ समाजांतच अधिक मिळेल. बरें, समाजवादी देशांत समतेसाठीं स्वतंत्रतेची हत्या होणें अटळ आहे असें नाहीं. समाजवादाचीं समता आणि स्वतंत्रता हीं दोन्हींहि उद्दिष्टें आहेत. विरोध मोडून काढण्यासाठीं समाजवादी देशांत स्वतंत्रतेची गळचेपी करावी लागते, पण ती फक्त कांहीं काळच. कारण समतेबरोबर स्वतंत्रताहि स्थापल्यावांचून समाजवादी क्रांतीची पूर्तता होऊंच शकत नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत घेतां स्वतंत्रतेनंतर समता कीं समतेनंतर स्वतंत्रता ह्या प्रश्नाचें उत्तर देणें अशक्य ठरतें.

### नवी लोकशाही

समाजवादी रशियांतील लोकशाही सर्वांगीण आहे. पाश्चात्त्य लोकशाह्यांप्रमाणें ती केवळ राजकीय बाबतींपुरती मर्यादित नाहीं. लोकशाहींत समाजजीवनांतील प्रत्येक घडामोडींत लोकांचा सहकार असावयास हवा. त्यासाठीं एक नवी दृष्टि, नवा उत्साह लहान-थोरांत निर्माण व्हावयास हवा. उत्पादनसाधनांची मालकी सामाजिक करून, व्यक्तीच्या नफ्याऐवजीं, समाजाच्या उपयोगासाठीं समाजानें उत्पादन करावयाचें ( production for community consumption ) हें तत्त्व अस्तित्वांत आल्यामुळें तेथें जनतेंत नवा उत्साह निर्माण झाला आहे. समाजासाठीं काम करणें हें पवित्र कर्तव्य मानलें जातें. आपलें भवितव्य आपल्या हातीं आहे, असा नवा विश्वास तेथील समाजांत निर्माण झाला आहे. देव-धर्मादींबद्दलच्या अंधश्रद्धा नष्ट झाल्या आहेत. समाजासाठीं अधिकांत अधिक उपयुक्त काम करावयाचें हाच धर्म समजण्यांत येतो. वेब पतिपत्नी ह्यानीं ह्या नव्या तत्त्वज्ञानास शास्त्रीय मानवतावाद ( Scientific Humanism ) असें सार्थ नांव दिलें आहे. समाजासाठीं काम करतांना नागरिक सहकारी आणि सामुदायिक संस्था चालवीत आहेत. सरकारी खात्यांतून आणि धंद्यांतूनहि नागरिकांचें सहकार्य घेण्यांत येतें. मजूरचळवळींत नागरिक भाग घेतात. त्यांनीं ग्राहकांच्या सहकारी संस्था ( Consumers' Co-operatives ) चालविल्या आहेत. निवडणुकांपूर्वीं आणि अन्य वेळींहि कांहीं विशिष्ट प्रश्न असल्यास सरकारनें ते चर्चेसाठीं ठेवले असतांना त्यांवर संपूर्ण चर्चा होते. प्रत्येक व्यक्ति नागरिक, उत्पादक आणि ग्राहक ह्या तिन्ही भूमिकेंत सहकार्य करतांना आढळते. त्यामुळें वेब पतिपत्नी रशियाला 'बहुविध लोकशाही' ( Multi-form Democracy ) अशी संज्ञा देतात.

### एकमेव कम्युनिस्ट पक्ष

ह्या बहुविध लोकशाहींत कोणती एक गोष्ट विचारवंताला खुपत असेल, तर ती एकाच प्रकारच्या सर्वगामी एकतेची. तेथें एकच एक राजकीय पक्ष आहे आणि तो म्हणजे कम्युनिस्ट पक्ष. या एकाच पक्षाच्या दिग्दर्शनाखालीं सर्व नागरिक वागत असतांना ही बहुविधता दिखाऊ आहे अशी शंका येते. रशियांत राजकीय पक्ष एकच आहे ह्यांत शंका नाहीं. फॅसिस्ट इटलीं आणि जर्मनी यांच्या राज्यघटनेंत एकाच पक्षाला स्थान देऊन त्याला सरकारचाच एक अवयव बनविलें होतें. रशियाच्या घटनेंत कम्युनिस्ट पक्षाला तसें स्थान नसलें, तरी अप्रत्यक्षपणें त्या एकाच पक्षाला मान्यता देण्यांत आली आहे. घटनेच्या १२६ आणि १४१ या कलमांत राजकीय पक्षांचा संदर्भ आला आहे. तेथें फक्त कम्युनिस्ट










पक्षाचा उल्लेख केला आहे. १२६ व्या कलमांत म्हटलें आहे : “कामगारवर्गातील अत्यंत कार्यक्षम आणि राजकीय जागृति झालेले नागरिक सोविएट संघराज्याच्या कम्युनिस्ट पक्षांत संघटित होतात–”. १४१ व्या कलमांत म्हटलें आहे : “निवडणुकीसाठीं उमेदवारांचीं नांवें सुचविण्याचा अधिकार कामकरी जनतेच्या सामाजिक संघटनांना दिला आहे : कम्युनिस्ट पक्षाच्या संस्थांना, मजूरसंघांना, सहकारी संस्थांना, तरुणांच्या संघटनांना, आणि सांस्कृतिक संघांना”. घटनेवरील भाषणांत स्टॅलिननेंसुद्धां रशियांत कम्युनिस्ट पक्ष हा एकच राजकीय पक्ष आहे असें मान्य केलें आहे. राज्यांत एकच राजकीय पक्ष असला तर तेथें लोकशाही असूं शकेल काय, असा प्रश्न साहजिकच विचारला जातो.

रशियांत असणाऱ्या या एकमेव पक्षाच्या बाजूनें कांहीं गोष्टी कबूल कराव्या लागतात. आतांपर्यंत रशियांत एकमेव कम्युनिस्ट पक्ष असावा हें अटळ होतें. मेन्शेविक पक्ष आणि सोशल रेव्होल्यूशनरी पक्ष–या दोन्ही पक्षांत १९१७ सालीं फूट पडून त्यांतील कांहीं माणसें बोल्शेविक (कम्युनिस्ट) पक्षाच्या बाजूस गेलीं आणि कांहीं बोल्शेविकांच्या राजवटीस विरोध करूं लागलीं. नव्या राजवटीला आपल्या सुरक्षिततेसाठीं विरोधकांचा मोड करावा लागला. बोल्शेविक पक्ष आमूलाग्र नवी समाजरचना करीत होता आणि बलाढ्य परराष्ट्रांशीं टक्कर देत होता. अशा वेळीं विरोध टिकूं देणें परवडणार कसें ? गेल्या महायुद्धांत डंकर्क पडल्यावर (१९४०), इंग्लंडमध्यें तरी विरोधी पक्षांचें अस्तित्व खरोखर कितपत राहिलें ?

रशियांत पक्ष एकच असला तरी त्या एकमेव पक्षानें आपल्या विशिष्ट पद्धतीनें लोकशाही स्थापन केली आहे. पक्षाच्या घटनेंत आणि कार्यपद्धतींत लोकशाही आहे. पक्षाची उभारणी ‘उत्पादन–आणि–क्षेत्र’ अशा प्रकारच्या पायावर केली आहे. ज्या (कारखाना, ऑफिस, शेत वगैरे) ठिकाणीं एखादी व्यक्ति काम (उत्पादन) करीत असेल त्या ठिकाणीं पक्षाची प्राथमिक संस्था बनते. ह्या संस्थेंत निदान तीन सदस्य असले पाहिजेत. नंतर जिल्हा, प्रजासत्ताक राज्य वगैरे क्षेत्रांतील सर्व प्राथमिक संस्थांची त्या त्या क्षेत्रासाठीं संघटना होते. त्या त्या क्षेत्रांतील पक्षसंघटनेची परिषद् भरते. सबंध संघराज्याची परिषद् सर्वाधिकारी असते. त्या परिषदेचे सदस्य कनिष्ठ क्षेत्रांतील पक्षपरिषदांकडून निवडलेले असतात. प्रत्येक कम्युनिस्टानें आपआपल्या कामाच्या ठिकाणीं इतरांस शिक्षण दिलें पाहिजे आणि इतरांचें नेतृत्व केलें पाहिजे. त्याबरोबरच इतरांस शिकविणाऱ्यानें आणि नेतृत्व देणाऱ्यानें त्यांच्यापासून स्वतः शिकलें पाहिजे. स्टॅलिननें आपल्या अलीकडच्या एका भाषणांत ह्या गोष्टीवर फार भर दिला आहे. प्रत्येक पक्षसंस्थेचे अधिकारी सदस्यांकडून निवडले जातात. ह्या अधिकाऱ्यांना आपल्या कामाचा अहवाल पक्षसदस्यांना द्यावा लागतो. ह्या अहवालावर पक्षसदस्य खुली चर्चा करतात. स्टॅलिननें म्हटलें आहे कीं, नेहमीं वरून खालीं दरारा ठेवण्याची प्रवृत्ति असते, पण खालून वर वचक ठेवणें अत्यंत आवश्यक आहे. अशा तऱ्हेनें ‘अंतःपक्षीय लोकशाही’ (Inner-Party Democracy) अस्तित्वांत येते. अशी चर्चा झाल्यावर जे निर्णय बहुमतानें घेण्यांत येतात ते अल्पमतवाल्यांनीं आणि वरिष्ठ संस्थेचे निर्णय कनिष्ठ संस्थांनीं मानलेच पाहिजेत. ह्या तत्त्वास ‘लोकशाहीयुक्त वरिष्ठशाही’ (Democratic Centralism) असें म्हणतात.

पक्षसदस्यांची जनतेपासून फारकत होऊं नये, त्यांनीं जनहिताविरुद्ध जाऊं नये म्हणून लेनिननें पक्षसफाई-(Party-cleansing)ची पद्धत घालून दिली. दर कांहीं वर्षांनीं ठिकठिकाणीं सभा भरतात. पक्षसदस्यांनीं आपल्या कामाची माहिती द्यावयाची. त्यांना कोणीहि प्रश्न विचारूं शकतो. ज्याचें काम समाधानकारक नसेल त्याची पक्षांतून हकालपट्टी होते. अशा रीतीनें पक्षसफाई होत असते.

रशियांतील एकमेव पक्ष आणि फॅसिस्ट इटली व जर्मनींतील एकमेव पक्ष ह्यांमध्यें हा लोकशाहीचा फरक आहे. डॉ. हरमन् फायनरनें दाखविल्याप्रमाणें कम्युनिस्ट पक्षांतील ही लोकशाही दोन कारणांमुळें आली आहे : बोल्शेविक क्रांतीचा मूळ उदार उद्देश

आणि पक्षाच्या आरंभापासून पडत आलेली प्रथा हीं तीं दोन कारणें होत. बोल्शेविक क्रांति झारशाही उलथून पाडण्यासाठीं, जगांतील अत्यंत भयानक अशी झोटिंगशाही नष्ट करण्यासाठीं होती. त्या क्रांतीनें नवी समाजरचना करावयाची होती. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता हीं तत्त्वें क्रांतिकारकांची प्रेरक शक्ति होती. तसेंच, पक्षांतील तेज वाढविण्यासाठीं आणि पक्षांत प्रामाणिक आणि कार्यक्षम माणसें आणण्यासाठीं लेनिननें पक्षांत स्वतंत्र चर्चा करण्यास उत्तेजन दिलें. आज स्टॅलिनची कांहींहि इच्छा असली तरी त्याला ही प्रथा मोडणें अवघड आहे.

## अनेकपक्ष–विरुद्ध–एकपक्ष

कम्युनिस्ट पक्षांत अंतर्गत लोकशाही आहे असें मान्य केलें तरी दुसरा एक असा प्रश्न उद्भवतो कीं, एकपक्ष आणि लोकशाही सुसंगत आहेत काय? लोकशाही म्हणजे लोकांमधील पूर्ण चर्चेनंतर घेतलेल्या निर्णयांवर आधारलेलें सरकार, अशी एक कल्पना आहे. लोकशाही म्हणजे लोकमताप्रमाणें बदलतां येणारें सरकार अशी आणखीहि एक कल्पना आहे. लोकशाहीची ह्यांपैकीं कोणतीहि कल्पना घेतली तरी लोकशाहीसाठीं एकापेक्षां अधिक पक्षांची गरज आहे असें बहुधा समजलें जातें. अनेक पक्ष असले, तर प्रत्येक पक्ष आपला स्वतंत्र दृष्टिकोन लोकांपुढें ठेवतो. सर्व दृष्टिकोन लक्षांत घेऊन त्यांपैकीं कोणता बरोबर आहे ह्याबद्दल लोकांना खुली चर्चा करतां येते. किंबहुना लोकमतांतील भेदाप्रमाणें हे पक्ष निर्माण झालेले असतात. पक्ष केवळ लोकमताचा वाहक आहे. प्रत्येक पक्ष बहुमत मिळवून सरकार बनवूं शकतो. त्यामुळें बहुमत मिळविण्यासाठीं किंवा टिकविण्यासाठीं प्रत्येक पक्ष जनतेला शिक्षण देऊन, जनतेमध्यें वावरून जनतेचा विश्वास मिळविण्याचा सतत प्रयत्न करीत असतो. एखाद्या पक्षाचें सरकार नको असेल तर इतर पक्ष तें बदलूं शकतात. आतांपर्यंत फक्त पाश्चात्त्य देशांत लोकशाही होती. तेथें अनेक पक्ष आहेत. त्यामुळें लोकशाहीस अनेक पक्षांची गरज आहे अशी विचारसरणी रूढ झाली. उलट, एकपक्षीय राज्यांतसुद्धां खुली चर्चा होऊं शकते. रशियांत १९३६ च्या घटनेवर दोन वर्षें चर्चा झाली. सरकारच्या प्रत्येक ठरावरील लोकप्रतिनिधींमध्यें चर्चा होते. कम्युनिस्ट पक्षांत चर्चा होते. कम्युनिस्ट पक्ष लोकांना शिक्षण देण्याचें आणि त्यांच्यामध्यें चर्चा घडवून आणण्याचे सतत प्रयत्न करतो. लहान-मोठ्या वर्तमानपत्रांतून टीका-प्रतिटीका होत असतात. रशियांत बरेंच असमाधान आहे असें दाखविण्यासाठीं रशियाचे शत्रू तेथील वर्तमानपत्रांतले उतारे देत असतात. त्यावरून एक गोष्ट निश्चित दिसते कीं, रशियांत अशी टीका करण्याचें स्वातंत्र्य आहे. कम्युनिस्ट पक्षाचें मुखपत्र 'प्रवदा', सरकारचें मुखपत्र 'इझ्वेस्ता' आणि मजूर-चळवळीचें मुखपत्र 'ट्रुड' यांमधून अशी बरीच टीका येते. लेनिननें म्हटलें आहे : 'समाज जेवढा अधिक जागृत असेल तेवढें राज्य जास्त प्रबल असतें, असें आम्हांला वाटतें. जनतेला प्रत्येक गोष्ट कळत असली, प्रत्येक गोष्टीवर तिला आपलें मत बनवितां आलें आणि तिला प्रत्येक गोष्ट पूर्ण जाणिवेनें करतां आली तर राज्य प्रबळ होतें." जनतेच्या प्रत्येक संघटनेंतून—मजूरसंघ, कारखाना, शेत वगैरेमधून—रशियांत चर्चा चालू असते. महत्त्वाच्या प्रश्नांवर लोकमत अजमावण्यासाठीं ते प्रश्न सरकार लोकांपुढें ठेवतें. उदा०, १९२५ मध्यें न नोंदलेले विवाह नोंदलेल्या विवाहांसारखेच मानावेत काय याबद्दल, आणि १९२७ मध्यें जमीनदारवर्ग नष्ट करून शेतकऱ्यांची सामुदायिक शेतीमध्यें संघटना करावी कीं काय ह्याबद्दल, दोन-दोन वर्षें देशाच्या कानाकोपऱ्यांतून सभा होऊन चर्चा करण्यांत आली. रशियांतील प्रत्येक व्यक्ति उत्पादक, ग्राहक आणि नागरिक ह्या तिन्हीं नात्यांनीं जगत असल्यामुळें कोणत्याहि विवाद्य प्रश्नावर त्याला आपुलकी वाटते. भांडवलशाही समाजांत, जिथें माणसांच्या आशा-आकांक्षांचा चुराडा झालेला असतो तिथें, सामान्य माणूस अशा प्रश्नांविषयीं उदासीन राहतो. अनेक पक्ष असूनहि नागरिकांत चर्चा घडविण्याचें काम त्यांच्याकडून होत नाहीं. पार्लमेंटसभेंत मात्र विरोधी पक्ष अधिकारारूढ पक्षावर टीका करीत असतो. परंतु ह्या टीकेवर पडलेल्या मर्यादा उद्वेगजनक असतात. वेळ अपुरा असतो; चर्चा








प्रश्नांच्या गुणावगुणांवर न होतां अधिकारारूढ व विरोधी पक्षांच्या गुणावगुणांवर, बलाबलावर होत असते. अधिकारी पक्ष आपलें सामर्थ्य दाखविण्यासाठीं विरोधी पक्षाचें म्हणणें बहुधा स्वीकारीत नाहीं. त्यामुळें आज अनेक पक्ष असलेल्या पाश्चात्य लोकशाहींत एका वेळीं एकच पक्ष असतो असें म्हणण्याची पाळी येते. खेरीज दोहोंपेक्षां अधिक पक्ष असलेल्या देशांत यशस्वी पक्षाचें जें सरकार बनतें त्याच्यामागील लोकमताचें प्रमाण पाहिलें तर तें अल्पमतवाल्यांचें सरकार असल्याचें आढळतें. विरोधास न जुमानतां फेरनिवडणुका होईपर्यंत तें अस्तित्वांत राहतें. त्यापेक्षां सदैव सबंध लोकमत अजमावून त्याप्रमाणें वागणाऱ्या रशियांतल्यासारखें एकमेव पक्षाचें सरकार अधिक बहुमतवालें होऊं शकेल.

अनेकपक्षीय लोकशाहींत सरकार बनविणारे प्रतिनिधी बदलतात तसेच ते एकपक्षीय लोकशाहींतहि बदलतात. फरक असा कीं, अनेकपक्षीय लोकशाहींत लोकप्रतिनिधींबरोबर (पक्षाबरोबर) तत्त्वें आणि कार्यक्रम बदलतात, तर एकपक्षीय लोकशाहींत तत्त्वें तींच राहून फक्त माणसें बदलतात. एकपक्षीय रशियांत सरकारचीं तत्त्वें बदलत नाहींत व त्याबद्दल त्यास दोष द्यावयास नको. त्या तत्त्वांसाठींच—समाजवादासाठींच—तें राज्य स्थापलें आहे आणि चाललें आहे. म्हणून रशियांत अनेक पक्ष असावे अशी अपेक्षा करणें चुकीचें आहे. ज्या समाजांत अनेक वर्ग असून प्रत्येक वर्गाचे हितसंबंध वेगळे असतात त्या समाजांत प्रत्येक वर्गाचा एक ह्याप्रमाणें अनेक पक्ष असूं शकतील. पण रशियांत तशी गरज नाहीं. हीच गोष्ट स्टॅलिननें सांगितली आहे. पण त्यासाठीं स्टॅलिनची गरज नसून हॅरॉल्ड लास्की ह्या ग्रंथकाराच्या लिखाणांतूनहि ह्या गोष्टीवर बराच भर दिलेला दिसतो. रशियांत जर कामगार-किसान हा एकच वर्ग आहे, त्याचें जर एकच तत्त्वज्ञान आहे तर तेथें एकच पक्ष असूं शकतो. तेथें विरोधी पक्ष निर्माण झाला तर तो विरोधी तत्त्वें बाळगणाऱ्यांचा नसून केवळ असंतुष्टांचा होय.

### पक्षच नको

वर अनेकपक्षीय लोकशाही आणि एकपक्षीय लोकशाही ह्यांची तुलना केली. पण पुढें रशियांत त्या एका पक्षाचीहि गरज राहूं नये. आतांपर्यंत विरोध मोडून काढण्यासाठीं, नवा समाज स्थापण्यासाठीं त्या पक्षास सर्वाधिकार दिले. कांहीं वेळां त्या पक्षानें आपलें तत्त्वज्ञान लोकमतांत बळकट करण्यासाठीं (उदाहरणार्थ, ऑक्टोबरच्या क्रांतीचें श्रेय ट्रॉट्स्कीला नसून फक्त स्टॅलिनला आहे अशा प्रकारचा) सत्याचा अपलाप केला आणि (इतिहासकार पौक्रोव्हस्कीसारखीं) कालचीं चांगलीं माणसें आज वाईट ठरविलीं. परंतु पुढें विरोध नष्ट झाला आणि समाजवादी तत्त्वज्ञान प्रस्थापित झालें म्हणजे ह्या पक्षाचें कार्य संपलें असें समजावें. मग त्याचें अतिरेकी वर्तनहि त्याच्याबरोबर संपुष्टांत येईल. केवळ भांडवलशाहींतून समाजवादांत स्थित्यंतर होत असतांनाच्या काळांत अशा पक्षाची गरज असते, नंतर नाहीं, असेंच मार्क्स-एंगेलसच्या लिखाणावरून दिसतें. रशियाच्या सध्यांच्या घटनेसाठींहि पक्षाची गरज नाहीं. पक्ष नष्ट झाल्यावरच ही घटना पूर्ण लोकशाहीची होईल. जोंपर्यंत पक्ष अस्तित्वांत आहे तोंपर्यंत समाजवादी तत्त्वांच्या चौकटींत पक्षाचा एकच कार्यक्रम बसविला जातो. पण त्याऐवजीं भिन्न भिन्न कार्यक्रम लोकमताप्रमाणें बसविण्याची सोय केली पाहिजे. उदा०, समाजवादी तत्त्वें कायम ठेवूनहि, लहान धंद्यांस उत्तेजन द्यावें कीं मोठ्या धंद्यास उत्तेजन द्यावें, केंद्रीकरण करावें कीं विकेंद्रीकरण करावें, सामाजिक मालकीचे धंदे सरकारी खात्यांनीं चालवावे कीं स्वतंत्र मंडळांनीं चालवावे, सामुदायिक शेती करावी कीं सहकारी शेती करावी, वगैरे प्रश्नांवर मतभिन्नता असूं शकते. पक्ष नष्ट झाला तरच ह्या मतभिन्नतेप्रमाणें समाजवादी कार्यक्रम बदलूं शकेल. पण हा पक्ष नष्ट होण्यासाठीं अनुकूल परिस्थिति जेव्हां निर्माण होईल, तेव्हांच हें सर्व होऊं शकेल.



अनुक्रमणिका

श्री. कृ. ना. फडके

# नवचीनच्या लोकशाहीची पार्श्वभूमि व स्वरूप

ता. २४ एप्रिल १९४९ रोजा चिनी जनतेच्या लाल फौजेनें चँक-काय-शेकच्या लष्करी सामर्थ्याचा पाडाव करून नानकिन शहरांत प्रवेश केला आणि त्याच दिवशीं चिनी कम्युनिस्ट पक्षानें चँगची राजवट उद्ध्वस्त झाल्याची घोषणा केली. लाल फौजेच्या ह्या विजयानें चीनच्या इतिहासांतच नव्हे, तर जगाच्या इतिहासांत एका नव्या युगाला सुरुवात झाली. विशेषतः वसाहत आणि निमवसाहत-देशांतहि राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचें स्वरूप चीनच्या ह्या विजयानें निर्णायकपणें पालटलें. तेथील जनतेनें साम्राज्यविरोधी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांतील आजवरचा बचावाचा पवित्रा टाकून उघडपणें चढाईच्या रोखानें आगेकूच करण्याची तयारी सुरु केली. वसाहतदेशांमधील राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत नवा जोम, नवा आत्म-विश्वास उफाळूं लागला. वसाहतदेशांत—विशेषतः अशियाखंडांतील वसाहतदेशांत—आज साम्राज्य-शाही राष्ट्रांना बचावाचे डावपेंच खेळणें भाग पडत आहे. स्वाभाविकच, चीनमध्यें उदयास आलेल्या ह्या नव्या राज्यसत्तेच्या स्वरूपाकडे व तिच्या आविष्काराकडे साऱ्या जगाचें लक्ष वेधून राहिलेलें आहे.

## क्रांतिकारक अनुभवाची पार्श्वभूमि

चीनमधील नव्या राष्ट्रीय सत्तेचा उदय ही एक मामुली राजनैतिक उलथापालथ नसून ती सत्ता ही एका समाजक्रांतीची द्योतक आहे. ह्या समाजक्रांती-मागें क्रांतिकारक अनुभवाची जी पूर्वपीठिका आहे ती लक्षांत न घेतां, त्या समाजक्रांतींतून उदयास आलेल्या सत्तेच्या स्वरूपाचें अगर तिच्या ऐतिहासिक कार्यभागाचें निदान करणें अथवा तिच्या सामर्थ्याचें मोजमाप करणें शक्य होणार नाहीं.

चीनमधील राज्यक्रांति कम्यूनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालीं घडून आली असतां तेथील कम्यूनिस्ट पक्षाचे नेते, " चीनमध्यें समाजवाद स्थापन करणें अथवा तेथील भांडवलशाहीचें शिरकाण करणें हें आम्हीं स्थापन केलेल्या सत्तेचें उद्दिष्ट नाहीं; तसेंच, तेथें कामगारवर्गाचें अधिराज्य आम्हांस प्रस्थापित करावयाचें नाहीं " असें स्पष्टपणें जाहीर करीत आहेत. एवढ्या एकाच गोष्टीवरून चीन-मधील कम्यूनिस्ट पक्षानें मार्क्सवादाला व लेनिन-वादाला रामराम ठोकला आहे, माओचा टिटो होण्याचीच शक्यता अधिक आहे, अशा प्रकारचे आशाळभूतपणाचे तर्क भांडवलशाही मुत्सद्दी व पत्रपंडित लढवूं लागले आहेत !

उलट, " चिनी कम्यूनिस्ट पक्षाचे नेते हे चीन-मध्यें लोकशाही प्रस्थापित करण्याचा बहाणा करीत असले आणि आपल्या राज्यसत्तेमध्यें कामगार-वर्गाशिवाय इतर वर्गांना, विशेषतः राष्ट्रीय भांडवल-दार वर्गाला सहभागी करण्याची मानभावीपणें तयारी दाखवीत असले, तरी त्यांची जातकुळी भिन्न आहे असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं; त्यांचा हा सारा बकवा त्यांच्या सत्ताग्रहणाच्या व्यूहरचनेचाच एक भाग आहे; तेथील राजवट ही वस्तुतः हुकुमशाही अथवा पोलिसी राजवट आहे," असा प्रचार देखील लोकशाहीचे अभिमानी म्हणविणाऱ्यांकडून तितक्याच आग्रहीपणानें करण्यांत येत आहे. कम्युनिस्टांच्या विरोधकांकडूनच नव्हे, तर चीनमधील प्रचलित राजवटीची कांहीं बाबतींत भलावणी करणाऱ्यांकडूनहि अशा प्रकारचा प्रचार होत असलेला आढळून येण्याचें कारण हेंच कीं, चीनमधील क्रान्तीला अनुभवाची जी पार्श्वभूमि आहे व तिला तत्त्वज्ञानाचें जें अधिष्ठान आहे त्याची यथार्थ कल्पना त्यांना नसते. म्हणून ह्या दोहोंचा आढावा घेऊन मगच चीनमध्यें प्रस्थापित झालेल्या राज्यसत्तेच्या स्वरूपाची तपशीलवार फोड करणें युक्त होईल.



अनुक्रमणिका






### कम्युनिस्ट पक्षाच्या प्रस्थापनेच्या वेळची स्थिति

चीनमधील राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढयाला १८४० सालापासून म्हणजे अफूसाठीं झालेल्या युद्धापासूनच सुरुवात झाली होती. त्या लढयाचें पर्व १९११ सालीं मंचू घराण्याच्या सत्तेचा पाडाव झाला तेव्हां समाप्त झालें. निर्भेळ राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढयाचा तो विजय होता असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु त्यानंतर परकीय साम्राज्यशाही राष्ट्रांनीं चीनमधील सरंजामदारवर्गातील लष्करशहांना हातीं धरून १९११ ची क्रांति अल्पावकाशांत धुळीला मिळविली आणि चीनमध्यें यादवीचें अराजक माजवून दिलें. ह्या अनुभवावरून चीनमधील सरंजामशाही व आक्रमक साम्राज्यशाही राष्ट्रें यांच्यामधील संबंध कोणत्या प्रकारचे आहेत ह्याची कल्पना क्रांतिकारक राष्ट्रवाद्यांना स्पष्टपणें येऊन चुकली. चीनमधील सरंजामशाही ही राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या शत्रुस्थानीं असल्याबद्दल त्यांच्या मनांत संदेह उरला नाहीं. तेथपासून पुढें सरंजामशाहीचा पाडाव हें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढयांतील एक अंगभूत कार्य होऊन बसलें. वर्गभेदातीत, निर्भेळ, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयवादाच्या अपुरेपणाची जाणीव स्वातंत्र्यवाद्यांना होऊन चुकली.

त्यानंतर पहिलें महायुद्ध सुरू झालें. लोकशाही सुसंरक्षित करण्यासाठीं ज्या दोस्तराष्ट्रांनीं तें महायुद्ध लढविलें व त्यांत वसाहतदेशांतील मनुष्यबळाचा संहार केला, त्याच राष्ट्रांनीं युद्ध समाप्त होतांच चीनसारख्या दोस्तराष्ट्राची निःशंकपणें लांडगेतोड केली. पाश्चात्त्य राष्ट्रांची लोकशाहीनिष्ठा व तेथील लोकशाहीचें स्वरूप ह्यांवर झगझगीत प्रकाश पडला. लोकशाहीच्या तत्त्वज्ञानानें व ध्येयवादानें जे तरुण पाश्चात्त्य लोकशाहीचे उपासक बनले होते व लोकशाही लढयांत पाश्चात्त्य राष्ट्रांच्या पाठिंब्याची अपेक्षा करीत होते त्यांचा व उद्योन्मुख भांडवलदारवर्गाचा पाश्चात्त्य लोकशाहीविषयी संपूर्ण भ्रमनिरास झाला! उलट, रशियामध्यें ऑक्टोबर क्रांतीनंतर प्रस्थापित झालेल्या सोविएट सत्तेनें रशियन साम्राज्यांत सामील झालेल्या परतंत्र राष्ट्रांविषयीं व परकीय देशांतील साम्राज्यशाही हक्क व हितसंबंध ह्यांविषयीं जें धोरण अल्पावधींत प्रत्यक्ष अंमलांत आणलें, त्यामुळें वसाहतदेशांच्या आकांक्षांविषयीं खरी सहानुभूति सत्ताधारी श्रमजीवी वर्गच दाखवूं शकतो, हें वसाहतदेशांमधील स्वातंत्र्यवाद्यांना कळून चुकलें. ह्याच सुमारास चीनमध्यें कम्युनिस्ट पक्षाची प्रस्थापना झाली. वसाहतदेशांतील राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा व समाजवादाच्या प्रस्थापनेचा लढा ह्यांच्या अन्योन्यसंबंधाच्या जाणीवेंत अधिक डोळसपणा आणण्याचें कार्य कम्युनिस्ट पक्षानें केलें.

### चिनी राष्ट्रवाद्यांना झालेली जाणीव

१९२४ सालीं डॉ. सन्यत्सेन ह्यांच्या नेतृत्वाखालीं क्यूओमिंटँग पक्षाची पहिली काँग्रेस भरली होती. ह्या काँग्रेसनें लोकशाहीच्या उद्दिष्टासंबंधीं जी घोषणा केली त्या घोषणेंत पाश्चात्त्य राष्ट्रांमधील लोकशाहीच्या वरपांगीपणासंबंधीं चिनी राष्ट्रवाद्यांना झालेल्या जाणीवेचा ध्वनि स्पष्टपणें उमटलेला दिसून येतो. पाश्चात्त्य लोकशाही व जनतेची अथवा जनताधीन लोकशाही ह्यांमध्यें मोजकेपणानें केलेला फरक त्या घोषणेंत आपणांस पाहावयास मिळतो. ‘ जनतेची लोकशाही ’ ह्या कल्पनेचा उगम त्या घोषणेंतूनच झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

ऑक्टोबरच्या सोविएट क्रान्तीमुळें जगांतील प्रत्येक देशांत कामगारचळवळीला उठाव आला व त्यांत सत्तासंपादनाच्या ध्येयवादाचा आत्मविश्वास व रगेलपणा उफाळूं लागला. कांहीं ऐतिहासिक कारणामुळें—विशेषतः चीनमधील जवळजवळ सर्व शहरांवर परकीय राष्ट्रांचा ताबा असल्यामुळें—चीनमधील कामगारवर्ग साम्राज्यशाहीविरोधी लढ्यांत त्वरेनें ओढला गेला. १९२५ सालच्या लढ्यांत चीनमधील कामगारवर्गानें केलेल्या सामुदायिक प्रतिकारानें राष्ट्रीय लढ्यांत आघाडीचें स्थान मिळविलें.

सन १९२५ ते १९२७ च्या दरम्यान चीनमधील नवोदित लोकशाहीसत्तेनें उत्तरेकडील जमिनदारशाहीविरुद्ध मोहीम सुरू केली. त्या मोहिमेंत चिनी कम्युनिस्ट पक्षानें क्युओमिंटँग पक्षाबरोबर संपूर्ण सहकार्य केलें व सशस्त्र प्रतिकाराच्या लढयाचा अनुभव प्राप्त करून घेतला; परंतु ह्या मोहिमेचें भवितव्य अखेर क्रांतिकारक










# नवचीनच्या लोकशाहीची पार्श्वभूमि व स्वरूप

जनतेच्या हातीं जाण्याचा संभव दिसूं लागतांच क्युओमिंटँगच्या नेत्यांनीं ती मोहीम सोडून कम्युनिस्टांची सरसहा कत्तल करण्याची मोहीम सुरू केली. ह्या मोहिमांत भांडवलदारवर्गातील अन्तर्भेद उजेडांत आले. तसेंच, राष्ट्रीय भांडवलदारवर्ग हा कांहीं एका मर्यादेपर्यंत साम्राज्यशाहीविरोधी व जमिनदारशाहीविरोधी लढयांत भाग घेतो ही गोष्ट खरी असली, तरी त्या लढयाच्या नेतेपणाची धुरा वाहावयास तो वर्ग सर्वथैव असमर्थ ठरतो, हें स्पष्ट झालें.

## राष्ट्रीय स्वातंत्र्यसंग्रामांतील संयुक्त आघाडी

त्यानंतर चिनी कम्युनिस्ट पक्षानें .कित्येक वर्षे वनवास पत्करून १९२८ ते १९३७ ह्या दहा वर्षांच्या काळांत सरंजामशाहीविरुद्ध एकाकी लढा दिला आणि चीनमध्यें शेतकरी क्रांतीचा पाया घातला. ह्या काळांतील लढयाच्या अनुभवांवरून कामगार-शेतकरीवर्गाची एकजूट, कामगारवर्गाच्या नेतृत्वाची आवश्यकता व महत्त्व, कामगारवर्गाच्या राजकीय पक्षाचा अर्थात् कम्युनिस्ट पक्षाचा क्रांतींतील कार्यभाग, लोकसेनेचें महान् कार्य ह्या सर्व बाबतींत कम्युनिस्ट पक्षानें महत्वाचे निष्कर्ष काढले व ते आत्मसात् केले. कामगार-शेतकरी-वर्गाची एकजूट हा लोकशाही आघाडीचा कणा असून ह्या एकजुटीच्या बळकटीवरच राष्ट्रीय भांडवलदारवर्ग, व्यवसायी वर्ग, श्रीमंत शेतकरीवर्ग ह्यांना लोकशाही मोर्चांत समाविष्ट करून घेतां येणें व त्यांना सतत आपल्याबरोबर ठेवणें शक्य असतें, हें ह्या काळांत आलेल्या अनुभवावरून चिनी कम्युनिस्टांना कळून चुकलें.

१९३७ सालापासून साम्राज्यविरोधी लढयाला पुन्हां तोंड लागलें. कम्युनिस्ट पक्षानें उभारलेल्या लोकशाही आघाडीला कामगार-शेतकरीवर्गाच्या एकजुटीचें अधिष्ठान असल्यानें, जपानी आक्रमणाचा प्रतिकार कणखरपणानें व दमदारपणानें करण्यांत कम्युनिस्ट पक्षाचे डावपेंच प्रभावी ठरले. उलट, चँग-च्या सरकारचा कमकुवतपणा उघड होऊन चीनमधील राष्ट्रीय भांडवलदारवर्ग, व्यवसायी वर्ग व इतर वर्ग ह्यांना संयुक्त आघाडीचें महत्त्व पटलें व ते राष्ट्रीय एकजुटीच्या मोहिमेचे आधारस्तंभ बनले. चँग-कै-शेकच्या सरकारला साऱ्या लोकशाही जनतेच्या दबावामुळें आपला कम्युनिस्टद्वेष गिळून जपान-विरोधी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या संग्रामांत कम्युनिस्ट पक्षाला समविष्ट करून घेणें भाग पडलें.

## नवलोकशाहीची प्रस्थापना

दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत कम्युनिस्ट पक्षानें राष्ट्रीय आघाडींत मानाचें स्थान मिळविलें, इतकेंच नव्हे, तर तो पक्ष साऱ्या चिनी जनतेचें आशास्थान बनून राहिला. शत्रूनें अर्धा अधिक देश व्यापला असतां देखील, यादवी युद्धाची आग भडकवून चिनी कम्युनिस्ट पक्षाला बदनाम करण्याचें चँगनें अनेकवार प्रयत्न केले. परंतु महायुद्धाच्या काळांत व त्यानंतरहि यादवी युद्ध टाळण्यासाठीं कम्युनिस्ट पक्षानें शिकस्तीचे प्रयत्न केले. चँगच्या भांडवल-शाही राज्यसत्तेचें दगलबाज स्वरूप पुरेपूर चव्हाट्या-वर येईपर्यंत व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठीं यादवी युद्ध अपरिहार्य आहे हें जनतेमधील हरएक विभागांना पटेपर्यंत चिनी कम्युनिस्ट पक्षानें राष्ट्रीय एकजूट टिकविण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले. चँगच्या पाठीशीं असलेल्या दलाली भांडवलदार-वर्गाला राष्ट्रीय स्वातंत्र्याची चाड नाहीं ही गोष्ट अगदीं उघड झाल्यावरच, चिनी कम्युनिस्ट पक्षानें लोकशाही जनतेचें नेतृत्व स्वीकारून चढाईची मोहीम सुरू केली व अखेर चँगच्या सत्तेचा निर्णायक-पणें पाडाव करून नानकिंगवर नवलोकशाही क्रान्तीचा झेंडा ता. २४ एप्रिल १९४९ रोजीं फडकविला. नंतरच्या पांच महिन्यांत कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालीं लाल फौजेनें चीनच्या खंड-प्राय भूमींतून चँगच्या सत्तेचें व परकीय साम्राज्य-शाहीच्या अवशेषांचें संपूर्ण निर्मूलन केलें आणि चीनमध्यें नव-लोकशाहीसत्तेच्या प्रस्थापनेसाठीं लोकशाही अघाडींत सामील असलेल्या सर्व वर्गांच्या व पक्षांच्या प्रतिनिधींची म्हणजेच जनतेची राजकीय सल्लागार-परिषद् भरवून, त्या परिषदेमार्फत चीनमध्यें नवलोकशाही सत्ता प्रस्थापित झाल्याची घोषणा केली.

चीनमध्यें सध्यां प्रस्थापित असलेली राजसत्ता ही राष्ट्रीय लोकशाही अघाडीची सत्ता आहे. राजकीय सल्लागार-परिषदेनें चीनसाठीं नजीकच्या काळा-






पुरती जी राज्यघटना मंजूर केली त्या घटनेच्या सरनाम्यांत ही गोष्ट स्पष्टपणें नमूद करण्यांत आलेली आहे. आणि ह्या घटनेनुसार प्रस्थापित होणाऱ्या सरकारनें चीनमध्यें नवलोकशाहीच्या तत्त्वावर राज्यकारभार चालवावा असा स्पष्ट आदेश त्या सरनाम्यांत देण्यांत आलेला आहे. चीनमध्यें प्रस्थापित झालेल्या सत्तेंत जनतेचें अधिराज्य राहणार असून, त्या सत्तेंत सरंजामदारवर्ग व दलालीखोर भांडवलदारवर्ग ह्यांना सहभागी होतां येणार नाहीं, हें उघडपणें नमूद करण्यांत आलें आहे.

सन १९११ च्या क्रांतीपासून तों १९३७ ते १९३९ पर्यंतच्या जपानविरोधी राष्ट्रीय प्रतिकाराच्या लढ्यापर्यंत चीनमधील जनतेला ज्या अनुभवांतून मार्ग चोखाळावा लागला त्यांचें पृथक्करण व संकलन करून, माओ-त्से-तुंगनें नवलोकशाहीच्या आदर्शांचा सिद्धान्त जगापुढें मांडला व नवलोकशाहीच्या प्रस्थापनेसाठीं व संवर्धनासाठीं अवलंबावी लागणारी रणनीति व राजनीति ह्यांचें सविस्तर विवेचन 'चीनची नवलोकशाही' ह्या आपल्या प्रबंधांत ग्रथित केलें. माओच्या नवलोकशाहीवरील ह्या प्रबंधानें मार्क्सवाद व लेनिनवाद ह्यांच्या विकासांत मोलाची भर टाकली आहे. ह्या प्रबंधाची गणना मार्क्सवादावरील प्रमाणभूत ग्रंथांत करण्यांत येतें.

ता. १ ऑक्टोबर १९४९ रोजीं चीनमध्यें नव्या प्रजासत्ताक राजवटीच्या प्रस्थापनेची घोषणा करण्यांत आली. माओचें नवलोकशाहीविषयक तत्त्वज्ञान हें ह्या नव्या राज्यसत्तेचें तात्त्विक अधिष्ठान होय.

## जनतेच्या विधायक प्रवृत्तीला आवाहन

१९२४ सालीं सन्-यत्-सेननें लोकशाहीसंबंधींच्या ज्या नव्या आकांक्षेची घोषणा केली, त्या आकांक्षेला ह्या नव्या लोकशाहीच्या प्रस्थापनेनें मूर्त स्वरूप देण्यांत आलेलें असल्यानें, ही नवी राज्यसत्ता आम चिनी जनतेच्या राष्ट्रीय आकांक्षांची प्रतीक बनलेली आहे. ही राज्यसत्ता खऱ्या अर्थानें जनतेची राज्यसत्ता आहे. जनतेचें शत्रुत्व पत्करलेल्या वर्गांना ह्या राज्यसत्तेंतून वगळण्यांत आलेलें आहे. ह्या सत्तेंत सहभागी होण्याचा त्या वर्गांना अधिकार ठेवलेला नाहीं. निर्भेळ लोकशाहीच्या चहात्यांना ह्यांत लोकशाहीचा संकोच झालेला आढळेल व तेवढ्या एकाच गोष्टीवरून ह्या सत्तेवर हुकुमशाहीचा आरोप ते करतीलहि. परंतु चीनमधील जनतेनें आपल्या अनुभवाचा निकष लावून नव्या राज्यसत्तेच्या लोकशाही स्वरूपाविषयींचा आपला कौल आपल्या कृतीनें दिलेला आहे. चीनमध्यें कायद्याचें राज्य नाहीं, तेथें पोलीसराज्य आहे असें एकीकडे म्हणत असतां, दुसरीकडे चीनमधील प्रस्थापित राज्यसत्तेला कामगार-शेतकरीवर्गांतील निरनिराळे थर, व्यवसायी वर्ग व राष्ट्रीय भांडवलदारवर्ग ह्यांचा पाठिंबा आहे, इतकेंच नव्हे, तर नव्या राज्यशासनाच्या व अर्थव्यवस्थेच्या उभारणींत वरील सर्व वर्ग उत्साहानें भाग घेत असून, त्या कार्यांत जनतेच्या विधायक शक्तींचा आविष्कार फार मोठ्या प्रमाणांत होत असलेला दिसत आहे, अशी कबुली ह्याच टीकाकारांना द्यावी लागली! निर्भेळ लोकशाहीवाद्यांना आपल्या वरील प्रकारच्या टीकेंतील विसंगति कळून येऊं नये हें संभवनीय आहे. परंतु समाजवादी म्हणविणाऱ्यांनीं वरील प्रकारच्या टीकेची 'री' ओढावी ह्याचें नवल वाटतें. जनतेच्या ठिकाणच्या विधायक शक्ति व तिची निर्माणक्षमता दडपशाहीच्या राजवटींत नष्ट होत असते हा समाजवादाच्या तत्त्वज्ञानामधील एक सिद्धान्त आहे. एखादा हुकुमशहा अगर एखादी नोकरशहांची जुलुमी जमात जनतेच्या विधायक प्रवृत्तींना व उत्साहाला इतक्या परिणामकारकपणें हांक देऊं शकते असें मानणें हें समाजवादाच्या मूलभूत सिद्धान्तांशीं सुसंगत आहे कीं मनुष्यस्वभावासंबंधींच्या फॅसिस्टांच्या निदानाशीं सुसंगत आहे, ह्याचें अनुसंधान समाजवादी टीकाकारांनीं तरी ठेवावयास पाहिजे.

## हंगामी राज्यघटना

चीनमध्यें सध्यां जी राज्यसत्ता अथवा राजवट प्रचलित आहे तिचें स्वरूप हंगामी आहे. प्रौढमतदानाच्या हक्कानुसार सार्वत्रिक निवडणुका घेऊन जनतेची जी परिषद् भरविण्यांत येईल त्या परिषदेकडेच जनतेच्या लोकशाहींतील सार्वभौमत्वाचे अधिकार राहतील. जनतेच्या राजकीय सल्लागार-





समितीनें मंजूर केलेली हंगामी राज्यघटना व त्या घटनेनुसार उभारण्यांत आलेली राज्यकारभारसंघटना ह्यांच्यापुढील मुख्य उद्दिष्ट अशा सार्वभौम परिषदेची पूर्व तयारी करणें हेंच राहणार.

केवळ एका सत्ताधारी वर्गाचा पाडाव करून दुसऱ्या वर्गानें अगर वर्गांनीं सत्ता हस्तगत केल्यानें क्रांतीचें कार्य तडीस जात नाहीं अगर चिरस्थायी होत नाहीं. प्रतिगामी वर्गांचा पाडाव ही क्रान्तीच्या रचनापर्वाची केवळ नांदी होय. वर्गशत्रूंचा रणांगणावर पाडाव करणें हें कार्य कठिण तर खरेंच, पण त्या शत्रूंचें समाजांतील व्यक्तींच्या मनावर जें अधिराज्य असतें त्याचा पाडाव करणें हें कार्य त्याहून किती तरी पटींनीं प्रचंड व कठिण असतें! प्रतिगामी वर्ग आपल्या सत्तेच्या संरक्षणासाठीं धर्म, रूढी, लोकसंस्था, शिक्षण, परंपरा ह्यांच्या द्वारां जनतेच्या संस्कारांची प्रचंड तटबंदी उभारीत असतो. ह्या तटबंदींतील प्रत्येक वीट एखाद्या जुन्या ऐतिहासिक तटबंदींतील विटेइतकी मजबूत बसलेली असते. ही तटबंदी जोंपर्यंत जमीनदोस्त झाली नाहीं तोंपर्यंत प्रतिगामी वर्ग आपल्या पुनरुत्थानाची आशा कधीं सोडीत नाहीं. लोकशाही सत्ता प्रस्थापित होतांक्षणीं प्रौढमतदानानें सार्वत्रिक निवडणुका घेऊन कायदेमंडळाचे डोलारे उभे केले कीं, लोकशाहीचें ध्येय व्यवहारांत उतरलें असें मानणें भोंगळपणाचें आहे. उलट, अशा घिसाडघाईनें लोकशाहीनिष्ठेला जबर धक्का पोहोंचण्याचा व त्यांतून हुकुमशाहीचें आकर्षण निर्माण होण्याचा फार मोठा धोका असतो. चीनमधील नवलोकशाही क्रांति घडवून आणण्याच्या कार्यांत तेथील अनेक लोकशाहीवादी पक्ष सहभागी झालेले होते व कम्युनिस्ट पक्षाला आम जनतेच्या पाठिंब्यामुळेंच तें कार्य यशस्वीपणें पार पाडतां आलें. ह्या गोष्टी खऱ्या असल्या तरी लोकशाही क्रांतीच्या ज्या मूलभूत प्रेरणा असतात त्यांना मूर्त स्वरूप आल्याच्या अनुभवानेंच जनसमुदायाची लोकशाहीवरील निष्ठा स्थिरावून दृढमूल होत असते. जनतेच्या राजकीय सल्लागारसभेनें तेथील हंगामी सरकारापुढें जो कार्यक्रम ठेवलेला आहे त्या कार्यक्रमाची आंखणी वरील अनुभव हिशेबीं घेऊन करण्यांत आलेली आहे.

गेलीं ४० वर्षें यादवी-युद्धांनीं, परकीय आक्रमणाच्या धाडींनीं व अराजकांनीं जर्जर झालेल्या चीनसारख्या खंडप्राय देशांत सरंजामशाहीचा व प्रतिगामी वर्गांचा पाडाव होतांच एकजिनसी लोकशाही राज्ययंत्राची उभारणी अल्पावधींत होईल अशी अपेक्षा करणें चूक होय.

तारीख १ ऑक्टोबरला प्रजासत्ताक राज्याच्या स्थापनेची घोषणा करण्यांत आली त्या वेळीं उत्तरेकडील प्रदेश सोडून बाकीचा प्रदेश मुक्तिसेनेच्या अंमलाखालीं होता. चँग-कै-शेकच्या राजवटीचे आधारस्तंभ असलेले लष्करशहा व नोकरशहा अजून कित्येक परगण्यांमध्यें पूर्ववत् सत्ता गाजवीत होते. देशभर दीर्घकाल अराजक व बंडाळी माजल्यामुळें व राज्ययंत्र खिळखिळें झालेलें असल्यामुळें ज्याप्रमाणें मोंगलाईच्या व मराठेशाहीच्या अखेरच्या काळांत लूटमार करण्याचा पेशा पत्करलेल्या जमाती व टोळ्या संघटित झाल्या होत्या. त्याचप्रमाणें चीनमध्येंहि अशा टोळ्यांचीं जाळीं सर्वत्र पसरलीं होतीं. सर्वसामान्य जनता व शेतकरीवर्ग अस्थिर जीवनाला व अराजकाला विटला होता. सत्तान्तराचे अनेक उन्हाळे-पावसाळे त्यानें अनुभविलेले असल्यानें, ह्या नव्या सत्तेविषयीं त्याला आपलेपणा वाटत असला, तरी तिच्या भवितव्याविषयीं त्याला शाश्वती वाटत नव्हती. स्थानिक जमिनदार व लष्करशहा ह्यांच्या दहशतीची त्याच्या मनावर शतकानुशतकें बसलेली पकड अजून ढिली झाली नव्हती.

## स्थानिक जनता-परिषदांची स्थापना

अशा परिस्थितींत देशांतील निरनिराळ्या जिल्ह्यांचा व परगण्यांचा कारभार लष्करी कमिशनें नेमून त्यांच्या हातीं ठेवणें भाग होतें. ह्या कमिशनचें मुख्य कार्य प्रतिगाम्यांच्या चढाईच्या कारवायांवर सक्त नजर ठेवून त्यांचा करडेपणानें बंदोबस्त करणें, [illegible] करणें व मुलकी कारभार [illegible] आवश्यक तेवढें सामाजिक [illegible] होतें. हें कार्य करीत [illegible] मुलकी कारभारासाठीं स्थानिक शेतकरी,







व्यापारी, व्यवसायी वर्ग ह्यांच्यांतून सल्लागारमंडळें निवडून त्यांचें साहाय्य लष्करी कमिशननें घ्यावयाचें. मुलकी कारभाराची अधिकाधिक जबाबदारी त्यांच्यावर टाकावयाची व अशा क्रमानें त्या त्या जिल्ह्यांत, परगण्यांत व प्रदेशांत जनतेच्या राजकीय सल्लागारसभा भरवून त्यांतून मुलकी कारभारासाठीं स्थानिक सरकारची निवड करावयाची. ही जबाबदारी लष्करी कमिशनवर सोंपविलेली असे. स्थानिक सरकारची लोकशाही पद्धतीनें निवड झाल्यानंतर मुलकी कारभारासंबंधीं लष्करी कमिशनची जबाबदारी संपे. लोकशाही राज्ययंत्राच्या उभारणीच्या कार्यांतील हा पहिला टप्पा होय.

राजकीय सल्लागारसभांच्या द्वारें नियुक्त झालेल्या स्थानिक सरकारनें पुढील तीन कार्यें पार पाडावयाचीं असतात: पहिलें कार्य प्रतिक्रांतिकारक व अराजक माजविणाऱ्या टोळ्या यांचा मोड करणें. हें कार्य करीत असतां त्यांच्या म्होरक्यांचें निष्ठुरपणें पारिपत्य करावें, परंतु इतरांना जास्तींत जास्त सौम्य वागणूक देऊन त्यांना सामाजिक जीवनांत स्थिरावण्यास मदत करावी, असा आदेश मध्यवर्ती सरकारनें सर्व स्थानिक सरकारांस दिलेला असतो. दुसरें कार्य जमीनीचें फेरवांटप पुरें करावयाचें आणि तिसरें कार्य शेतकरी, कामगार, शिक्षक, तरुण, स्त्रिया इत्यादि जनविभागांच्या सामुदायिक संघटना उभारून त्यांना मुलकी कारभारांत व विशेषतः लांचलुचपतीविरोधी मोहिमांत, उत्पादनवाढीच्या मोहिमांत व पुनर्रचनेच्या हरएक कार्यक्रमांत सहभागी होण्यास उत्तेजन द्यावयाचें. हीं तीन कार्यें बहुतांशीं पार पडलीं कीं, त्या त्या जिल्ह्यांत व परगण्यांत सार्वत्रिक निवडणुका घेऊन जनता-परिषदा भरविण्यांत येतात. प्रत्येक खेडें, प्रत्येक तालुका, प्रत्येक जिल्हा, प्रत्येक परगणा व प्रत्येक इलाखा ह्यांची जनता-परिषद् भरविण्यांत येते. ह्या जनता-परिषदा राज्यकारभाराच्या त्या त्या विभागांत मध्यवर्ती परिषदेचें प्रतिनिधित्व करीत असतात.

चीनसारख्या खंडप्राय देशांत लोकशाही राज्यकारभाराचें राज्ययंत्र वरील पद्धतीनें उभें करणें हें प्रचंड व अशक्यप्राय कार्य होय, असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु आपण सत्ताधारी झालेलों आहों ही जाणीव अनुभवाच्या द्वारा जनतेला झालेली असली कीं, तिच्या ठिकाणीं सुप्तावस्थेंत असलेल्या शक्ती प्रचंड वेगानें व कार्यक्षमतेनें कामास लागतात. गेल्या वर्षाच्या अखेरपर्यंत सहा प्रदेशांपैकीं एका प्रदेशाची जनतापरिषद् भरून लोकशाही प्रशासकमंडळाची अथवा प्रदेशसरकारची निवड झालेली होती. २८ इलाख्यांपैकीं २७ इलाख्यांमध्यें राजकीय सल्लागारसभा भरविण्यांत येऊन, लोकशाही सरकारें स्थापण्याच्या कार्यांतील पहिला टप्पा गांठण्यांत आलेला होता. त्याचप्रमाणें चीनमधील १५४ शहरांपैकीं १४४ शहरांनीं पहिल्या टप्प्यापर्यंत मजल गांठलेली होती. येत्या सप्टेंबरअखेर ह्या कार्याचा पहिला अर्धा भाग पार पडलेला असेल. आपला उद्धार करावयाचें सामर्थ्य आपणां स्वतःमध्येंच आहे असा जनतेला आत्मविश्वास असणें हें लोकशाहीच्या जिवंतपणाचें प्रेसिडेन्ट विल्सन ह्यांनीं वर्णन केलेलें लक्षण[1] चीनमधील लोकशाही कार्यपद्धतीला पूर्णपणें लागूं पडतें. जनतेमध्यें कोणते विचार खेळत आहेत, तिचे अनुभव काय आहेत हें जाणून घेण्यावर लोकशाही कारभाराचें यश अवलंबून असतें. चीनमधील नवलोकशाहीच्या नेत्यांच्या ठिकाणीं ही जाणीव सदैव जागती राहील ह्याची काळजी वाहण्यांत येत असते.

स्वातंत्र्य, समता व बंधुभाव ह्या लोकशाहीच्या तीन आकांक्षांपैकीं स्वातंत्र्य ह्या शब्दावर अलीकडे विशेष भर देण्यांत येत असतो. इतकेंच नव्हे तर, स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य असें समीकरण

१ ‘...today, supremely, does it behoove this nation to remember that a people shall be saved by the power that sleeps in its own deep bosom or by none; shall be renewed in hope, in conscience, in strength, by waters welling up from its own sweet, perennial springs’—Woodrow Wilson, ‘The New Freedom’ (1916) p. 72





मांडण्यांत येतें. पिळणूक व अन्याय यांच्या जोखडांत, लाचारीमुळें अगर राज्यसत्तेच्या दहशतीमुळें, मान गुंतवून घेण्याचा प्रसंग व्यक्तीवर येतां कामा नये हाच अर्थ राजकीय स्वातंत्र्यांत अभिप्रेत असतो. व्यक्तीला आपलें जीवन समृद्ध करण्याचें स्वातंत्र्य असावयास पाहिजे हें मान्य. पण केवळ व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क आकाशाच्या पोकळींत गाजवून व्यक्तिमत्त्वाचा विकास कधीं होऊं शकेल काय ? सामाजिक जीवनाच्या समृद्धीवरून व वैपुल्यावरून व्यक्तिमत्त्वाच्या विकासाच्या अथवा परिपोषाच्या मर्यादा ठरत असतात. भांडवलशाही राष्ट्रांमधील स्वतंत्र लोकशाहींत जें व्यक्तिविकासाचें स्वातंत्र्य आहे तें चीनमधील जनतेला लाभत नाहीं, म्हणून तेथील जनतेविषयीं आर्तस्वरानें हळहळ व्यक्त करणारे निर्भेळ स्वातंत्र्याचे उपासक आढळतात. परंतु कांहीं झालें तरी गरुडाला आकाशांत विशिष्ट उंचीपलीकडे भराऱ्या मारतां येत नाहींत ह्याबद्दल डबक्यांतील बेडकानें आक्रोश करावा त्यापैकींच तो प्रकार होय !

## पुरेशा शांततेच्या काळाची आवश्यकता

राष्ट्रीय भांडवलदार, श्रीमंत शेतकरी, व्यवसायी वर्ग ह्यांच्याविषयीं चिनी कम्युनिस्ट पक्षाचें सध्यांचें धोरण ‘ तोंडीं राम आणि बगलेंत सुरी ’ हें आहे, असा एक आक्षेप घेण्यांत येतो. ‘ कम्युनिस्ट पक्षाचें अंतिम ध्येय समाजवादी समाज स्थापन करण्याचें आहे हें जर खरें, तर तेथील सध्यांचें सरकार भांडवलदारवर्गाचें निर्मूलन तर करणार नाहींच, उलट त्यांच्या उद्योगधंद्यांना संरक्षण व उत्तेजन देईल ह्या घोषणेला किंमत देण्यांत अर्थ नाहीं. तेथील सरकारचें हें धोरण म्हणजे बोकड पोसून तो कापण्यापैकीं प्रकार होय. पुढें-मागें भांडवलदारवर्गाचें उच्चाटन निश्चितपणें करण्यांत यावयाचें असेल तर तें शांततेनें केलें काय किंवा बळजोरीनें केलें काय सारखेंच ! यज्ञीय पशु कापून मारला काय किंवा बुकलून मारला काय, बोकडाच्या नशिबीं वाढून ठेवलेलें मरण त्यामुळें कांहीं सुखकारक होत नसतें ’ असाहि आणखी एक आक्षेप घेण्यांत येतो. या आक्षेपांना उत्तर हेंच कीं, भांडवलदारवर्ग सनातन टिकावा व समृद्ध व्हावा ह्यासाठीं चीनमधील नवलोकशाही अस्तित्वांत आलेली नाहीं. उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण केव्हां व किती वेगानें करावें लागेल, तें प्रचाराच्या द्वारा करतां येईल कीं त्यासाठीं बळजोरी वापरावी लागेल, ह्या प्रश्नांचीं तात्त्विक उत्तरें समाधानकारकपणें कधींच देतां यावयाचीं नाहींत.

सोव्हिएट क्रांतीनंतर रशियावर परकीय राष्ट्रांनीं लष्करी आक्रमण केलें नसतें, तर रशियांतील भांडवलदारवर्गाला तेथील क्रांतिकारक सरकारविरुद्ध उठाव करण्याची अगर दगलबाजी करण्याची संधि मिळाली नसती व त्या वर्गाची तशी हिम्मतहि झाली नसती. सोव्हिएट सत्तेला क्रांतीनंतर शांततेचा काळ लाभता तर तेथील उद्योगधंद्यांचें इतक्या त्वरेनें राष्ट्रीयीकरण करण्याची जबाबदारी सोव्हिएट सत्तेनें पत्करली नसती व सोव्हिएट युनियनमध्येंहि, क्रांतिपूर्व काळांत जरी नव्हे तरी क्रान्त्युत्तर काळांत, भांडवलदारवर्गाचें सहकार्य सोव्हिएट सत्तेनेंहि बराच काळ घेतलें असतें, असा विचार खुद्द लेनिननें व्यक्त केलेला आहे. चीनमधील नवलोकशाही अर्थव्यवस्थेच्या विकासाला पुरेसा शांततेचा काळ लाभला, तर अर्थव्यवस्थेच्या राष्ट्रीय विभागाची वाढ होऊन भांडवलदारी अपप्रवृत्ती कह्यांत आणतां येतील व समाजसत्ताक उद्योगधंदे व खाजगी मालकीचे उद्योगधंदे ह्यांच्यामधील स्पर्धेत समाजसत्ताक अर्थव्यवस्थेचें सामाजिक श्रेष्ठत्व प्रस्थापित होईल व त्यामुळें भांडवलदारी मनोवृत्ती क्रमाक्रमानें लोप पावतील. त्यासाठीं बळजोरीच करावी लागेल असें गृहीत धरणें हा एक प्रकारचा नियतिवाद होय. असल्या नियतिवादाला मार्क्सवादांत अथवा माओच्या तत्त्वज्ञानांत स्थान नाहीं.

‘ राज्यकर्त्याला आवश्यक अशा तीन गोष्टी ... कॉन्फ्युशिअसला विचारलें असतां त्यानें ‘ देशांत पुरेसें अन्न, पुरेसें लष्कर व ... ’ ह्या त्या तीन गोष्टी सांगितल्या. त्यांतल्या दोनच शक्य असल्या तर त्या ... वयास सांगितलें. एकच शक्य असेल तर ‘ अन्न नसलें तरी चालेल, पण राज्य ... जे ’ असें त्यानें सांगितलें.










अनुक्रमणिका

श्री. र. के. खाडिलकर

# पूर्व युरोपांतील जनतेची लोकशाही

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीला पूर्व युरोपांतील चेकोस्लोव्हाकिया, पोलंड, हंगेरी, बल्गेरिआ, रुमानिया व युगोस्लाव्हिया या राष्ट्रांत क्रांतिपर्व सुरू झालें. तेव्हांपासून तेथील पूर्वीची राज्यव्यवस्था व अर्थव्यवस्था यांमध्यें मोठें स्थित्यंतर घडून आलें आहे. कोणत्या क्रांतिशक्तीनें तेथें बदल झाला, कोणत्या परिस्थितींत व कोणत्या पद्धतीनें जुनी अवस्था क्रमाक्रमानें नष्ट करून समाजवादी संस्कृतीचें ध्येय गांठण्याच्या दिशेनें प्रगति साधण्यांत आली, या संक्रमणाला जनतेची लोकशाही असें कां संबोधण्यांत येतें, हें समजून घेण्याकरितां थोडा मागील इतिहास उलगडून पाहणें अवश्य आहे. कारण, या इतिहासानेंच क्रांतिकारक परिस्थितीची निर्मिति केली, हें विसरून चालणार नाहीं.

## पहिल्या महायुद्धानंतरचीं नवनिर्मित दुबळीं राष्ट्रें

१९३८ सालीं म्हणजे दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं चेकोस्लोव्हाकिया वगळून पूर्व युरोपांतील इतर सर्व राष्ट्रांत फॅसिस्ट पद्धतीची राजवट होती. हॉर्थी, बोरिस, बेक, आन्तनेस्क्यु हे हिटलरच्या उदयापूर्वीच अनुक्रमें हंगेरी, बल्गेरिया, पोलंड आणि रुमानिया या देशांत सर्वाधिकारी हुकुमशहा झालेले होते. पहिल्या महायुद्धानंतर राष्ट्रीय स्वयंनिर्णयाच्या घोषणेच्या आधारानें इंग्लंड व फ्रान्स या त्या वेळच्या विजयी दोस्त राष्ट्रांनीं पूर्व युरोपांत नव्या राष्ट्रांची निर्मिति केली आणि तेथें आपल्या देशांतील लोकशाहीच्या धर्तीचीं सरकारें आणलीं; परंतु पार्लमेंटरी पद्धतीच्या लोकशाहीनें तेथें मूळ धरलें नाहीं. ही पद्धति टिकून राहावी म्हणून दोस्तांनीं तिला हातभार लावला अशांतलाहि प्रकार नाहीं. इतकेंच नव्हे तर, हुकुमशहांचा त्यांनीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पुरस्कार केला! अर्थात् पूर्व युरोपांत या छोट्या राष्ट्रांची निर्मिति झाली त्यामागें कांहीं ध्येयवाद होता असें मानण्याचें बिलकुल कारण नाहीं. इंग्लंड व फ्रान्स यांना रशियाच्या हद्दीलगत आपल्या हस्तक राष्ट्रांची सांखळी निर्माण करून संरक्षक तटबंदीसारखा त्यांचा उपयोग करावयाचा होता, हें उघड आहे. तेव्हां जोंपर्यंत तेथील राजवटी रशियाविरोधी होत्या तोंपर्यंत त्या लोकशाहीविरोधी आहेत याचा विधिनिषेध दोस्तांनीं बाळगला नाहीं. शिवाय, दोस्तांनीं पुरस्कारिलेली लोकशाही रुजण्यासारखी परिस्थिति त्या काळीं केव्हांच नव्हती. कारण अशा लोकशाहीचा आधार जो मध्यमवर्ग तो या राष्ट्रांत अभावानेंच होता. औद्योगिक क्रांतीवांचून मध्यमवर्ग येणार कोठून? या उलट, चेकोस्लोव्हाकिया औद्योगिक दृष्ट्या बराच पुढारलेला असल्यानें तेथें निर्माण झालेल्या बलिष्ठ मध्यमवर्गामुळें लोकशाही पद्धति व परंपरा टिकून राहिल्याचें व वाढीला लागल्याचें दृश्य दिसतें. इतर राष्ट्रांत कांहीं जुजबी सुधारणा करून बहुसंख्य शेतकरी समाजाच्या असंतोषाला पायबंद घातला गेला. सर्व समाज स्थितिनिष्ठ होता. १९१८ पर्यंत ऑस्ट्रो-हंगेरी, जर्मनी, तसेंच रशिया यांची या भागांवर हुकुमत होती. हें वर्चस्व नाहींसें होईपर्यंत राष्ट्रीय भावना प्रगतिशील होती. परंतु पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं या राष्ट्रांना दोस्तांनीं राष्ट्रीय स्वातंत्र्य बहाल केलें. तरीसुद्धां व्हर्सायच्या तहानें ठरविलेल्या सरहद्दींनीं आपल्या राष्ट्रावर अन्याय झाला आहे व तो रद्द

# पूर्व युरोपांतील जनतेची लोकशाही

केला पाहिजे यासाठीं राष्ट्रीय भावनेला चेतविलें जात होतें. आणि त्याचा उपयोग अंतर्गत बदल दडपण्यासाठीं केला गेल्यास नवल कसलें !

या नव्या परिस्थितीनें आर्थिक प्रगति कुंठित केली आणि राजकीय दडपशाही करून हुकूमशहा बलिष्ठ झाले. पोलंड, हंगेरी, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया व रुमानिया हे शेतीप्रधान देश; तेथें औद्योगिक वाढ नाममात्रच झालेली आणि तीसुद्धां परकीय भांडवल पेरून ! अशा या राष्ट्रांना १९३० च्या सार्वत्रिक मंदीनें केवढा जबर तडाखा दिलेला असेल याची कल्पनाच केलेली बरी. शेतीच्या उत्पादनाचे भाव भरमसाट खालीं आले. धान्य, लांकूड व इतर कच्चा माल पश्चिम युरोपांतील औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या संपन्न राष्ट्रांना पुरवावयाचा, त्याची जी किंमत येईल त्यांतून या राष्ट्रांत गुंतलेल्या परकीय भांडवलाचें व्याज द्यावयाचें, त्याची भर झाल्यावर जें कांहीं उरेल त्यावर या छोट्या राष्ट्रांचे संसार चालावयाचे– अशी परिस्थिति होती. मंदीच्या तडाख्यानें बाजार-पेठा घसरल्यावर परकीय भांडवलाचें व्याज देणें आणि जमाबंदीची तोंडमिळवणी करणें कसें शक्य होणार ! लोकसंख्या सारखी वाढत होती, शेतीवर उदरनिर्वाह होणें मुष्किलीचें झालें होतें. वस्तुतः बेकार अशा लोकसंख्येतील जवळजवळ २५–३० टक्के लोकांचा, त्यांना दुसरें रोजगारीचें कांहींहि साधन नसल्यामुळें, शेतीवर भार वाढला होता. या सर्वांचा परिणाम म्हणजे आधींच्या दारिद्र्यांत भर पडली ! ही परिस्थिति सुधारावयाची तर उद्योग-धंद्यांची वाढ करणें एवढाच एक उपाय होता; पण त्यासाठीं लागणारें भांडवल नव्हतें. तसेंच औद्योगिक उत्पादनाला गिऱ्हाइकहि मर्यादित होतें. कारण इतका गरीब शेतकरी विकत काय घेणार ! परदेशी भांडवल मुख्यतः कच्चा माल निर्माण करण्यासाठीं येई. रुमानियामधील तेलाच्या खाणी, युगोस्लाव्हियामधील खनिज संपत्ति यांमध्यें परदेशी भांडवलच होतें. त्यांतील उत्पादन आणि त्याचा फायदा दोन्हीहि परकीयांच्याच पदरांत पडे. राष्ट्रीय उद्योगधंद्यांच्या वाढीकडे त्याचा उपयोग कसा होणार ! परदेशी भांडवलाचें संरक्षण व्हावें आणि स्थानिक जमीनदारांची मिरासदारी टिकावी या उद्दिष्टांशीं निगडित झालेली राज्यसत्ता लष्करी हुकुमशाही वळणाची व्हावी, हें क्रमप्राप्तच होतें.

पूर्व युरोपांतील या नवनिर्मित राष्ट्रांच्या दुबळे-पणाचा हिट्लरनें पुरेपूर फायदा घेतला यांत नवल नाहीं. येथील हुकुमशहांचा सामाजिक आधारच डळमळीत होता. त्यांना नाझी सत्तेनें बलिष्ठ केलें आणि आपल्या हुकुमतीचें जूं त्यांच्या मानेवर दिलें. हिट्लरच्या लष्करी तयारीला अन्नधान्य, लांकूड, खनिज पदार्थ व तेल या कच्च्या मालाचा हुकुमी पुरवठा होईल असें क्षेत्र मिळालें. हलाखी दूर होण्याचा तात्पुरता मार्ग सांपडला. हळूहळू नाझींच्या लष्करी आणि आर्थिक जाळ्यांत हीं राष्ट्रें गुरफटत गेलीं. त्यांच्या निर्यात व्यापाराचा ओघ जर्मनीकडे वळला आणि औद्योगिक क्षेत्रांतहि जर्मनीचें वर्चस्व प्रस्थापित झालें. म्युनिक कराराच्या वेळीं ब्रिटिश पंतप्रधान मि. चेम्बरलेन याला ही वस्तुस्थिति स्पष्ट जाणवली, तेव्हांच त्यानें 'पूर्व युरोपवर जर्मनीचें वर्चस्व असणें स्वाभाविक होय' असे अगतिक निराशेचे उद्गार काढले—( 'It was quite natural that Germany should dominate eastern and south-eastern Europe.' ). चेकोस्लाव्हाकियाच्या चिरफाडीला मान्यता देतांना युद्धाची सुसज्जता नाहीं याची बोचक जाणीव चेम्बरलेनला जितकी होती, तितकीच पूर्व युरोपवर बसलेल्या नाझी वर्चस्वाचा पगडा त्याला हतबुद्ध करणारा होता, हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे.

### रशियाचें स्वागत

अशा या पूर्व युरोपांतील राष्ट्रांचें विधिलिखित युद्धकाळांत झालेल्या स्टॅलिन, रूझवेल्ट व चर्चिल यांच्या तेहरान येथील बैठकींत लिहिलें गेलें. पूर्व युरोपचा रशियाच्या वर्चस्वकक्षेंत समावेश करण्यास दोस्तांनीं मान्यता दिली. जर्मनीवरील चढाईच्या लष्करी व्यूहरचनेंतील एक भाग म्हणून वरील मान्यता देण्यांत आलेली असली, तरी त्यामागील राजकीय हेतु लवकरच उजेडांत आल्यावांचून राहिला नाहीं. याचा अर्थ युरोपचें सकृद्दर्शनीं लष्करी परंतु परिणामतः राजकीय वांटप तेहरान

येथें झालें. त्यायोगें पूर्व युरोपांत क्रांतीला निःसंशय चालना मिळाली.

वर रेखाटलेलें युद्धपूर्व परिस्थितीचें चित्र डोळ्यांपुढें ठेवल्यास अशा क्रांतीची पार्श्वभूमि १९४५ पूर्वीच निर्माण झालेली होती, हें नाकारतां येणार नाहीं. पूर्व युरोपांतील या देशांतून नाझींच्या टांचेखालीं गेल्यामुळें जर्मनीबद्दलचा द्वेष होता. जुन्या राजवटींबद्दल चीड होती. परक्या फॅसिस्टांच्या कक्षेंतील राष्ट्रीयत्वाच्या उपासनेनें आर्थिक प्रगति साधूं शकली नाहीं, याची एक कटु जाणीव होती. पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं आपलें जें राष्ट्रीयत्व सिद्ध झालें तें केवळ बड्या राष्ट्रांच्या स्वार्थी हेतूनें राबविलें जावें असेंच होतें, याबद्दलची खंत होती. अशा मनःस्थितींत तेथील जनतेनें, रशियाच्या विजयामुळें आपल्याला प्रगतीचा नवा मार्ग दिसेल या आशेनें, नाझींचा पाडाव करीत पुढें सरकणाऱ्या लाल सैन्याचें आपल्या मुक्ततेचा अग्रदूत म्हणून स्वागत केलें असल्यास, त्यांत अस्वाभाविक तें काय आहे ? 'पश्चिम युरोप आपणांकडे कच्चा माल व स्वस्त मजूर पुरविणारी बाजारपेठ म्हणूनच पाहातो. रशियाच्या आगमनानें त्या परिस्थितींत मूलभूत बदल होऊन क्रांतीची प्रेरकशक्ति आपल्या पाठीशीं उभी राहील' असा विश्वास येथील जनतेमध्यें वाढूं लागल्यास नवल नाहीं.

सोफिया व बेलग्रेड येथील राजेशाही आणि त्यांचे दरबार, पोलंडमधील लष्करी हुकुमशहा आणि हंगेरींतील राज्यसत्तेला आपलें खेळणें बनविणारे तेथील पांचपन्नास नवकोट नारायण हे सर्व युद्धाच्या उलथापालथींत नामशेष झाले. युद्धाचा शेवट होईतोंवर दोस्त राष्ट्रांचें लक्ष केवळ युद्ध जिंकण्यावर केंद्रित झालेलें होतें. तरीसुद्धां लंडनमधील निर्वासित सरकारांच्यामार्फत येथील परिस्थितीवर आपला वरचष्मा टिकविण्यासाठीं अँग्लो-अमेरिकनांनीं धडपड चालूंच ठेवली. लष्करी उद्दिष्ट त्वरित साधण्याच्या दृष्टीनें लाल सैन्याचा कबजा या विभागावर झाला हें अपरिहार्य असलें, तरी रशियाला आपलीं राजकीय उद्दिष्टें साधण्याला मोका मिळतो, म्हणून अँग्लो-अमेरिकनांचा चडफडाट होत होताच. म्हणून १९१९ सालच्या तहानें निर्माण केलेली परिस्थिति फिरून निर्माण करावी आणि रशियाच्या वाढत्या वर्चस्वाला पायबंद घालावा अशीं धोरणें अँग्लो-अमेरिकनांनीं चालूंच ठेवलीं. परंतु नव्या घडामोडींनीं झालेली उलथापालथ काबूंत ठेवण्याची ताकद या दोस्तांमध्यें नव्हती. त्यामुळें विरोधाला उठावणी देण्यापलीकडे त्यांना कांहींहि करतां आलें नाहीं. रशियानें नाझींचीं पाळेंमुळें खणून येथील राष्ट्रांना आपल्या कक्षेंत ओढलें, त्याबरोबरच येथें नवी आर्थिक व राजकीय घडी बसविण्याचा कार्यक्रम हातीं घेतला. त्या अर्थानें क्रांतीची प्रेरकशक्ति लाल सैन्यच होती असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

प्रस्थापित सत्तेविरुद्ध जनतेच्या संघटित उठावानें क्रांतीला सुरुवात होते, असा सिद्धांत मांडण्यांत येतो. पण या सिद्धांतांत गृहीत धरलेल्या सूत्रानुसार, पूर्व युरोपांतील वरील घडामोडी झाल्या असें म्हणतां यावयाचें नाहीं. याचें कारण, या राष्ट्रांतील मागसलेल्या परिस्थितीमध्यें डाव्या चळवळींची वाढ तितकीशी झालेली नव्हती, हें होय. कम्युनिस्ट पक्ष प्रत्येक राष्ट्रांत होता, तरीसुद्धां त्याची ताकद अत्यल्पच होती. ही गोष्ट क्रांतीनंतर कम्युनिस्टांनीं लिहिलेल्या इतिहासांतहि नमूद केलेली आढळते. चेकोस्लाव्हाकियाचा कम्युनिस्ट नेता कॉ. गोटवाल्ड यानें पक्षाच्या आठव्या परिषदेपुढें बोलतांना,[१] 'आमच्या मुक्ततेमध्यें निर्णायक शक्ति ही रशियाची

---

१ "Czechoslovakia's liberation by the Red Army was a tremendous triumph of that conception of the Communist Party which had always maintained that our liberty would come from the East, and that our national destiny was inseparably tied to the Soviet Union."

—'Czechoslovakia on the Road to Socialism,' p. 32,
(Ministry of Information & Public Culture, 1949 May.)



अनुक्रमणिका






होती ' ही गोष्ट प्रांजलपणें कबूल केली आहे. किंबहुना, ' आपल्या जनतेचें स्वातंत्र्य पूर्वेकडून येणार आणि आपलें राष्ट्रीय भवितव्य सोविएट यूनियनशीं निगडित आहे ' हेंहि त्यानें नमूद केलें आहे.

या विभागांत झालेल्या युद्धकालीन व युद्धोत्तर घडामोडींत लाल सैन्य पाठीशीं उभें नसतें तर स्वतः-च्या बळानें स्थानिक कम्युनिस्ट पक्षांना क्रांतीच्या दिशेनें यशस्वीपणें पाऊल टाकणें शक्य झालें असतें असें म्हणवत नाहीं. येथील जनतेनें या प्रयत्नांत साथ दिली आणि कम्युनिस्ट पक्षानें तिचें नेतृत्व मोठ्या कौशल्यानें केलें हेंहि त्याबरोबरच ध्यानांत घेतलें पाहिजे. येथील क्रांतीच्या घडामोडींतील हें वैशिष्ट्य नीट समजून घेतल्यावांचून पुढें घडून आलेल्या घटनांचा बोध होणार नाहीं. युद्धांत रशियाच्या क्रांतिशक्तीनें हे देश पादाक्रान्त केले आणि स्थानिक कम्युनिस्ट पक्षांनीं क्रांतिकार्य पुरें केलें असा येथील घटनांचा अन्वयार्थ लावला पाहिजे. नाझींच्या मगरमिठींतून सुटका करून घेण्यासाठीं प्रत्येक राष्ट्रांत जीं प्रतिकारदलें निर्माण झालीं होतीं त्यांचें पुढारीपण कम्युनिस्ट पक्षाकडे होतें.

## क्रांतीच्या तीन अवस्था

या फॅसिस्टविरोधी आघाडीचें रूपान्तर जर्मनीच्या पाडावानंतर राष्ट्रीय आघाडींत झालें. जे नाझी-वळणाचे किंवा जर्मनीच्या आहारीं गेलेले अशांना कटाक्षानें टाळून समाजवादी, शेतकरी, राष्ट्रवादी वगैरे सर्व पक्षांचा समावेश या आघाडींत केला गेला व परदेशी भांडवलाचें राष्ट्रीयीकरण करण्यांत आलें. ही क्रांतीची पहिली अवस्था. क्रांतीच्या दुसऱ्या अवस्थेंत भांडवलदारवर्गाला जनतेपासून अलग पाडण्यांत येऊन समाजवादी व इतर डावे गट यांचें ऐक्य साधण्यांत आलें. कारण उद्योग-धंद्यांचें राष्ट्रीयीकरण व बड्या जमीनदारीचें निर्मूलन एवढेंच मर्यादित उद्दिष्ट डोळ्यांपुढें होतें. तिसऱ्या अवस्थेमध्यें समाजवादी व कम्युनिस्ट हे कामगार-पक्षांत एकरूप किंवा विलीन झालेले दिसतात. त्या वेळीं धर्मपीठांची आणि मध्यम जमीनदारांची सत्ता नाहींशी करण्याचा क्रांतीचा तिसरा टप्पा गांठाव-याचा असतो.

क्रांति वेगवेगळ्या अवस्थांतून पार पाडण्याची व्यूहरचना रशियाच्या पूर्वानुभवानेंच आंखली गेली हें उघड आहे. १९४५ सालीं स्टालिननें चेकोस्लोव्हाकियाचे अध्यक्ष मि. बेनेस यांच्याशीं बोलतांना ' पूर्व युरोपांतील जनतेच्या लोकशाहीची उभारणी रशियाच्या चुकांची पुनरावृत्ति न करतां करूं ' असे उद्गार काढले होते ( पाहा : ' New Statesman and Nation', 12-7-1952), ते ध्यानांत घेतल्यास येथील आंखणीमागें रशियाचें अनुभवसिद्ध मार्गदर्शन होतें हें स्पष्ट होईल. मात्र रशियापेक्षां येथील परिस्थिति निराळी होती हें केव्हांहि विसरून चालणार नाहीं. हिट्लरच्या मगरमिठींतून ज्या सैन्यानें जनतेची मुक्तता केली त्याचा प्रभाव जनतेच्या मनावर पडणें साहजिक होतें. नाझींच्या पंजाखालीं असतांना संघटित झालेल्या प्रतिकारकांची ताकद युगोस्लाव्हियामध्यें बरीच मोठी होती पण इतरत्र त्यांचा विशेष प्रभाव पडलेला नव्हता. लाल सैन्याची ताकद पाठीशीं उभी आहे, याची जाणीव क्रांतीचा कार्यक्रम पार पाडण्यास उपकारक ठरणारी होती परंतु त्या सैन्याचा प्रत्यक्ष उपयोग करण्याचा प्रसंग आला नाहीं. अर्थात् परिस्थितीनुरूप प्रत्येक ठिकाणीं निराळें धोरण आंखण्यांत आलें होतें हें पुढें दिग्दर्शित केलें आहे.

१९४५ ते ४८ या सालांतील प्रत्येक राष्ट्रांतील घडामोडींचा आढावा घेतला, म्हणजे वर दिग्दर्शित केलेल्या क्रान्तीच्या तिन्ही अवस्थांतून जनतेच्या लोकशाहीच्या प्रस्थापनेचा मार्ग कसा गांठला गेला, हें ध्यानांत येईल. पहिली सावधगिरी अशी घेतली गेली कीं, पश्चिम युरोपांतील राष्ट्रांना हस्तकांच्या-मार्फत राष्ट्रवादाचा बुरखा घेऊन कारस्थानें करण्यास अवसर मिळूं नये. म्हणून प्रत्येक राष्ट्राच्या क्रान्तीचा कार्यक्रम त्या त्या राष्ट्राच्या परिसरांतच आंखण्यांत आला. जमीनपद्धतीची सुधारणा एवढेंच कार्य-क्रमाचें उद्दिष्ट डोळ्यांपुढें ठेवण्यांत आलें आणि त्यामुळें इतर सर्व पक्षांचें सहकार्य लाभलें. १९४५ सालीं बहुतेक राष्ट्रांतून राष्ट्रीय आघाडीचीं सरकारें







प्रस्थापित होतांच क्रान्तीनें पहिला टप्पा गांठला. यापुढील दुसऱ्या टप्प्यांतील कार्यक्रम उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण व जमिनीचें वांटप एवढाच मर्यादित ठेवण्यांत आला. या दुसऱ्या टप्प्यांत राष्ट्रीय आघाडीला तडे जाऊं लागले. समाजवादी व शेतकरी पक्षांत तट पडले आणि त्यांतील एक तट कम्युनिस्टांबरोबर जाण्यास तयार झाला. पोलंड, हंगेरी व चेकोस्लाव्हाकिया येथें समाजवाद्यांचा पाठिंबा महत्त्वाचा होता. पहिल्या अवस्थेंत, हुकुमशाही-विरुद्ध-राष्ट्रीय आघाडी अशा झगड्यांत उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण म्हणजे परकीय भांडवलदारांचें उच्चाटन इतकाच अर्थ अभिप्रेत असल्यामुळें, राष्ट्रवाद्यांनीं साथ दिली. परंतु जेव्हां या लढ्याला पुढें वर्गीय स्वरूप येत चाललें तेव्हां त्यांचा पाठिंबा डळमळीत झाला. जमिनीला मुकलेला जमीनदार, भांडवलदार आणि पोपच्या धर्मसत्तेचे अधिकारी व धर्मोपदेशक, तसेंच संभ्रान्त अवस्थेंत असलेला मध्यमवर्ग हे सर्व क्रान्तीच्या लाटेविरुद्ध उभे राहिले. त्यांना पाश्चात्त्य राष्ट्रांकडून आधार मिळेल अशी आशा वाटत होती. म्हणून रशिया-विरुद्ध-पाश्चात्त्य राष्ट्रें असें या संघर्षाचें प्रतिबिंब क्रान्तीच्या दुसऱ्या अवस्थेंत उमटलेलें दिसतें.

पोलंडमध्यें खुल्या निवडणुका होऊन जें सरकार अधिकारावर येईल त्याला मान्यता देण्यांत येईल, असें पॉट्सडॅम्-करारानुसार ठरलें होतें. हंगेरी, बल्गेरिया व रुमानिया येथील सरकारांना पाश्चात्त्य दोस्तांच्या संमतीनें मान्यता देण्यास रशिया बांधला गेला होता. त्यामुळें दोस्तराष्ट्रांना कुरापत काढण्याला वाव राहूं नये यासाठीं पार्लमेंटरी पद्धतीच्या लोकशाही मार्गानें आर्थिक बदल घडवून आणण्याचें पथ्य रशियन नेत्यांना सांभाळावें लागलें. निवडणुकीसंबंधीं तक्रारी, दडपशाहीबद्दल निषेधाचे खलिते, इत्यादि गोष्टींखेरीज होत असलेल्या घटनांबद्दल उघडउघड विरोध दर्शविण्याची इंग्लंड-अमेरिकेला संधि देण्यांत आली नाहीं. अर्थात् पार्लमेंटरी पद्धतीच्या लोकशाहीचा देखावा फार काळ टिकणार नाहीं, हें कम्युनिस्टांना केव्हांच कळून चुकलें होतें. तरीसुद्धां संक्रमणकाळापुरता तरी इतर पक्षांचा बडेजाव टिकवून धरणें क्रमप्राप्त होतें. सत्तेचीं सूत्रें मात्र खऱ्या अर्थानें इतर पक्षांच्या हातांतून निसटून कम्युनिस्ट पक्षाच्या हातांत केन्द्रित झालीं होतीं ही गोष्ट निर्विवाद आहे. कम्युनिस्ट हे लोकांच्या बाजूनें आणि त्यांचे विरोधक पाश्चात्त्य राष्ट्रांच्या चिथावणीनें वागणारे, असें या संघर्षाचें स्वरूप झालें. १९४७–४८ सालीं अंतर्गत झगडा निकरावर आला आणि राष्ट्रीय आघाड्या मोडल्या. संघटित पक्ष म्हणून विरोधकांना स्थान उरलें नाहीं. प्रत्येक ठिकाणीं हीच गोष्ट जरा आधीं किंवा नंतर झाली. त्याला स्थानिक पूर्वपरंपरेप्रमाणें थोडें वेगळें स्वरूप आल्यासारखें वाटलें तरी लढ्याचें मूलभूत स्वरूप वर दिग्दर्शित केल्याप्रमाणेंच होतें.

### विरोधकांचा निःपात

युगोस्लाव्हियामध्यें प्रतिकारदल, तसेंच टिटोचें नेतृत्व मोठें प्रभावी होतें. त्यायोगें उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करण्याचा कार्यक्रम जवळजवळ बिनविरोधच पार पाडण्यांत आला. ४५ च्या निवडणुकीनंतर त्यावर शिक्कामोर्तब झालें इतकेंच. परकीय भांडवल राष्ट्राच्या मालकीचें झाल्यामुळें पाश्चात्त्य राष्ट्रांकडून पहिला कडाडून हल्ला झाला तो युगोस्लाव्हियावर. भांडवलदारवर्गाची तळी उचलून धरण्याला कोणी जाग्यावर नव्हतें. आणि असलें तरी धजणार कोण? १९४५ च्या निवडणुकींत टिटोला ९० टक्के मत पडलें. कारण विरोधी पक्ष म्हणून निवडणुकींच्या आखाड्यांत कोणी उभा नव्हता. बल्गेरियांत जमीनदारी पक्षाचा नेता पेतकाव्ह याला फांशी दिल्यानंतरच दिमित्रावला राष्ट्रीयीकरणाचा कार्यक्रम सुरळितपणें पार पाडतां आला. पण येथें एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ब्रिटन व अमेरिका यांच्याकडून पाठपुरावा झाल्यामुळें पेतकाव्हला देहदंड देणें भाग पडलें, असें दिमित्रावनें स्पष्टीकरण केलें आहे. अर्थात् पूर्वींच्या परंपरेला धरून म्हणजे त्याचा खूनच व्हायचा. नवीन राजवटीनें रीतसर खटला भरून त्यास शिक्षा दिली, ही देशांतील नव्या सुधारणेची निदर्शक होय.

पोलंडमधील झगड्याचें स्वरूप यापेक्षां निराळें होतें. तेथें राष्ट्रवादी परंपरा खोल रुजलेली आणि रशियाच्या विरोधावर पोसलेली. त्यामुळें वर्गीय लढ्यांतील तीव्रतेंत रशियाच्या वर्चस्वाच्या भीतीमुळें भर पडत होती. मध्यम जमीनदारांच्या पक्षानें हंगेरींत १९४५ च्या निवडणुकींत बहुमत

मिळविलें. पण जुन्या राजवटीचे प्रच्छन्न पुरस्कर्ते या पक्षामागें लपले होते. नव्या सरकारनें बँकेच्या राष्ट्रीयीकरणाला हात घालतांच विरोधकांनीं फणा उभारली. पूर्वीचा सत्ताधारी वर्ग कारस्थानें करून सरकार उलथून टाकण्याचे बेत करीत होता. त्या वर्गाला, पाश्चात्त्यांकडून आपणांस मदत मिळेल, अशी भाबडी आशा वाटत होती. रजाकच्या खटल्याच्या उभारणीनें लहान जमीनदारांचा पक्ष पुरा बदनाम झाला व संपुष्टांत आला. तेव्हां धर्मगुरूच्या मागें लपून विरोधक हालचाली करूं लागले. पूर्वापार धर्मपीठांच्या हातीं असलेलें सर्व शिक्षण सरकारनें हातीं घेतांच वादाला तोंड फुटलें. १९४८ पर्यंत आर्थिक कार्यक्रम पुढें रेटीत नेण्यांत सरकारला यश आलें आणि सर्वसामान्य लोक सरकारच्या बाजूला गेल्यामुळें विरोधकांचा पाडाव झाला. कार्डिनल मिनझेंटी याच्यावर झालेला खटला क्रान्तीच्या अंकांतील शेवटचा प्रवेश होता. कम्युनिस्ट नेता राकोसी यानें दूरदृष्टीनें व्यूहरचना केल्यामुळें, हंगेरींतील विरोधकांचा निःपात करून क्रान्ति विजयी ठरली. रुमानियानें हिट्लरची दोस्ती खुशीनें पत्करली होती. पुढें तेहरानच्या परिषदेमध्यें रशियाची वर्चस्वकक्षा निश्चित झाल्याचें ठरतांच तोच रुमानिया सरळ रशियाकडे झुकला. आणि १९४८ नंतर क्रान्तीचे कोणी विरोधक उरले नाहींत.

### चेकोस्लोव्हाकियांतील पेंच

चेकोस्लोव्हाकियामध्यें मात्र क्रांतीची प्रगति बऱ्याच मंद गतीनें होत गेली आणि त्याला कारणेंहि तशींच आहेत. येथील मध्यमवर्ग मोठा, त्यामुळें तेथें एक लोकशाहीपरंपरा निर्माण झालेली होती. बेनेस व मसारिक यांच्या नेतृत्वाला लाभलेली लोकप्रियता मोठी होती. त्यामुळें १९४८ सालपर्यंत राष्ट्रीय आघाडी टिकवून धरणें शक्य होतें व घटनेच्या चौकटींत राहून क्रांतीचा पहिला टप्पा गांठणें शक्य झालें. मार्शल-योजनेखालीं मदत घेण्याच्या प्रश्नावरून वादाला तोंड फुटलें. १९४९ सालीं उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाचा कार्यक्रम कम्युनिस्ट नेता गोटवॉल्ड यानें पुढें मांडला. पोलिसदलावर कम्युनिस्टांची हुकुमत राहावी या प्रश्नावर साजलेलें वादळ, लोकशाही निर्णयापुढें मान तुकविण्याचें ठरवून, बेनेसनें शमविलें. राष्ट्रीयीकरणानें त्याच्यापुढें पेंच टाकला. पाश्चात्त्यांकडून शाब्दिक मदतीपलीकडे कांहींहि मिळणार नाहीं, हें त्याला पूर्वानुभवानें पक्कें माहीत होतें. अशा अगतिक मनःस्थितींत 'जनतेची साथ' ('to go with the people') करण्याचा बेनेस व मसारिक या दोघांनीं अखेर निर्णय कां घेतला याचें रहस्य सहज ध्यानांत येईल. पुढें लवकरच मसारिकनें आत्महत्या केली व बेनेस्नें राजीनामा दिल्यावर थोड्याच दिवसांत तो मरण पावला. त्या दोघांच्या मृत्यूबरोबरच जुनी लोकशाहीपरंपरा संपली !

### नवी जनतेची लोकशाही

निरनिराळ्या राष्ट्रांतील वर दिग्दर्शित केलेल्या घडामोडी नीट ध्यानांत घेतल्यास पूर्व युरोपांत सुरू झालेल्या क्रांतीनें आपल्या पहिल्या व दुसऱ्या अवस्थेंत किती मार्ग आक्रमिला याचा बराच उलगडा होईल. सर्व राष्ट्रांतून कम्युनिस्टांच्या हातीं सत्तेचीं निर्णायक सूत्रें आलीं तरी इतर पक्षांनाहि सरकारांत या अवस्थेंत स्थान होतें. भांडवलदार आणि मोठे जमीनदार यांचा बीमोड करण्यांत आल्यामुळें पाश्चात्त्य राष्ट्रांच्या चिथावणीनें होणाऱ्या विरोधाचा आधारच तुटला. उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण आणि जमीनपद्धतींतील सुधारणा या आर्थिक कार्यक्रमांतील दोन महत्त्वाच्या बाबी सर्व ठिकाणीं पुऱ्या झाल्या. त्यामुळें क्रांतीच्या दिशेनें तिसरें पाऊल उचलण्याची वेळ येऊन ठेपली. तेव्हां जनतेच्या लोकशाहीची कल्पना निश्चित अर्थानें कोणती हें समजून घेऊन, तिची परिणति अखेर कशी होणार, यासंबंधींचा विचार पुढें येऊं लागला. क्रांतीच्या पहिल्या व दुसऱ्या अवस्थेंत झालेल्या घटना तपासून जनतेच्या लोकशाहीचें स्वरूप तिसऱ्या अवस्थेनंतर कसकसें विकसित होत जाईल, हें नीट समजून घेतलें पाहिजे.

पूर्व युरोपांत युगोस्लाव्हियामध्यें मोठ्या अंतर्गत विरोधाच्या अभावीं १९४५ साल अखेर जी नवीन सामाजिक व राजकीय घटना स्थिर होत चालली तिच्यावरून नव्या लोकशाहीचें स्वरूप कोणतें राहणार याची ढोबळ कल्पना येऊं लागली. भांडवलदारवर्गाच्या आर्थिक व

राजकीय सत्तेचा पुरा बीमोड केल्यावर कामगार व शेतकरी या दोन वर्गांच्या ऐक्यांतून उदयाला येणारी राज्यसत्ता म्हणजे नवी लोकशाही असा समज बळावत चालला. रशियाप्रमाणें कामगार-वर्गाची हुकुमशाही प्रस्थापित न करतां जनतेच्या लोकशाहींत कामगार-शेतकरी असे दोन्ही वर्ग तिचे आधारस्तंभ बनतील हें तिचें वैशिष्ट्य होय असें मानण्यांत येऊं लागलें. शेतकरीवर्गाचें स्वतंत्र अस्तित्व अबाधित ठेवलें जाणार, सामुदायिक शेतीचा उपक्रम करून त्यामध्यें शेतकरीवर्गाचें विसर्जन केलें जाणार नाहीं आणि ही अवस्था जवळजवळ कायम टिकविली जाणार, असा समज दृढ होत गेला. संपत्तीची खाजगी मालकी हा पाश्चात्त्य लोकशाहीचा पाया व कामगारवर्गाची अधिसत्ता हें सोव्हिएट सत्तेचें वैशिष्ट्य-या दोन्हींहून निराळें असें जनतेच्या लोकशाहीचें विशिष्ट लक्षण कोणतें? तर कामगार व शेतकरी हे दोन वर्ग समान भूमिकेवर नव्या राज्यसत्तेचे आधारस्तंभ राहतील व त्या दोन वर्गांचें संयुक्त नेतृत्व राहील. एकदां उद्योगधंदे राष्ट्राच्या मालकीचे केले आणि मोठ्या जमीनदाऱ्या नाहींशा केल्या कीं, वरील दोन वर्गांच्या सहकार्यानें जनतेची लोकशाही स्थिर होईल.

युगोस्लाव्हियांत विशिष्ट परिस्थितींत ज्या घटना झाल्या त्यांमधून निर्माण झालेल्या सरकारचें स्वरूप वरील दोन वर्गांची लोकमतानुवर्ती हुकुमशाही असेंच होतें हें मान्य केलें पाहिजे. क्रांतीला लोकांचा पाठिंबा, कोणाचा विरोध असलाच तर तो नाममात्र, आणि शेतकरीवर्गाला संरक्षणाचें आश्वासन यायोगें युगोस्लाव्हियांत नवी राजवट अल्पकाळांत सुस्थिर झाली होती.

### कम्युनिस्ट पक्ष हा सत्तेचा केंद्रबिंदु

परंतु हंगेरी किंवा चेकोस्लोव्हाकिया येथील सरकारें हुकुमशाही नव्हतीं किंवा एकपक्षीय नव्हतीं. पहिल्या दोन्ही अवस्थांत सरकारमध्यें सामील झालेल्या पक्षांना स्वतंत्र अस्तित्व होतें. पार्लमेंटमध्यें बहुमत करून नव्या कार्यक्रमाला मंजुरी मिळविणें जरूर होतें. त्यायोगें या काळांतील त्या राष्ट्रांतील नवशासनाचें स्वरूप पाश्चात्त्य राष्ट्रांतील लोकशाहीसदृश होतें. खाजगी मालकीचा पाया पूर्णपणें नाहींसा केला गेला नव्हता आणि तरीसुद्धां तेथील राजवटीला जनतेची लोकशाही असेंच संबोधण्यांत येई. युगोस्लाव्हिया वगळून बाकीच्या पूर्व युरोपीय राष्ट्रांत पाश्चात्त्य लोकशाहीचा सांगाडा कायम होता. परंतु नव्या राज्यसत्तेचीं मर्मस्थानें म्हणजे संरक्षण, पोलीसदल आणि परराष्ट्रीय संबंध—हीं कम्युनिस्ट पक्षाच्या हातीं होतीं. राष्ट्रीय आघाडीचीं सरकारें प्रस्थापित झालीं तेव्हां कम्युनिस्ट पक्षानें इतर प्रतिनिधींना या शर्तीवरच राज्यसत्तेंत स्थान दिलें. हंगेरींतील कम्युनिस्ट पक्षाचा नेता राकोसी यानें ब्रिटिश मजूर-मंत्रिमंडळाचे पंतप्रधान मि. ॲटली यांना "तुमच्या पक्षाचे लष्करी अंमलदार किती आहेत? नाविकदल आणि पोलीसदल हें तुमच्याच नियंत्रणाखालीं आहे काय?" असे प्रश्न केले. पण त्यांचा अर्थसुद्धां ॲटलीच्या लक्षांत आला नाहीं, असा राकोसीनें आपला अभिप्राय नमूद केला आहे. ('Revolution in Eastern Europe' by Doreen Warriner, p. 40). वरील प्रश्नांतील रहस्य ध्यानांत घेतल्यास ब्रिटनमधील लोकशाही आणि पूर्व युरोपांतील जनतेची लोकशाही यांमध्यें फरक कोणता हें सहज समजून येईल. नव्या लोकशाहींत सत्तेचा केंद्रबिंदु कम्युनिस्ट पक्षाकडे होता, ही गोष्ट तिचें स्वरूप आकलन करतांना केव्हांहि विसरून चालणार नाहीं.

राष्ट्रीय आघाडीचीं हीं सरकारें एका कार्यक्रमाला बांधलेलीं होतीं. तो कार्यक्रम प्रथमावस्थेंत सुधारणावादी स्वरूपाचा होता. त्यामुळें कम्युनिस्ट-विरोधी वातावरण निर्माण करण्याला विरोधकांना अवसर मिळाला नाहीं. आघाडींत किंवा बाहेर कोठूनहि विरोध झाला, तर तो फॅसिस्ट स्वरूपाचा आहे असेंच लोक समजत. आणि या विरोधकांना थारा मिळणेंच शक्य नव्हतें. राष्ट्रीय आघाडीमार्फत क्रांतीची पहिली अवस्था शांततेनें पार पडली. यादवी कोठेंच माजली नाहीं; उत्पादनांत एक दिवसहि खंड पडला नाहीं; रक्तपात झाला नाहीं; हीं या नव्या क्रांतीचीं वैशिष्ट्यें कोण नाकारूं शकेल? बहुसंख्य जनतेला फॅसिस्ट तर नको होतेच, पण कम्युनिस्ट पाहिजे होते, असें मात्र नाहीं. त्यामुळें १९४८ पर्यंत जनतेच्या लोकशाही सरकारनें वर्गीय











विरोधाची तीव्रता वाढूं न देण्याची दक्षता घेतली. म्हणून नवी लोकशाही म्हणजे शांततेनें सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचें एक साधन अशी समजूत वाढत गेली असल्यास नवल तें काय ?

### कॉमिन्फॉर्मची योजना

क्रांतीच्या तिसऱ्या अवस्थेंत मात्र वर्गीय संघर्ष टाळणें अवघड होतें. मोठ्या उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण आणि मोठ्या जमीनदारांचें निर्मूलन या गोष्टी लोकमताच्या पाठिंब्यानें घडून आल्या. पुढचें पाऊल सामुदायिक शेतीचें. तें उचलावयाचें म्हणजे जुन्या सामाजिक जीवनाच्या गाभ्यालाच हात घालावयाचा. रशियांतील खाजगी शेतीचें सामुदायिक शेतींत रूपान्तर करण्याचा १९२७ अखेर घेण्यांत आलेला निर्णय १९१७ च्या ऑक्टोबर क्रांती-इतकाच महत्त्वाचा होता, असें प्रो. मॉरिस् डॉब यानें काढलेले उद्गार ध्यानांत घेतले पाहिजेत. १९४७ च्या सप्टेंबरमध्यें समाजवादी चळवळीचें मार्गदर्शन व नेतृत्व करणारी अशी कॉमिन्फॉर्म ही संस्था प्रस्थापित झाल्यानंतर, पूर्व युरोपांतील नव्या लोकशाही राष्ट्रांच्या पुढील प्रगतीविषयीं जो विचार झाला, त्यामध्येंच सामुदायिक शेतीविषयक पूर्व तयारीच्या प्रश्नाला हात घालण्याचा निर्णय घेण्यांत आलेला असावा, असें दिसतें. 'सामुदायिक शेतीच्या पूर्व तयारीला अनुकूल असें वातावरण निर्माण केलें जात नाहीं' असा जाहीर आरोप युगोस्लाव्हियावर कॉमिन्फॉर्मनें जून १९४८ मध्यें केला. त्यावरून क्रांतीच्या तिसऱ्या अवस्थेचा तो एक भाग म्हणून पुढें ठेवण्यांत आल्याचें दिसतें. अर्थात् पूर्व युरोपांतील राष्ट्रांचें स्वतंत्र अस्तित्व मान्य करूनसुद्धां त्या सर्वांना एका आर्थिक व संरक्षक सूत्रांत गोवणें आवश्यक होतें आणि ही गोष्ट रशियाला फार काळ लांबणीवर टाकणें शक्य नव्हतें. आधुनिक जगांत राष्ट्रीय स्वातंत्र्याचा अर्थ किती परस्परसापेक्ष झालेला आहे आणि विशेषतः पूर्व युरोपांतील रशियाच्या सरहद्दीलगतच्या या छोट्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य युद्धोत्तर जगांत रशियाच्या भवितव्याशीं किती निगडित झालेलें आहे हें वास्तव दृष्टीनें समजून घेतल्यावरच, कॉमिन्फॉर्मनें घेतलेल्या या निर्णयाची आवश्यकता काय होती हें समजून येईल. रशियाच्या कक्षेंत राहावयाचें तर या राष्ट्रांचें आर्थिक नियोजन व संरक्षणयोजना हीं एका सूत्रांत गोवलीं जाणें अपरिहार्य ठरतें. युगोस्लाव्हिया त्या चौकटींत बसला नाहीं आणि त्यांतून निखळल्यानंतर अगतिकपणें अँग्लो-अमेरिकनांच्या आधारानें त्याला आपलें स्वतंत्र अस्तित्व टिकवून धरावें लागत आहे. तेव्हां क्रांतीच्या तिसऱ्या अवस्थेंत जनतेच्या लोकशाहीचा कार्यक्रम हा रशियाच्या पावलावर पाऊल टाकण्याकडे झुकणार हें उघड होय. त्यायोगें नव्या लोकशाहीसंबंधीं असणाऱ्या समजाला धक्का बसणें स्वाभाविक आहे.

### नवी लोकशाही हा एक टप्पाच

नवी लोकशाही म्हणजे स्वतंत्र मधला मार्ग नसून समाजवादाच्या ध्येयाकडे जातांना संक्रमणकाळांतील तो एक टप्पा आहे, ही गोष्ट पोलंडमधील कामगारपक्षापुढें बोलतांना हिलेरी मिंक या उद्योगमंत्र्यानें १९४७ सालीं स्पष्टपणें मांडली. त्याच्या मतें, जनतेची लोकशाही म्हणजे भांडवलदार संस्कृति व समाजवादी संस्कृति त्यांच्याखेरीज तिसरा पर्याय आहे असें मानणें चूक आहे ('Lasting Peace', 1st August, 1948 ). शहरांत समाजवादी उत्पादन व खेड्यांत भांडवलदार पद्धतीनें उत्पादन असें हें नव्या लोकशाहीचें स्वरूप वस्तुतः भांडवलदारी आहे असेंच म्हणावें लागेल. तेव्हां जनतेच्या लोकशाहीचें स्वरूप असेंच टिकविणें म्हणजे भांडवलदारीच टिकविणें होय असा अर्थ होतो. दिमित्रावनें असाच अर्थाचे उद्गार १९४८ सालीं काढले. जोंपर्यंत खाजगी शेतीची वहिवाट चालू राहील तोंपर्यंत हरळीच्या मुळांप्रमाणें भांडवली अर्थव्यवस्थेचीं मुळें कायमच राहणार. यापुढील अवस्थेंत कामगार व शेतकरी हे दोन वर्ग राज्यसत्तेंत भागीदार राहणार नाहींत. जमिनींतील खाजगी मालमत्ता नाहींशी करणें ही गोष्ट फार दुस्तर आहे. तरीसुद्धां ती टाळतां येण्यासारखी नाहीं हें मान्य केल्यावर, त्या दिशेनें निर्धारानें पाऊल उचलणें भागच होतें. हंगेरीचा कम्युनिस्ट नेता राकोसी यानें १९४९ सालीं जनतेची लोकशाही म्हणजे कामगारवर्गाचीच सर्वाधिकारशाही आहे, ही गोष्ट स्पष्टपणें सांगून टाकली. रशियापेक्षां पूर्व युरोपांतील या जनतेच्या लोकशाहीचें



अनुक्रमणिका

बाह्य स्वरूप वेगळें असलें तरी उद्दिष्ट तेंच आहे. जनतेच्या लोकशाहींत कामगारांबरोबर शेतकरीवर्ग हा सत्तेचा वांटेकरी राहील हें मानणेंच मुळीं चूक होय असा नव्या लोकशाही राष्ट्रांतील कम्युनिस्ट नेत्यांनीं प्रचार सुरू केला. तेव्हां जनतेची लोकशाही म्हणजे एक नवी, स्वतंत्र व सोविएत राज्यसत्तेपेक्षां मूलतः वेगळी अशी राजकीय शासनाची पद्धति आहे असें मानणें चूक असून ती एक विकासक्रमाची अवस्था आहे, एवढेंच मानलें पाहिजे. प्रत्येक ठिकाणीं तिची परिस्थितीनुरूप कांहीं वैशिष्ट्यें राहतील, पण मूलतः ती पद्धति एक नवाच मार्ग म्हणून पुढें मांडणें चूक होईल.

### कम्युनिस्ट पक्षांतील अंतर्विरोध

या घडामोडींचा एक विशेष म्हणून असा सांगतां येईल कीं, भांडवलदार-संस्कृतींतून समाजवादी संस्कृतींत झालेलें संक्रमण शांततामय मार्गानें साधण्यांत आलें. अर्थात् समाजवादाच्या दिशेनें होणारी यापुढील वाटचाल सुरळित होईल, तिला बाहेरून अडथळे निर्माण केले जाण्याचा संभव नाहीं. परंतु तेथील कम्युनिस्ट पक्षांतच अंतर्गत विरोध वाढण्याचा मात्र संभव आहे हें नाकारतां येणार नाहीं. कॉमिन्फॉर्मनें घेतलेला एकसूत्रीकरणाचा निर्णय आर्थिक निकडीपेक्षां राजकीय परिस्थितींतूनच जन्माला आला आहे, असें अँग्लो-अमेरिकन्स व रशिया यांच्यांतील तेढीला आलेल्या उग्र स्वरूपामुळें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कारण १९४८ सालीं भांडवलदारवर्गाच्या अंतर्गत विरोधांचा पुरा निःपात झालेला होता आणि कम्युनिस्ट पक्षाच्या हातीं निर्णायक किंवा अप्रतिहत सत्ता होती. पण याच सुमाराला अँग्लो-अमेरिकनांनीं स्वीकारलेल्या आक्रमक धोरणामुळें रशियाला पूर्व युरोपच्या सरहद्दी भक्कम करून संभाव्य धोका टाळण्याची दक्षता घेणें आवश्यक झालें. तेव्हां पूर्व युरोपांतील नव्या लोकशाही राष्ट्रांनीं क्रान्तीचा पुढील टप्पा एकसूत्री योजना करून आंखावा म्हणजे या नव्या लोकशाहीला अधिक स्थैर्य प्राप्त होईल, या हेतूनेंच वरील निर्णय कॉमिन्फॉर्मनें घेतलेला दिसतो. एकेका राष्ट्रीय परिसरांत क्रान्तीचा कार्यक्रम पुरा पाडण्याची पूर्वींची योजना या निर्णयानें बदलली आणि म्हणूनच राष्ट्रीय पार्श्वभूमीवर वाढलेल्या कम्युनिस्ट पक्षांतहि या निर्णयाला मान्यता मिळतांना थोडा फार विरोधहि दिसून आला. हा विरोध दडपतांना विरोधक हे नकळत अँग्लो-अमेरिकनांचे हस्तक बनत आहेत असा आरोप रझाकच्या खटल्यांत करण्यांत आला. त्यावरून रशियाला आपल्या नव्या धोरणानें पूर्व युरोपीय राष्ट्रांना निर्बंधपणें एका व्यूहांत बसविण्याला अँग्लो-अमेरिकनांनींच मदत केली असें म्हणणेंच क्रमप्राप्त आहे !

### पाश्चात्त्य लोकशाहीच्या कल्पनेस जबरदस्त धक्का

पूर्व युरोपांतील घडामोडींमागें कोणती क्रांतिशक्ति होती हें कांहींशा विस्तारानें दिग्दर्शित केल्यावर नव्या राजवटी लोकशाही स्वरूपाच्या आहेत का, या प्रश्नाचें उत्तर थोडक्यांत दिलें पाहिजे. पाश्चात्त्य लोकशाहीचें प्रमुख लक्षण मतप्रदर्शनाचें व मताधिकाराचें व्यक्तिस्वातंत्र्य हें सांगतां येईल. त्या अर्थानें पूर्व युरोपांतील लोकशाहींत व्यक्तिस्वातंत्र्य नाहीं, हें निःसंदिग्धपणें मान्य केलें पाहिजे. परंतु तेथील लोकशाहीची कल्पना त्याहून मुळांतच वेगळी आहे. राजकीय स्वातंत्र्यापेक्षां आर्थिक जीवनाचें स्थैर्य हा या लोकशाहीचा आधार आहे. अर्थात् पाश्चात्त्य लोकशाहीच्या कल्पनेच्या विकासामध्यें हळू हळू होत गेलेली परिणति आणि बदल हे ऐतिहासिक दृष्ट्या तपासून पाहिल्यावर रशियांतील कामगारवर्गाच्या एकमुखी सत्तेला लोकशाही आधार नाहीं असें म्हणणें योग्य होणार नाहीं. रशियानें पाश्चात्त्यांच्या आर्थिक व राजकीय कल्पनांना दिलेले धक्के, पूर्वग्रह बाजूला ठेवून निःपक्षपातीपणानें तपासतांना, प्रो. कार यांनीं ('The Soviet Impact on the Western World'-Prof. E. H. Carr) काढलेला वरील निष्कर्ष विचारवंतांना सहजासहजीं धिक्कारतां येईल असें वाटत नाहीं. कामगार व शेतकरीवर्ग हा कोणत्याहि राष्ट्रांतील बहुसंख्य वर्ग असतो. तेव्हां कामगारांच्या लोकशाहींत या वर्गाचें प्रातिनिधिक असें हित प्रतिबिंबित झालेलें असतें आणि म्हणून या अर्थानें पाश्चात्त्य लोकशाहीपेक्षां रशियांतील लोकशाही ही खरीखुरी प्रातिनिधिक आहे असें कम्युनिस्ट मानतात. तत्त्वतः

सरकार हें सर्व जनतेचें, प्रातिनिधिक स्वरूपाचें आहे हें मान्य केल्यास व्यक्तीच्या स्वातंत्र्याला कांहीं मर्यादा पडणारच. भांडवलदारांची राज्यसत्ता नाहींशी करून कामगारांची लोकशाही प्रस्थापित करण्याचें शास्त्र म्हणजे कामगारवर्गाची हुकुमशाही हें मार्क्स-प्रणीत तत्त्व रशियानें कार्यान्वित केलें. तेव्हां तेथील लोकशाही व सर्वाधिकारशाही यांमध्यें फरक मानण्याचें कारण नाहीं. भांडवलदार जगांत लोकशाही ही बलिष्ठांची म्हणजे धनिकवर्गाचीच असते. त्या उलट रशियामध्यें कामगारांची लोकशाही म्हणजे खरीखुरी जनतेची लोकशाही आहे. कारण रशियांतील प्रत्येक नागरिक हा कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत व खऱ्या अर्थानें कामगार असतो. हा विचार पाश्चात्यांच्या लोकशाही कल्पनेला जबर धक्का देणारा नाहीं असें कोण म्हणेल ? यांत नव्या लोकशाहीचा अर्थ स्पष्टपणें मांडण्यांत आला आहे. त्याबरोबरच त्याचें नैतिक दृष्ट्या समर्थनहि करण्यांत आलेलें आहे. प्रो. कार यांनीं अधिकारवाणीनें नव्या लोकशाही-संबंधीं केलेलें विवरण ध्यानांत घेतल्यास राजकीय विचारक्षेत्रांत ब्रिटिशांनीं वाढविलेल्या लोकशाही कल्पना या वेदवाक्य समजून चालण्याचें प्रयोजन नाहीं एवढेंच ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

वरील घडामोडींचें निरीक्षण करतांना, मार्क्स-प्रणीत सामाजिक क्रांतिशास्त्रांत त्या बसत नाहींत असें कित्येकांना वाटतें. एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेंत जातांना प्रसूतीच्या वेळीं मातेला अनुभवाव्या लागणाऱ्या वेदना समाजाला होणें निसर्गसिद्धच आहे. त्यांतील क्रांतिशक्तीचें बळ हें निःसंशय उपकारक ठरतें. अमेरिकेच्या स्वातंत्र्य-युद्धांत किंवा फ्रेंच राज्य-क्रांतीच्या वेळीं सामाजिक शक्तींची ताकद समाजाच्या प्रगतीला हानिकारक झाली असें इतिहासकार आतां मानीत नाहींत. मग भांडवलदार-संस्कृतीचें कवच फोडून नवी समाजवादी संस्कृति जन्माला येत असतांना समाजाला वेदना होणें साहजिक असलें, तरी त्यांत अस्वाभाविक कांहीं नाहीं. खरा प्रश्न, पूर्व युरोप रशियानें जिंकला आणि त्या जोरावर तेथें क्रांति घडवून आणली कीं समाजशक्तीच्या विकासां-तून ती निर्माण झाली, हा आहे. या बाबतींत दोन्ही शक्ती परस्परपूरक ठरल्या, असाच निर्वाळा इतिहासाला द्यावा लागेल.

---

सारसंकलन

## व्यक्तिवादी लोकशाहीकडून जनतेच्या नव लोकशाहीकडे—

[ सुप्रसिद्ध ब्रिटिश राज्यशास्त्रज्ञ एडवर्ड हॅलेट् कार ( Carr ) यांचें ' The New Society ' ( 'नव समाज' ) हें पुस्तक गेल्या वर्षीं प्रसिद्ध झालें. त्यांत त्यांनीं परंपरागत उदारमतवादी लोकशाहीची कल्पना आधुनिक काळच्या गरजा भागविण्यास कशी अपुरी आहे, याचें मूलगामी विश्लेषण केलें आहे. त्यांच्या पुस्तकांतील ' From Individualism to Mass Democracy ' या प्रकरणांतून कांहीं सारभूत मुद्दे पुढें संकलित करून दिले आहेत, ते वाचकांस उद्बोधक वाटतील—का.सं. ]

गेल्या तीनशें वर्षांत ज्या आधुनिक लोकशाहीचा उद्गम व विकास पश्चिम युरोपांत होऊन तेथें व इतरत्र तिचा प्रसार झाला, त्या लोकशाहीच्या मुळाशीं तीन गृहीत सिद्धान्त होते : (१) अमुक चांगलें व अमुक वाईट ह्याविषयीं निर्णय करावयाचा अंतिम निकष व्यक्तीची सदसद्विवेकबुद्धि हा होय. (२) समाजां-तील निरनिराळ्या व्यक्तींच्या हितसंबंधांत मूलभूत एकोपा ( harmony of interests ) आहे. त्यामुळेंच व्यक्ती समाजांत गुण्यागोविंदानें नांदू शकतात. (३) समाजाच्या दृष्टीनें एखाद्या गोष्टीचा जर निर्णय करावयाचा असेल, तर व्यक्ति-व्यक्तींनीं स्वतंत्र बुद्धीनें विचार करून तो घ्यावा. अशा निर्णयामागील विचारी बुद्धि किंवा बुद्धिवाद हाच लोकशाहीचा आधार होय.—लोकशाहीच्या या तीन सिद्धान्तांमागील मूळ प्रेरणांचा विचार केला, तर लोकशाहीचें मूळचें स्वरूप व्यक्तिवादी, आशावादी आणि बुद्धिनिष्ठ

आहे, असें दिसून येईल. पण आज लोकशाहीच्या मुळाशीं असलेले हे तीनहि सिद्धान्त डळमळीत झाले असून ते अमान्य ठरूं पाहत आहेत !

व्यक्तिप्रधान लोकशाहीच्या बुडाशीं मूळ श्रद्धा अशी कीं 'नैसर्गिक कायद्या–(Natural Law)' प्रमाणें व्यक्तींना मूलभूत उपजतच असे कांहीं हक्क असतात; ते त्यांचे हक्क कोणीहि हिरावून घेऊं शकत नाहीं; बहुमतवाल्यांइतकेच अल्पमतवाल्यांनाहि नैसर्गिक हक्क आहेत. लोकशाही परंपरेप्रमाणें आंखलेल्या राज्यघटनांतून अल्पसंख्याकांच्या हक्कांची जी हमी दिलेली आढळून येते, तिचें मूळ वरील विचारसरणींत आहे.—लोकशाहींतील या व्यक्तींच्या 'नैसर्गिक हक्कां' वर पहिला जोराचा आघात फ्रेंच राज्यक्रान्तीनें केला. लॉकच्या 'नैसर्गिक हक्कां'च्या बुडाशीं असलेल्या व्यक्तिवादाऐवजीं रूसोचें 'सामुदायिक इच्छा' ( General Will ) हें तत्त्व पुढें आलें. सबंध जनता हीच खरी प्रभुत्वसंपन्न ( sovereign ) आहे, जनतेच्या सामुदायिक इच्छेपुढें जी व्यक्ति मान वांकवणार नाहीं ती व्यक्ति जनताद्रोही होय, असें सांगून रूसोनें जनतेच्या लोकशाही-( Mass Democracy ) ला तोंड फोडलें.—'नैसर्गिक हक्क' सांगणाऱ्या व्यक्तिवादाला दुसरा सुरुंग लावला असेल तर तो इंग्लंडमधील उपयुक्ततावाद्यां-(Utilitarians)नीं. कारण, त्यांनीं 'अधिकांत अधिकांचें अधिकांत अधिक हित' हें ध्येय सांगून व्यक्तिवाद नाकारला. आज तर सोव्हिएट रशियाच्या लोकशाहींत व्यक्तिवादाला, मतभेद व्यक्त करणाऱ्या अल्पसंख्याकांना स्थान नाहीं.—अशा रीतीनें कांहीं थोड्या मोजक्या लोकांच्या व्यक्तिप्रधान लोकशाहीकडून प्रवास करीत आपण सामुदायिक इच्छेलाच मान देणाऱ्या जनतेच्या लोकशाहीपर्यंत येऊन पोहोंचलों आहोंत.

लोकशाहीचा जो दुसरा गृहीत सिद्धान्त–समाजांतील व्यक्तींच्या हितसंबंधांतील मूलभूत एकोपा–तोहि आतां खोटा ठरूं पाहत आहे. ज्यांना प्रचलित समाजव्यवस्थेंतील आपलें परंपरागत सुखाचें आसन सोडावयाचें नाहीं अशा क्रान्तिविरोधी व्यक्तींना सोयीचा असा हा सिद्धान्त आहे ! सरंजामशाही आणि भिक्षुकशाही यांच्याविरुद्ध बंड करून फ्रेंच राज्यक्रान्तीनें हा सिद्धान्त किती पोकळ आहे हें सिद्ध केलें. मार्क्सनें तर वर्गविग्रहाच्या तत्त्वावरच आपलें ऐतिहासिक तत्त्वज्ञान आधारलेलें असून, तेंच प्रत्यक्ष वस्तुस्थितीला अधिक धरून आहे. आज जी नियंत्रित अर्थव्यवस्था ( Planned Economy ) रूढ झालेली दिसते तिच्या बुडाशीं समाजांतील एकोपा हां गृहीत नसून समाजांतील संघर्ष हाच मान्य केलेला आहे. समाजांतील भिन्न वर्गांचे हितसंबंध एक नाहींत, परस्परविरुद्ध आहेत, म्हणूनच सरकारला अर्थव्यवस्थेचें नियंत्रण करून सम वांटणी करावी लागते.

लोकशाहीचा तिसरा मूळ सिद्धान्त–बौद्धिक पातळीवर परस्पर विचारविनिमय करून निर्णय करणें–हा होता. हा सिद्धान्त जो मूळ निघाला, त्या वेळेला शासनसंस्था थोड्या मूठभर राज्यकर्त्या वर्गांच्या हातांत होती. सत्ताधीश मूठभर लोक श्रीमंत व सुसंस्कृत होते; त्यांना वादग्रस्त मुद्द्यांवर शांत निर्विकारपणें विचारविनिमय करायला भरपूर सवड होती. त्या वेळची लोकशाही अशा थोड्या मूठभर लोकांपुरतीच मर्यादित असल्यामुळें, त्यांना 'लोकशाही' ही विचाराधिष्ठित ( rational ) असावी, असा सिद्धान्त प्रतिपादन करणें सोयीचें होतें. पण आज ज्या बहुसंख्य जनतेचा लोकशाहींत समावेश झाला आहे, ती बहुसंख्य जनता दरिद्री, अशिक्षित असतांना हा सिद्धान्त गैरलागू ठरत असल्यास नवल नाहीं.

प्रत्येक मतदारानें आपापल्या बुद्धीनें स्वतंत्र विचार करून आपलें मत द्यावें, या परंपरागत लोकशाहीच्या उपरिनिर्दिष्ट सिद्धान्ताला आधुनिक काळची परिस्थिति आणखी एका दृष्टीनें प्रतिकूल झाली आहे. आतां पूर्वीपेक्षां मतदारांपुढें येणाऱ्या प्रश्नांचें स्वरूप इतकें गहन व गुंतागुंतीचें झालें आहे कीं, तें शास्त्रनिष्णात तज्ज्ञांशिवाय नुसत्या विचारी बुद्धिवादी मतदाराला कळणें शक्य नाहीं. सुवर्णपरिमाण धरावें कीं सोडावें, अमेरिकेचें कर्ज घ्यावें कीं घेऊं नये या बाबतींत अर्थशास्त्रांतील मुरब्बीच कांहीं साधार तर्क करूं शकेल. तें साध्या मतदाराच्या आवांक्याबाहेरचें आहे. याचा परिणाम साहजिकच असा होतो कीं, मतदाराला आपली स्वतंत्र विचार










करण्याची बुद्धि त्या त्या तज्ज्ञाच्या हवाली करावी लागते !

लोकशाहींतील बुद्धिवादाच्या तत्त्वावर यापेक्षांहि जबरदस्त आघात मानसशास्त्रज्ञांकडून झाला. समाजाच्या मानसाचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञांचें असें संशोधन आहे कीं, व्यक्ति एकटी असेल तर ती बुद्धिवादी किंवा विचारी असूं शकेल; पण तीच व्यक्ति जर लोकांच्या झुंडींत सामील झाली तर ती बौद्धिक पातळी सोडून भावनांच्या व विकारांच्या आहारीं जाते. व्यक्तीच्या मानसशास्त्रापेक्षां झुंडीचें मानसशास्त्र निराळेंच आहे. लोक एकत्र जमले असतांना बुद्धीपेक्षां भावना व विकार यांच्या आवाहनाला बळी पडतात. म्हणूनच राजकारणांत प्रचाराला एवढें महत्त्व आलें आहे. व्यापारांत माल उठविण्याकरितां ज्याप्रमाणें भावना-विकारांना आवाहन करणाऱ्या जाहिरातबाजीचा अवलंब केला जातो, त्याप्रमाणेंच राजकारणांत प्रचारयंत्राचा केला जातो. त्यापुढें मतदार नागरिकांची लोकशाहीला लागणारी विचारशक्ति बधिर होऊन जाते.—बुद्धिवादाला यापेक्षांहि अधिक जबरदस्त तडाखा फ्राइडच्या मानसशास्त्रीय संशोधनानें दिला आहे. फ्राइडच्या मताप्रमाणें मनुष्याच्या जागृत मनाचे बौद्धिक व्यापार त्याच्या सुप्त मनाच्या व्यापारांनीं नियंत्रित असतात. सुप्त मनांतील वासना बाहेर प्रकट होतांना, त्यांवर मनुष्य बुद्धीचें केवळ पांघरूण घालतो. माणसाच्या जागृत विचाराच्या तळाशीं सुप्त मनांतील वासनाच असतात. त्याचा जाणीवयुक्त जागृत विचार म्हणजे त्या तळाच्या वासनांचें विकृत प्रतिबिंब होय. म्हणून माणसाची स्वतंत्र बुद्धि, तिला आवाहन—हें सर्व झूट असून, माणसाला आवाहन करावयाचें असेल तर त्याच्या निर्बुद्ध ( irrational ) वासनांनाच आवाहन केलें पाहिजे, हा निष्कर्ष निघतो व लोकशाहींतील बुद्धिवाद कुचकामी ठरतो.

लोकशाहींतील बुद्धिवादनिष्ठ सिद्धान्तावर आणखी एक प्रचंड हल्ला मार्क्सवादानें केला आहे. मार्क्सच्या मतें, माणसाचे विचार परिस्थितीनें ठरतात ( being determines consciousness ); समग्र भौतिक परिस्थिति हा पाया आहे; मानवी विचार हा त्यावर उभारलेला डोलारा (superstructure) आहे. मानवी विचार हा स्वायत्त नसून, तो परिस्थित्यधीन आहे, भांडवलशाही समाजांतील व्यक्तींचे विचार वर्गीय हितसंबंधानें नियंत्रित असतात, असें सांगून मार्क्सनें मनुष्यबुद्धीच्या सर्वश्रेष्ठतेच्या सिद्धान्तास आणि उदारमतवादी लोकशाहींतील विचारस्वातंत्र्यास आव्हान दिलें.

अशा रीतीनें उदारमतवादी अल्पसंख्याकांच्या लोकशाहीचे तिन्हीहि सिद्धान्त आज डळमळीत झाले आहेत. हें वर्णन करून सांगण्यात हेतु एवढाच कीं, आज निर्माण होणाऱ्या नवीन लोकशाहीचा प्रश्न नीट समजावून घेतला पाहिजे. आज जी नवी लोकशाही निर्माण होत आहे, ती अनेक दृष्टींनीं नवीन आहे. आजच्या नव्या लोकशाहींतील समाज पूर्वीसारखा एकसंध, अल्पसंख्य, आर्थिक शाश्वती असलेला असा नसून, तो अनेकसंघ, अठरापगड, अन्नवस्त्रादींना मोताद झालेल्या बहुसंख्य लोकांचा आहे. आजच्या नव्या लोकशाहींत सरकारचें काम खासगी आर्थिक हितसंबंधांतील संघर्ष केवळ दुरून प्रेक्षकासारखें पाहणें हें नसून, प्रत्यक्ष आखाड्यांत उतरून नागरिकजीवनाशीं निगडित झालेल्या निकडीच्या आर्थिक गोष्टींचें पदोपदीं नियंत्रण करणें, विशेषतः ज्या नागरिकांना आर्थिक शाश्वती नाहीं त्यांना ती देणें हें आहे. आजच्या नव्या लोकशाहींत बदललेल्या भौतिक परिस्थितीमुळें, नवीन शास्त्रीय संशोधनामुळें व शास्त्रीय दृष्टीमुळें, जुन्या उदारमतवादी लोकशाहीचा गृहीत सिद्धान्त जो बुद्धिवाद तो कोसळून पडला आहे. म्हणून आतां आपल्यापुढील कार्य जुन्या लोकशाहीचें रक्षण करणें हें नसून नवीन लोकशाही निर्माण करणें हें आहे. जे आज ‘आपणांला लोकशाहीचें रक्षण करावयाचें आहे’ असें म्हणतात, त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण खरी लोकशाही आज कोठेंहि नांदतांना आढळून येत नाहीं. आपल्यापुढील आजचें कार्य जुन्या लोकशाहीचें रक्षण करणें हें नसून नवी जनतेची लोकशाही निर्माण करणें हें आहे.

---








नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

‘नवभारत’ **लेख-सूचि**

## वर्ष ५ वें : ऑक्टोबर १९५१ ते सप्टेंबर १९५२








## कादंबरी–लघुकथा-रूपककथा इत्यादि








# लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५१ ते सप्टेंबर १९५२ )

सा र सं क ल न





## लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५१ ते सप्टेंबर १९५२ )






